# कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार : चिकित्सक अभ्यास

पुणे विद्यापीठ पुणे, या विद्यापीठास वाङ्मय विद्या शाखान्तर्गत संस्कृत

विषयातील पीएच्. डी. पदवीसाठी सादर करावयाचा शोधप्रबंध


**: संशोधक :**

जाधव शिवदास कुंडलिक

**: मार्गदर्शिका :**

डॉ. (कु.) शैलजा बापट,

प्रपाठक.

अभ्यास केंद्र

संस्कृत-प्राकृत भाषा विभाग,

पुणे विद्यापीठ,

पुणे - ४११ ००७.



डिसेंबर - २००१

# - : अ नु क्र म णि का :-

# -: कृ त ज्ञ ता :-

प्रस्तुत प्रबंध सादर करताना मला अनेक लोकांनी सहकार्य केले. त्यांचा कृतज्ञतापूर्वक ऋणनिर्देश करणे माझे कर्तव्य समजतो. मार्गदर्शिका प्रा. डॉ. ( कु.) शैलजा बापट यांच्याविषयी कृतज्ञता आणि त्यांचे ऋण व्यक्त करताना मला आनंद होत आहे. पीएच . डी. पदवीसाठी मला विद्यार्थी म्हणून मान्यता देऊन त्यांनी वेळोवेळी केलेल्या बहुमोल सूचनांमुळे आणि योग्य मार्गदर्शनामुळे हा प्रबंध पूर्णत्वास गेला. विश्वविद्यालय अनुदान आयोगाने टिचर फेलोशीप मंजूर करुन माझ्या या अध्ययनास उचित मदत केली. रयत शिक्षण संस्थेच्या उच्च शिक्षण विभागाचे सहसचिव मा. प्रि. व्ही.जी. कसबेकर साहेब आणि छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारचे तत्कालीन प्राचार्य मा.के यादव सर यांनी मला पीएच . डी. चे काम पूर्ण होण्यासाठी अभ्यास रजा मंजूर केली. त्यांचा मी आभारी आहे. आमच्या महाविद्यालयाचे विद्यमान प्राचार्य मा. अरुण बर्गे सर तसेच कॉलेजमधील सहकारी प्राध्यापकांनीही प्रोत्साहन दिले, त्या सर्वांचा मी आभारी आहे.

संस्कृत-प्रकृत भाषा विषयाच्या प्रमुख प्रा. सौ. सरोजा भाटे यांनी आपुलकीने अतिशय मनापासून मदत केली. त्यांचाही मी ऋणी आहे. याशिवाय विभागातील सर्व प्राध्यापकवर्ग व कार्यालयीन सेवकवर्ग यांनीही मला उचित सहकार्य दिले.

संस्कृत प्रगत अध्ययन केंद्राचे सेवानिवृत्त ग्रंथपाल डॉ.रा.पां. गोस्वामी, विद्यमान ग्रंथपाल श्री. हनुमंत आत्माराम कांबळे, पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयाचे डॉ. चंद्रकांत फरांदे, डेक्कन कॉलेज, पुणे येथील प्रभारी ग्रंथपाल आर्. आर्. शिगवण, भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिटयूटचे ग्रंथपाल, छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा येथील ग्रंथपाल श्री. बी.एस्. गायकवाड या सर्वांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी केलेल्या सहकार्याबद्दल मी ऋणी आहे.

यानंतर तयार हस्तलिखिताची संगणक प्रत तयार करुन त्याला मुद्रित रूप देणे, त्याच्या झेरॉक्स प्रती काढणे इत्यादी तांत्रिक बाबींची पूर्तता सौ. शुभदा केळकर यांनी केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. रयत शिक्षण संस्थेचे सेवानिवृत्त, आजीव सेवक श्री. गणपती शंकर ढवण यांनी प्रुफे तपासणे व मराठी शुद्धलेखन पाहिले, याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो.

स्थळ : पुणे — सर्वांचा ऋणांकित.

S K Jadhav

दिनांक : 29/12/2009 — (जाधव शिवदास कुंडलिक)

# -: नम्र निवेदन :-

प्रस्तुत प्रबंधामध्ये कालिदासाच्या वाङ्मयातील संदर्भांचा निर्देश करताना रेवाप्रसाद द्विवेदी संपादित ' कालिदास ग्रंथावली ' हा ग्रंथ वापरला आहे. कुमारसंभव सर्ग ९ – १७ साठी पं. शेषराज रेग्मी संपादित ' कुमारसंभव महाकाव्य ' वापरले आहे. मराठी भाषांतरासाठी चित्रशाळा प्रकाशन, पुणे यांनी प्रसिद्ध केलेल्या रामचंद्र गणेश बोरवणकर संपादित रघुवंश व मेघदूत या ग्रंथांचा वापर केला असून शक्य तेथे भाषांतर स्वतःच्या भाषेत करण्याचा प्रयत्न केला आहे. ' मालविकाग्निमित्रम् ' साठी अरविंद मंगरूळकर व इतर यांनी संपादन केलेल्या आवृत्तीचा उपयोग केला आहे. प्रा. रा.शं. वाळिंबे संपादित ' अभिज्ञान शाकुंतल ' या ग्रंथाचाही अध्ययनासाठी उपयोग झाला आहे.

मराठी शुद्धलेखनासाठी श्री. ग.शं.ढवण यांच्या ' शुद्धलेखन पुस्तिके ' चा वापर केला आहे.

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचा प्रयोग वाचताना कालिदासाच्या ग्रंथावर उपलब्ध टीका वाङ्मयाचा उपयोग केला आहे.

कालिदासाचा अर्थान्तरन्यास अलंकार या एकाच अलंकाराच्या दृष्टीने अभ्यास हा एक वेगळा अनुभव वाचकांना यातून येईल.

# पुणे विद्यापीठ

## संस्कृत आणि प्राकृत भाषा विभाग

डॉ. (कु.) शैलजा बापट,
प्रपाठक.

गणेश खिंड,
पुणे ४११ ००७.
दूरध्वनी :
कार्यालय : 5691220
निवास : 4321938

दिनांक : २१/१२/२००१

## -: प्रमाणपत्र :-

प्रमाणित करण्यात येते की, 'कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास : चिकित्सक अभ्यास' या शीर्षकाचा प्रबंध श्री. जाधव शिवदास कुंडलिक यांनी माझ्या मार्गदर्शनाखाली सादर केला आहे. त्यांनी इतर साहित्य-ग्रंथांतून घेतलेल्या संदर्भांचे निर्देश प्रबंधामध्ये केले आहेत.

Shbapat.

**डॉ. (कु.) शैलजा बापट**
मार्गदर्शिका

# : – प्र ति ज्ञा प त्र : –

मी, जाधव शिवदास कुंडलिक, असे जाहीर करतो की, " कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार : चिकित्सक अभ्यास " असे शीर्षक असलेला हा प्रबंध हे माझे स्वतःचे संशोधन व अध्ययन असून त्यासाठी डॉ. शैलजा बापट यांनी मला मार्गदर्शन केले आहे. इतर पुस्तकांमधून जे संदर्भदर्शक पुरावे सादर केले आहेत ते मला मान्य असून मी त्या त्या लेखकांचे ऋण मानतो. हा प्रबंध पूर्णतः किंवा अंशतः या पदवीसाठी अगर अन्य पदवीसाठी कोणत्याही विद्यापीठाला यापूर्वी सादर केलेला नाही.

स्थळ : पुणे

दिनांक : 29/12/2009

SKJadhav

(जाधव शिवदास कुंडलिक )

# University of Pune

7 JUN 2006



Th 11146

## Declaration of Result of the Doctor of Philosophy (Ph.D.)

Shri. Jadhav Shivdas Kundlik

(श्री. जाधव शिवदास कुंडलिक)

**University has accepted thesis submitted by the above mentioned candidate for award of Ph. D., as per reports of referees and examiners of open defence of the thesis. Accordingly, it is hereby notified that, the above mentioned candidate is declared to have passed the examination of Ph. D. and has become eligible for the award of Ph. D. Degree.**

**RELEVANT DETAILS ARE AS UNDER :**

1. Faculty : Arts & Fine Arts
2. Subject : Sanskrit
3. Title of the Thesis : " कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार : चिकित्सक अभ्यास
4. Place of Research : Department of Sanskrit & Prakrit Languages, University of Pune, Pune - 7.
5. Name and Address of the Guide : **Dr. Shailaja Bapat,** Department of Sanskrit & Prakrit Languages, University of Pune, Pune - 7.
6. **Date of Registration : 19th November, 1998.**
7. Date of Declaration of Result : **2nd** January, 2004.

...Pune ...07.
Ref No. PGS/Ph ... 153
Date : 9 1 2004

For Controller of Examination

# – संक्षेपसूची –

| | |
|---|---|
| अ. | अध्याय |
| अग्नि पु. | अग्निपुराण |
| – अग्नि का.लं.शा. | अग्निपुराण –काव्यालंकारशास्त्रम । |
| अधि. | अधिकरण |
| अभि. | अभिराम कृत टीका. |
| अभि. काव्य | अभिनव काव्यशास्त्र |
| अभि. शा. | अभिज्ञान–शाकुंतलम् |
| अर्थद्यो. | अर्थद्योतनिका टीका ( राघवभट्ट ) |
| अर्था. अलं. | अर्थान्तरन्यास अलंकार |
| अलं. कोश | अलंकार कोश ( ब्रह्ममित्र अवस्थी ) |
| अलं. कौस्तु. (कर्ण.) | अलंकार – कौस्तुभ ( कर्णपूर ) |
| अलं. कौस्तु. (विश्व ) | अलंकार कौस्तुभ ( विश्वेश्वर पाण्डेय ) |
| अलं. चिन्ता. | अलंकार – चिंतामणी ( जीनसेनाचार्य ) |
| अलं. तिल. | अलंकार–तिलक ( भानुदत्त ) |
| अलं. प्र. | अलंकार–प्रदीप ( विश्वेश्वर पाण्डेय ) |
| अलं. मञ्ज. (त्रिम) | अलंकार मञ्जरी ( त्रिमलभट्ट ) |
| अलं. मञ्ज. (वेणी) | – अलंकार मञ्जरी ( वेणीदत्त ) |
| अलं. मञ्ज. (सुधी ) | अलंकार मञ्जरी ( सुधीद्रतीर्थ श्रीपाद ) |
| अलं. मञ्जू. | अलंकार मञ्जूषा |
| अलं. मणि. | अलंकार – मणिहार ( श्री कृ□णब्रह्मतंत्र परकाल स्वामी ) |
| अलं. महो. | अलंकार – महोदधी ( नरेंद्रप्रभसुरी ) |
| का.र. | काव्यरसायन ( शिवदत्त शिवनाथ सहृदयशिरोमणी, |
| का.लं.सा. | काव्यालंकारसार ( भावदेवसुरी ) |
| का. लोक. | काव्यालोक ( हरिप्रसाद ) |
| का.वि. | काव्यविलास ( चिरंजीव ) |
| काव्याद. | काव्यादर्श ( दण्डी ) |
| काव्यानु. ( वा .) | काव्यानुशासन ( वाग्भट द्वितीय ) |
| काव्यानु .( हेम. ) | काव्यानुशासन ( हेमचंद्र ) |
| काव्यालं .(भा.) | काव्यालंकार ( भामट )रूद्रट ) |
| काव्यालं ( रु ) | काव्यालंकार ( रूद्रट ) |
| का.सा.सं. | काव्यालंकार सारसंग्रह ( भावदेवसुरी ) |
| का.सू. | काव्यालंकार – सूत्र ( वामन ) |
| किराता. | किरातार्जुनीय ( श्रीहर्ष ) |
| किशोर. | किशोरकेली टीका ( नवकिशोरकर शास्त्री ) |
| कुमार. | कुमारसंभव |

| | |
|---|---|
| कुमारगिरी | कुमारगिरीराजिया टीका ( काट येम ) |
| कुवल. | कुवलयानंद ( अप्पयदीक्षित ) |
| कोणे. | कोणेश्वरी टीका ( कोणेश्वर ) |
| गीता | भगवद् गीता |
| चन्द्रा. | चन्द्रालोक ( जयदेव ) |
| चारित्र. | चारित्र्यवर्धिनी टीका (चारित्रवर्धनाचार्य) |
| च.चन्द्रि. | चमत्कारचन्द्रिका ( विश्वेश्वर कविचंद्र ) |
| त.टी. | तळटीप |
| ध्वन्या. | ध्वन्यालोक |
| न.रा.य.भू. | नञ्जराजयशोभूषण |
| नाट्य | नाट्यशास्त्र ( भरतमुनी ) |
| नी.शं. | नीतिशतक |
| नील. | नीलकण्ठी टीका ( नीलकण्ठ ) |
| पृ. | पृष्ठ |
| पदा. | पदार्थदीपिका टीका ( नारायण पण्डित ) |
| प्र. | प्रक्षिप्त |
| प्र.रु. | प्रतापरुद्रीय ( विद्यानाथ ) |
| प्रका. | काशिका ( अरुणगिरीनाथ ) |
| प्रस्ता. | प्रस्तावना |
| बाल. | बालबोधिनी टीका |
| बालालं. | बालालंकार |
| भावप्र. | भावप्रकाशिका टीका ( शिवप्रसाद द्विवेदी) |
| म.म.चम्पू. | मन्दारमरन्द चम्पू ( श्री कृष्ण कवी ) |
| मनु. | मनुस्मृती |
| म.भा. | महाभाष्य ( पतंजली ) |
| महा. | महाभारत |
| माल. | मालविकाग्निमित्रम् |
| रघु. | रघुवंशम् |
| रघु. दर्प. | रघुवंश - दर्पण - ( हेमाद्री ) |
| रस. | रसचंद्रिका ( शंकर ) |
| रस. गंगा. | रसगंगाधर पण्डितराज जगन्नाथ |
| रामा. | रामायण |
| वक्रो.जी. | वक्रोक्तिजीवित ( कुन्तक ) |
| वा.ल. | वाग्भटालंकार ( वाग्भट, प्रथम ) |
| वि.ध.पु. | विष्णुधर्मोत्तरपुराण |
| विक्रमो | विक्रमोर्वशीय |
| विव. | विवरण टीका ( नारायण पण्डित ) |
| व्याख्या | व्याख्या टीका ( श्री निवासाचार्य ) |
| शत.ब्रा. | शतपथ ब्राह्मण |
| शि.प्र.का.ल. | शिशुप्रबोधकाव्यालंकार ( पुञ्जराज ) |
| शिशु. | शिशुहितैषिनी ( कनकलाल ठक्कुर ) |
| शिशुपा. | शिशुपालवध - महाकाव्य. |
| सर.कण्ठा. | सरस्वती-कण्ठाभरण ( भोज ) |
| सहृदय. | सहृदय टीका (श्री सातवाहन श्रीनिवासाचार्य, |
| संजी. | संजीवनी टीका ( मल्लिनाथ ) |
| सा.कौ. | साहित्य-कौमुदि |

| | |
|---|---|
| सा.द. | साहित्य- दर्पण ( विश्वनाथ ) |
| सा.मी. | साहित्य- मीमांसा |
| सा.र. | साहित्य-रत्नाकर ( धर्मसुरी ) |
| सारार्थ | सारार्थदीपिका ( सहृदयराम पिशरोदी ) |
| सा.सा. | साहित्यसार ( अ युतराय ) |
| सा.सु.सि. | साहित्यसुधासिंधु |
| सि.ब.ल. | सियबसलकर ( स्वभाषालंकार ) (शिलामेघसेन ) |
| सीता. | सीताराम कृत टीका |
| सुबोधालं. | सुबोधालंकार |
| सुबो. | सुबोधिनी टीका ( गौरीनाथ पाठक ) |
| सू. | सूत्र |
| स्वप्न | स्वप्नवासवदत्ता नाटक ( भास ) |

# प्रास्ताविक

## : समस्या, समस्येचे स्वरूप व तिचे महत्त्व :

### १. कालिदासाच्या वाङ्मय-अध्ययनाचे स्वरूप

महाकवी कालिदासाच्या बाबतीत व त्याच्या ग्रंथावर आजपर्यंत विपुल संशोधन झाले आहे. त्यामध्ये अनेक विद्वानांनी त्या ग्रंथांचा अभ्यास काव्य, शैली, रीती, छंद, अलंकार, संगीत इत्यादी विषयी केला आहे. काहींनी सामाजिक दृष्टिकोनातून तर काहींनी धर्म व तत्त्वज्ञान या मुद्द्यांनाही स्पर्श करणारे संशोधन करून कालिदासाध्ययनामध्ये मोलाची भर घातली आहे. काहींनी भाषा-वैज्ञानिक दृष्टीने तर काहींनी ग्रंथांच्या चिकित्सक आवृत्तीसाठी मूलभूत संशोधनकार्य केले आहे. चिकित्सक आवृत्त्यांमध्ये पुढील संशोधने उल्लेखनीय आहेत. साहित्य अकादमीने प्रकाशित केलेले Susil Kumar De संपादित The Meghadūta of Kālidāsa, S.K. Belvalkar संपादित **The Abhijñānaśākuntal of Kalidasa** आणि H.D. Velankar संपादित **The Vikramorvaśīya of Kalidasa** हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. त्याच बरोबर काशी विश्वविद्यालयाने प्रकाशित व रेवा प्रसाद द्विवेदी संपादित ' कालिदास ग्रंथावली ' ( **The works of Kālidāsa** ) हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. नित्यानंद कृत ' कालिदासकाव्ये शब्द-परिपाकः ' डॉ. उषा सिंहल यांचा ' कालिदास के अपाणिनीय प्रयोग ', Dr. S.N. Gosal यांचा ' **The Apabhraṁśa verses of the Vikramorvaśīya from the Linguestic stand point**` आणि Sures Chandra Banerji यांचा 'कालिदास कोश ' हे ग्रंथ मोलाचे आहेत.

टीका वाङ्मयाच्या दृष्टीने राधावल्लभ त्रिपाठी यांचा 'कालिदास की समीक्षा-परंपरा', डॉ. कुमकुम जिन्दल यांचा 'मेघदूत टीकाओं का तुलनात्मक अध्ययन ' , डॉ. प्रभुनाथ द्विवेदी यांचा '**कालिदास की कृतियों पर मल्लिनाथ की टीकाओं का विमर्श**' इत्यादी ग्रंथ महत्त्वाचे आहेत. शैलीच्या दृष्टीने S.A. Sabnis यांचा '**Kalidasa- His Style and His Art**` , रसदृष्टीने Dr. R.R. Ambardekar यांचा ' **Rasa structure of the Meghadūta** '

रीती दृष्टीने शिवगोविंद पाण्डेय कृत 'कुमारसम्भव का रीति-वैज्ञानिक अध्ययन' हे ग्रंथ उपलब्ध आहेत.

भौगोलिक अध्ययनाच्या दृष्टीने H.C. Chakradhar यांचा **'The Geography of Kālidāsa'** आणि कैलासनाथ द्विवेदी यांचा 'कालिदास की कृतियोंमें भौगोलिक स्थलोंका प्रत्यभिज्ञान' हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. सामाजिक जीवन या विषयावर डॉ. नरेश मिश्र यांचा 'कालिदास नाटकेषु सामाजिक-जीवनम्' हा ग्रंथ मोलाचा आहे. सर्वसाधारण अभ्यासासाठी T.G. Mainkar यांचा **'Kālidāsa - His Art and Thought'**, Amaldhari Singh यांचा **'Kālidāsa - A Critical Study'**, Madhusudan Mishra यांचा **'Metres of Kālidāsa'**, रमाशंकर तिवारी यांचा 'महाकवि कालिदास', डॉ. वि. वा. मिराशी यांचा 'कालिदास' इत्यादी अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. B.S. Upādhyāya यांनी **'India in Kālidāsa'** या आपल्या ग्रंथात भौगोलिक, राजकीय, सामाजिक, ललित-कला-साहित्य, आर्थिक जीवन, शिक्षण, धर्म व तत्त्वज्ञान अशा विविध विषयांवर विशद विवेचन केले आहे.

Satypal Narang यांचा **'Kālidāsa Bibiography'** व डॉ. आद्याप्रसाद मिश्र यांचा 'कालिदास साहित्यम्' या सारखे ग्रंथ कालिदासाच्या वाङ्मयावर विपुल अध्ययन झाल्याची साक्ष पटवितात. प्रस्तुत प्रबंधाचा विषय अलंकार शास्त्रावर आधारित आहे. तरीही वाचकांना थोडेसे दिग्दर्शन व्हावे म्हणून उपरोक्त काही संशोधन प्रकारांचे इथे उल्लेख केले आहेत. हे उल्लेख म्हणजे कालिदासविषयक ग्रंथावरील सर्व संशोधनाचा आढावा किंवा त्याचे समीक्षण करण्याचा उद्देश अर्थातच नाही.

२. कालिदास वाङ्मयातील-अलंकाराच्या अध्ययनाचे स्वरुप :

कालिदासाच्या वाङ्मयावरील संशोधन-कार्याचे स्वरुप लक्षात घेता कालिदासाच्या काव्याचे शरीरभूत घटक छंद, शैली किंवा अलंकार की जे काव्यात्म्याचे सौंदर्यवर्धक आहेत. त्यांचाही अभ्यास होणे जरुरीचे आहे. त्यांचे अध्ययन केल्याशिवाय कालिदासाच्या कृतींचा समग्र अभ्यास होऊ शकणार नाही. हे लक्षात घेऊन कालिदासाच्या काव्यशरीराचा सौंदर्यवर्धक घटक जो अलंकार - त्यांचा अभ्यास काही अभ्यासकांनी सुरु केला. त्यांनी कालिदासाने योजलेल्या अलंकारांपैकी कालिदासाच्या उपमा अलंकाराच्या प्रयोगावर विशेष भर

दिला आहे. जसे – Pillai K. C Chellappanm यांचा ' **Similies of Kālidāsa** ` ( उपमा कालिदासस्य ) हा ग्रंथ तसेच या संदर्भातील विविध नियतकालिकांतून झालेले लिखाण – उदा. ' त्रिवेणी ' च्या जून १९४४ च्या अंकात Balkrishnan Parasu यांचा 'Kālidāsa's Similies` हा लेख, ' भारतीय विद्या ' च्या नोव्हेंबर १९५३ च्या अंकात Jhala G.G. यांचा ' उपमा कालिदासस्य ' हा लेख, ' वीणा ' च्या १९५९ मधील कालिदास विशेषांकात आलेला V.S. Musalgaonkar यांचा ' उपमा कालिदासस्य ' हा लेख याची साक्ष देतात. कालिदासाच्या उपमा अलंकाराच्या अभ्यासातून पुढे ' उपमा कालिदासस्य ' ही उक्ती प्रचलित झाली.

'उपमा ' अलंकाराशिवाय इतर अलंकाराकडे अभ्यासकांनी पुरेसे लक्ष दिलेले दिसत नाही. असे जरी असले तरी ' 'अर्थान्तरन्यास ' अलंकाराकडे काही अभ्यासकांचे लक्ष गेले. अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेच्या (AIOC ) अधिवेशनामध्ये पुढील शोध निबंध सादर झाले आहेत.

१.Dvivedi, Ramchandra - **Arthāntarnyāsa; Theorty and Practice and its uses in the Meghadūta** – Gauhati – 1965.

२. द्विवेदी, रामचंद्र – ' मेघदूतमें अर्थातरन्यास ' उज्जैन, १९७२

3. ( प्रस्तुत प्रबंधकर्ता ) –Arthāntaranyāsa alaṅkāra in Kālidāsa's Meghadūtam वरील सर्व अध्यायनाचा आढावा घेता असे दिसून येते की, कालिदासाच्या अध्ययनामध्ये अलंकाराध्ययनाला म्हणावे तितके महत्त्व दिलेले नाही. त्यामुळे कालिदासाचे वाङ्मय-संशोधन अपूर्ण राहते.

(क) कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थातरन्यास अलंकार अध्ययनाची गरज :

'उपमा कालिदासस्य ' ही उक्ति कालिदासाच्या वाङ्मयातील त्याच्या अलंकारांच्या प्रयोगाची पूर्णता नव्हे. त्यामुळे कालिदासाने प्रयुक्त केलेल्या इतरही अलंकारांचा अभ्यास प्रकथित झाला असे म्हणणे इष्ट होईल. त्या दृष्टीने एका अनामिक कवीने त्याने केलेल्या निरीक्षणाचा उल्लेख श्लोकात आढळतो.

उपमा कालिदासस्य नोत्कृष्टेति मतिर्मम ।<br>
अर्थान्तरस्य विन्यासे कालिदासो विशिष्यते ॥

ही सूक्ती कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यासाच्या चिकित्सक अभ्यासास प्रेरित करते आणि कालिदासाचे उपमा अलंकारामधील कुशल उपयोगाचे पार्श्वभूमीवर अर्थान्तरन्यास अलंकारसुद्धा कालिदासाने तेवढ्याच कुशलतेने अर्थाविष्कारासाठी वापरला असला पाहिजे. त्या दृष्टीने कालिदासाने त्याच्या विविध वाङ्मयातून योजलेल्या अर्थान्तरन्यास अलंकाराची गरज निर्माण होते.त्यातूनच 'कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार – चिकित्सक अभ्यास ' संशोधनासाठी निवडण्यात आला आहे.

## ४. अभ्यास पध्दती :

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचा अभ्यास करण्यापूर्वी आपणांस अर्थान्तरन्यास अलंकाराचा सामान्य अभ्यास करणे आवश्यक ठरते. त्या दृष्टीने पहिल्या प्रकरणाची मांडणी केली आहे. अर्थान्तरन्यासाचे सामान्य स्वरूप जाणून घेतल्यावर कालिदासाने आपल्या ग्रंथांत वापरलेल्या अर्थान्तरन्यासाचे अध्ययन क्रमप्राप्त होते. अर्थान्तरन्यासाचे सामान्य स्वरूप आणि कालिदासाचे टीकांसह समग्र वाङ्मय हे हा या अभ्यासाचा मुख्य आधार आहे. या दोन आधारांवरच अध्ययनाची पुढील प्रकरणात विभागणी केली आहे.

## प्रकरण पहिले : –

## अर्थान्तरन्यास अलंकार : सामान्य स्वरुप

प्रस्तुत प्रकरणामध्ये अलंकार-शास्त्रातील काही महत्त्वाच्या ग्रंथांचे आढावे, अर्थान्तरन्यास अलंकाराचे शास्त्रीय स्वरूप लक्षात येण्यासाठी घेतले आहेत. त्यामुळे कालिदासाच्या वाङ्मयमध्ये योजलेल्या अर्थान्तरन्यासाचे वेगळे आणि नेमके स्वरूप काय आहे हे समजून घेणे सोपे जाईल.

### अलंकाराचे सामान्य स्वरुप :

### १.१.१ : अलंकार शब्दाचा सामान्य अर्थ :

बहुधा अलंकार या शब्दाचा प्रयोग साहित्यशास्त्र ग्रंथामध्ये अलंकरण ( आभूषण ) या अर्थाने प्रसिद्ध आहे. संस्कृत वाङ्मयात अनेक वेळा अलंकार हा शब्द ' आभूषण ' या शब्दाचा पर्यायवाची शब्द म्हणून आला आहे. ते आभूषण दोन प्रकारांनी वर्णिलेले दिसते, १) बाह्य आणि २) आन्तर. उदा. १) बाह्य आभूषण – कवच, कुण्डले इ. २) आन्तर आभूषण – विद्या, विजय, शौर्य इत्यादी. ही आन्तर आभूषणे गुणांमध्ये अन्तर्भूत होतात, अलंकारात नाही. बाह्य अलंकाराचा अलंकार या अर्थाने व्यवहार होतो. उदा. अनुप्रास, यमक, उपमा,

उत्प्रेक्षा, स्वभावोक्ती इत्यादी अलंकार शब्दाच्या व्युत्पत्तीतून हाच अर्थ दिसून येतो.

### १.१.२ : अलंकार शब्दाची व्युत्पत्ती आणि अर्थ :

अलंकार हा शब्द अलं + कृ या धातूपासून बनला आहे. ' अलम् ' हे अव्यय भूषण वाचक आहे. अलंकृ म्हणजे भूषण धारण करणे आणि अलंकार म्हणजे भूषविण्याची साधने – जसे – पुष्प. पुष्पहार, आभरण इत्यादी.

### १.१.3 : अलंकाराचे स्वरुप व स्थान :

साहित्यशास्त्रातील अलंकाराचे स्वरूप वामन व दंडी यांच्या आधारे मांडले आहे

साहित्यामध्ये अलंकाराचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. साहित्यशास्त्राचे दुसरे रुढ झालेले नाव म्हणजे अलंकारशास्त्र. त्याचाच प्रभाव म्हणून साहित्यशास्त्र म्हणजे अलंकारशास्त्र असे एक समीकरणच झाले आहे. अलंकारांचे महत्त्व प्रतिपादन करताना आलंकारिक राजशेखराने अलंकाराला वेदाचे सातवे अंग मानले आहे. त्याच्या मते अलंकार हे वेदाचा अर्थ प्रकट करण्यासच उपकारक ठरतात आणि आलंकारांशिवाय वेदाच्या अर्थाचे ज्ञान सम्यक् रूपाने ज्ञात होत नाही.

आणखी एक गोष्ट इथे नमूद करावीशी वाटते की, जे आलंकारिक ( उदा. ध्वनिवादी आनंदवर्धनादी, रीतिसंप्रदायवादी, गुणवादी, वक्रोक्तिवादी ) काव्यामध्ये अलंकाराचे विशद व विस्तृत विवरण दिलेले आहे. भरताने आपल्या ग्रंथात केवळ चार अलंकार सांगितले आहेत. या अलंकारांची संख्या वाढत वाढत गेली आहे. भामहाने ३८, उद्भटाने ४१, वामनाने ३२, भोजाने ७२,मम्मटाने ६७, रुय्यकाने ८१, शोभाकर मित्राने १०६, जयदेवाने ९५, विद्याधराने ८०, विश्वनाथाने ८४, अप्पय दीक्षिताने ११९, भट्ट देवशंकर पुरोहिताने ११५ अलंकार मानले आहेत. अशाप्रकारे त्यांची संख्या २२५ झाली आहे. यावरून हे सूचित होते की, त्यांना काव्यशरीराचे सौंदर्यात विशेष महत्त्व प्राप्त झालेले दिसते.

### १.१.४ : अर्थान्तरन्यास अलंकार :

या अलंकाराचे विवेचन विविध अलंकारिकांच्या ग्रंथांतील लक्षण विचारात घेतले आहे आणि त्या अनुषंगाने या अलंकाराच्या प्रकारांची चर्चा केली आहे. याच प्रकरणात अर्थान्तरन्यास आणि इतर अलंकार यांचा तौलनिक अभ्यास करुन त्याचे वेगळेपण स्पष्ट केले आहे. त्याचप्रमाणे सुभाषिते आणि अर्थान्तरन्यास यांतील साधर्म्य–वैधर्म्य अभ्यासले आहे.

## प्रकरण दुसरे :

### मेघदूतातील अर्थान्तरन्यास –

या प्रकरणात २४ श्लोकांचा अभ्यास केला आहे. तो श्लोकाचे विवेचन व निरीक्षण या पद्धतीने दिला आहे. विवेचनाचत श्लोकाचा थोडक्यात आशय सांगितला असून निरीक्षणात विविध टीकाकारांच्या मतांची नोंद घेतली आहे. तसेच समर्थन साधर्म्यपर की वैधर्म्यपर हे सांगितले आहे. त्याचबरोबर अर्थान्तरन्यासाची योजना करताना कवीने मानवी स्वभाव, निसर्गातील घटना, एखादे त्रिकालाबाधित सत्य, सुभाषित यांचा आधार घेतल्याची त्या त्या ठिकाणी नोंद घेतली आहे. त्यातून कालिदासाची शैली दिसून येते. त्या उदाहरणातील एक सुंदर उदाहरण पुढीलप्रमाणे –

जातं वंशे भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशात् दूरबन्धुर्गतोऽहं
याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।।

( मेघ. ६ )

## प्रकरण तिसरे : -

### कुमारसंभवातील अर्थान्तरन्यास अलंकार –

कुमारसंभवातील १७ सर्गात एकूण ६९ श्लोकांत अर्थान्तरन्यास असून त्या सर्वांची चर्चा या प्रकरणात केली आहे. विवेचन करताना नारायण पडित अरुणागिरीनाथ, वल्लभदेव आणि मल्लिनाथ या टीकाकारांच्या मतांची नोंद घेतली आहे.

शशिना सह याति कौमुदी सह मेघेन तडित् प्रलीयते । प्रमदाः पतिवर्त्मगा इति प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ।।

(कुमार. ४३३ )

यासारख्या सुंदर अर्थान्तरन्यासाची योजना कवीने केलेली इथे आढळते.

## प्रकरण चौथे : -

### रघुवंशातील अर्थान्तरन्यास –

रघुवंशात १९ सर्ग असून ५६ श्लोकांत अर्थान्तरन्यास आहे. निसर्गातील घटनांचा, जीवनातील नश्वरतेचा, बंधुप्रेमाचा आणि इंद्रीयाचा स्वभाव यांचा आधार घेऊन कवीने अर्थान्तरन्यासाची योजना केली.

या प्रकरणात

यशोधनानां हि यशो गरीयः । ( रघु. १४-३५ )

यासारख्या अनेक सुभाषितांची योजना आढळते.

## प्रकरण पाचवे :-

## कालिदासाच्या नाटकातील अर्थान्तरन्यास अलंकार

कालिदसाच्या मालविकाग्नित्र नाटकात ७, विकर्मोर्वेशीयमध्ये ७ आणि अभिज्ञान शाकुंतलामध्ये ३६ श्लोकांत अर्थान्तरन्यास अलंकार आहे. श्लोकांचे विवेचन आणि निरीक्षण अशा रूपात या प्रकरणात केली आहे. कालिदासाच्या नाटकात अर्थान्तरन्यासाची सुंदर सुंदर उदाहरणे आढळतात. उदा.

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमै
र्नवाम्बुभिर्दूरविलम्बिनो घनाः ।
अनुध्दताः सत्पुरुषाः समृद्धिभिः
स्वभाव एवैष परोपकारिणाम् (अभि. शा. ५.१२)

## प्रकरण सहावे :-

## निरीक्षणे व निष्कर्ष

प्रस्तुत प्रबंध प्रास्ताविक खेरीज करून पाच प्रकरणांमध्ये विभागला आहे. प्रास्ताविकात प्रस्तुत प्रबंधाची समस्या, तिचे स्वरूप व त्याप्ती आणि अध्ययनाची गरज स्पष्ट केली आहे. पहिल्या अध्यायात अलंकाराचे स्वरूप, सामान्य लक्षण व प्रकार आणि भामह-दंडीपासून २१ व्या शतकार्पयतच्या यथोपलब्ध आलंकारिकांच्या ग्रंथाचा आधार घेऊन अर्थान्तरन्यासाचे लक्षण व प्रकार यासंबंधी चर्चा केली आहे. याच प्रसंगी त्या त्या अलंकारिकाचे योगदान नमूद केले आहे. पुढे याच प्रकरणात या अलंकाराचा इतर अलंकारांहून असलेले भेद व त्याचा मूलाधार आदींचे वर्णन केले आहे. अर्थान्तरन्यासाच्या सामान्य स्वरूपाचे विवेचन तसेच कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगांचे सूक्ष्म विवेचन केले असता आपल्यासमोर एकंदरीत अर्थान्तरन्यास व कालिदासाने योजलेले अर्थान्तरन्यास विषयक काही महत्त्वाचे विशेष ध्यानात येतात ज्याची नोंद या प्रकरणात केली आहे.

कालिदासाच्या साहित्यात अर्थान्तरन्यासाचे सारगर्भ तसेच लालित्यपूर्ण भरपूर प्रयोग आढळतात याची पुष्टी प्रस्तुत प्रबंधात केली आहे आणि त्यासाठी इथे वेगळा पुरावा देणे आवश्यक वाटत नाही. प्रस्तुत प्रबंधात प्रारंभी असे सांगितले आहे की, कालिदासाची प्रसिद्धी उपमा अलंकाराबाबत असली तरी प्रस्तुत प्रबंधात असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, कालिदास अर्थान्तरन्यासाच्या वापरामध्ये अत्यंत कुशल असून त्यात सफल झाला आहे. त्याच्या अर्थान्तरन्यासाचा वापर पाहून असे वाटू लागले की उपमा अलंकारप्रमाणेच अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगात कालिदासाचे नैपुण्य तितकेच आहे. असे जरी असले तरी कालिदासाने अर्थान्तरन्यासच्या प्रयोगानी एक आगळे प्रयोजन साधले आहे जे उपमा अलंकाराने साधले जात नाही. याचे कारण अर्थान्तरन्यासाच्या विशेषस्वभावात आहे जो पूर्वीच अभ्यास करताना नोंदविला आहे – तो म्हणजे सामान्य अनुभव आणि विशेष अनुभवाची जोड देऊन सामान्य मनुष्याला आचारविचारांच्या आदर्शाचे धडे घालून देण्याचे कार्य अर्थान्तरन्यासाचे। कालिदासाने अर्थान्तरन्यासाचा त्या मर्माला नेमके जाणले. उदाहरण मागे अपण पाहिलेच आहे. त्याचे केवळ स्मरण–

" जातं वंशं भुवनविदिते पुष्करावर्तकानां "
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशाद् दूरबन्धुर्गतोऽहं ।
याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ।। "

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या ह्या उपयोग विशेषाचे नेमके स्वरूप एका अनामिक कवीने लक्षात

घेतले. तो म्हणतो,

अर्थान्तरस्य विन्यासे कालिदासो विशिष्यते ।।

म्हणून कालिदास उपमाकुशल असला तरी त्याने अर्थान्तरन्याच्या प्रयोगाने जे उपदेशामृत रसिकाला पाजले आहे, त्यामुळे त्याचे अर्थान्तरन्यास प्रयोगांनाही कालिदासाच्या वाङ्मय – अभ्यासामध्ये असाधारण महत्त्व आहे.

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या वापराविषयी पुनरूक्ती असली तर फलरूपगौरवस्य अदोषत्वात् या न्यायाने असे निर्देश करणे योग्य वाटते की, कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचे विषय निरनिराळे, तसेच सर्वव्यापी आणि मर्मस्पर्शी आहेत. निसर्गापासून मानवी जीवन, नैसर्गिक सत्य, सन्मित्र लक्षण इत्यादी गोष्टींचा आधार घेऊन त्याने अर्थान्तरन्यासाचा वापर केला आहे.

आणखी एक गोष्ट कालिदासाच्या बाबतीत महत्त्वपूर्ण आहे की, हा अलंकार अर्थालंकार असल्याने अर्थगौरवपूर्ण असतानाही सर्व प्रकारचे शब्दसौंदर्य अथवा पदलालित्याचा अभाव कुठेही दिसत नाही. म्हणजे अर्थालंकाराबरोबर शब्दांची अचूक निवड असल्यामुळे पदलालित्य व अर्थगौरव दिसून येतो.

कालिदासीय अभ्यासाची भावी दिशा :

असा विश्वास आहे की, कालिदासाची उपमा याचे अध्ययन केले जाते त्याप्रमाणे कादिसाच्या अर्थान्तरन्यास अलंकार प्रयोगांच्या अध्ययनाप्रमाणेच कालिदासाने वापरलेल्या इतर अलंकारांचे अध्ययन करता येईल तसेच कालिदासाप्रमाणे ग्रंथकारांनी वापरलेल्या अलंकाराचे सुद्धा अध्ययन होणे तितकेच आवश्यक आहे. प्रस्तुत प्रबंधही त्या दृष्टीने केलेला एक प्रयत्न आहे.

# : प्रकरण पहिले :

## अर्थान्तरन्यास अलंकार : सामान्य स्वरूप

– कालिदासाने आपल्या वाङ्मयमध्ये वापरलेल्या अर्थान्तरन्यास अलंकाराचा अभ्यास करण्यासाठी प्रथम अलंकार म्हणजे काय ? अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण-स्वरूप समजून यावे आणि त्याचे इतर अलंकारामध्ये स्थान काय आहे ? याचे निश्चित ज्ञान होणे आवश्यक आहे. प्रस्तुत प्रकरणामध्ये अलंकार शास्त्रातील काही महत्त्वाच्या ग्रंथांच्या आधारे अर्थान्तरन्यास अलंकाराचे शास्त्रीय स्वरूप लक्षात घेतले आहे. त्यामुळे कालिदासाच्या वाङ्मयमध्ये योजलेल्या अर्थान्तरन्यासाचे वेगळे आणि नेमके स्वरूप काय आहे हे समजून घेणे सोपे जाईल.

### १.१ अलंकाराचे सामान्य स्वरूप

#### १.१.१ : अलंकार शब्दाचा सामान्य अर्थ :

बहुधा अलंकार या शब्दाचा प्रयोग साहित्यशास्त्र ग्रंथामध्ये अलंकरण (आभूषण) या अर्थाने प्रसिद्ध आहे. संस्कृत वाङ्मयात अनेक वेळा अलंकार हा शब्द 'आभूषण' या शब्दाचा पर्यायवाची शब्द म्हणून आला आहे.[१] ते आभूषण दोन प्रकारांनी वर्णिलेले दिसते, १) बाह्य आणि २) आन्तर. उदा. १) बाह्य आभूषण – कवच, कुण्डले इ. २) आन्तर आभूषण – विद्या, विजय, शौर्य इत्यादी. ही आन्तर आभूषणे गुणांमध्ये अन्तर्भूत होतात, अलंकारात नाही. बाह्य अलंकाराचा अलंकार या अर्थाने व्यवहार होतो. उदा. अनुप्रास, यमक, उपमा, उत्प्रेक्षा, स्वभावोक्ती इत्यादी अलंकार शब्दाच्या व्युत्पत्तीतून हाच अर्थ दिसून येतो.

#### १.१.२ :अलंकार शब्दाची व्युत्पत्ती आणि अर्थ :

अलंकार हा शब्द अलं + कृ या धातूपासून बनला आहे. 'अलम्' हे अव्यय भूषण वाचक आहे. अलंकृ म्हणजे भूषण धारण करणे आणि अलंकार म्हणजे भूषविण्याची साधने – जसे – पुष्प, पुष्पहार, आभरण इत्यादी.

---

[१] सुवर्णविकारेऽलङ्कारोऽस्य सुवर्णालङ्कारः । – म.भा.(पर्व) २.२.२४ पृ २३९.
उद्वयं तमसस्परीति। एतामृचं जपन्तो यन्ति तत्तमसः पितृलोकादित्यं ज्योतिरभ्यायन्ति तेऽभ्यऽआगतेऽआञ्जनाभ्यञ्जने प्रथच्छन्त्तेषह मानुषोऽलङ्कारस्तेनैव तं मृत्युमन्तर्दधते ॥ – शत. ब्रा. १३.८.४.७ पृ १७९२
अलंकारो हि नारीणां क्षमा तु पुरुषस्य वा ।
दुष्करं तच्च वै क्षान्तं त्रिदोशेषु विशेषतः ॥ – रामा. १.33.६ पृ. ८3
अलंकारैः कवचैः केतुभिश्च मुखप्रसादैहैमवर्णैश्च नृणाम् ।
धाजिष्मती दुष्प्रतिप्रेक्षणीमा । येषां चमूस्ते विजमन्ति शत्रून् ॥ महा. ६.४.२० ( भीष्मपर्व पृ. २१ )

### १.१.3 : साहित्याशास्त्रातील अलंकाराचे स्वरुप :

अलंकाराचा सामान्य अर्थ समस्त सौंदर्शाचा पर्यायवाची आहे. वामनाने आपल्या काव्यालंकारसूत्रामध्ये याच अर्थाने हा शब्द वापरला आहे. काव्याचे लक्षण देताना तो म्हणतो की, ' काव्यं ग्राह्यमलङ्कारात् ।'[२] म्हणजे काव्याचा निष्कर्ष अलंकार आहे की, ज्याच्या आधारे काव्याची उत्कृष्टता व काव्यत्व प्रतिपादन केले जाते, इथे त्यास अलंकार या शब्दात उपमा उत्प्रेक्षादी अपेक्षित नाहीत, परंतु समग्र सौंदर्याचे हेतू असणारे रस, गुण, रीती, औचित्य आदी अभिप्रेत आहेत म्हणून त्याने सांगितले आहे की,
' सौन्दर्यमलङ्कारः ।' [3] वामनाच्या काळात अलंकार हा शब्द अगदी सामान्य अर्थाने वापरला जात होता. वामनाने उपमादी अलंकारांना अलंकारांमध्ये अन्तर्भूत करण्यासाठी असा प्रयत्न केला आहे की, अलंकृतिः अलंकारः । करणव्युत्पत्त्या पुनः अलंकार शब्द अयं उपमादीषु वर्तते । [४] म्हणजे मुख्यतः अलंकार शब्द हा सौंदर्याचा दुसरा पर्याय आहे. यावरुन गुण, रीती,
रसादी व करणदृष्टया उपमा-उत्प्रेक्षादी सुद्धा अलंकार या शब्दाने सूचित होतात.

दण्डीने काव्यादर्शामध्ये अलंकाराचे स्वरूप विवेचन केले आहे. त्याने काव्याची संपूर्ण सौंदर्यवर्धक तत्त्वे हा आधार घेऊन संधी, संध्यंगे, वृत्ती, वृत्त्यंगे, लक्षण आदी काव्याच्या सीमांमध्ये बांधून अलंकारमध्ये संगृहीत केले आहे.[५]

साहित्यामध्ये अलंकाराचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. साहित्यशास्त्राचे दुसरे रुढ झालेले नाव म्हणजे अलंकारशास्त्रात असे आहे. त्याचाच प्रभाव म्हणून साहित्यशास्त्र म्हणजे अलंकारशास्त्र असे एक समीकरणच झाले आहे. अलंकारांचे महत्त्व प्रतिपादन करताना आलंकारिक राजशेखराने अलंकाराला वेदाचे सातवे अंग मानले आहे. त्याच्या मते अलंकार हे वेदाचा अर्थ प्रकट करण्याचस उपकारक ठरतात आणि अलंकारांशिवाय वेदाच्या अर्थाचे ज्ञान सम्यक रुपाने ज्ञात होत नाही.[६]

आणखी एक गोष्ट इथे नमूद करावीशी वाटते की, जे आलंकारिक ( उदा. ध्वनिवादी आनंदवर्धनादी, रीतिसंप्रदायवादी, गुणवादी, वक्रोक्तिवादी ) काव्यामध्ये
अलंकाराचे विशद व विस्तृत विवरण दिलेले आहे. भरताने आपल्या ग्रंथात केवळ चार अलंकार सांगितले आहेत. या अलंकारांची संख्या वाढत वाढत गेली आहे. भामहाने

---

२. का.सू. अ.१ अधि. १. सू.१, पृष्ठ १, ओळ क्र. ९
3. कित्ता अ.१, अधि.१ सू.२, पृष्ठ १, ओळ क्र. १3
४. कित्ता - वृत्ति - पृ.१ ओळ क्र. १४-१५.
५. यच्च सन्धयङ्गवृत्यङ्गलक्षणाद्यागमान्तरे।
व्यावर्णितमिदं चेष्टमलंकारतर्यैव नः । काव्याद. २.3६७. पृष्ठ. 3१२
६ .उपकारकत्वादलङ्कारः सप्तमङ्गम । इति यायावरीयः । ऋते च तत्स्वरुप परिज्ञानाद्वेदार्थानवगतेः । का.मी. पृ.3, ओळ. क्र. २-3

३८, उद्भटाने ४१, वामनाने ३२, भोजाने ७२,मम्मटाने ६७, रूय्यकाने ८१, शोभाकरमित्राने १०६, जयदेवाने ९५, विद्याधराने ८०, विश्वनाथाने ८४, अप्पय दीक्षिताने ११९, भट्ट देवशंकर पुरोहिताने ११५ अशाप्रकारे त्यांची संख्या २२५ झाली आहे.[७] यावरुन हे सूचित होते की, त्यांना काव्यशरीराचे सौंदर्यात विशेष महत्त्व प्राप्त झालेले दिसते.

## १.२ : अलंकाराचे लक्षण :

दण्डीने अलंकाराचे लक्षण असे केले आहे की, ' काव्यशोभाकरान् धर्मानलङ्कारान् प्रचक्षते।' [८] म्हणजे काव्यास शोभा देणारे धर्म म्हणजेच अलंकार होत. वामनाने दण्डीच्या लक्षणाहून थोडेसे भिन्न लक्षण दिले आहे. त्याच्या मते काव्याचे जे शोभाकारक धर्म आहेत ते गुण होत [९] आणि या गुणांची वृद्धी करणारे जे धर्म असतात ते अलंकार होत. वामनाने या दोहोंतील फरक असा स्पष्ट केला आहे की, गुण हे काव्याचा स्वरुपाधायक धर्म आणि अलंकाराला उत्कर्षदायक धर्म म्हटला जातो. काव्यामध्ये गुण हे नित्य वा अनिवार्य तत्त्व असून अलंकाराचे स्वरुप नित्य वा अनिवार्य नाही.

आनंदवर्धनाने अलंकारांना अंगाश्रित मानले आहे , तो म्हणतो – '
अङ्गाश्रितास्त्वलङ्कारा मन्तव्यः कटकादिव्त ॥ ' [१०]

उत्तरकालीन मम्मट आणि विश्वनाथ यांनी अलंकारचो लक्षण देताना त्याला काव्यशरीराचा शोभाकारक बाह्यधर्म पण जो गुणांहून भिन्न असतो असे सांगितले आहे. मम्मटाचे मत असे आहे की,

उपकुर्वन्ति तं सन्तं येऽङ्गद्वारेण जातुचित् ।
हारादिववलंकारास्तेऽनुप्रासोपमादयः ॥ [११]

विश्नाथाचे मतानुसार स्वरुप असे आहे की ,

शब्दार्थयोमस्थिरा ये धर्माः शोभातिशायिनः ।
रसादीनुपकुर्वन्तोऽलंकारास्तेऽङ्गदादिवत ॥ [१२]

---

७.अलं. कोश. पृ. ४४, ओळ क्र. १६

८. काव्याद. २.१ पृष्ठ १०९

९. काव्याशोभायाः कर्तारो धर्माः गुणाः । का.सू. १. अधि.3, सू..१, पृ.२५ ओळ क्र १3.ये खलु शब्दार्थयोर्धर्माः काव्यशोभां कुर्वन्ति ते गुणाः । ते चौजःप्रसादादयः। न यमकोपमादयः । कैवल्येन तेषामकाव्यशोभाकरत्वात् । ओजः प्रसादादिनां तु केवलानामास्ति काव्यशोभाकरत्वमिति । कित्ता पृ. २५, ओळ १४ – १६.
तदतिशयहेतवस्त्वलंकारा । पृ २५, ओळ १७. तस्याः काव्यशोभायाः सू.२ अतिशयस्तदतिशयस्तस्य हेतवः । तु शब्दो व्यतिरेके । अलंकाराश्च यमकोपमादयः। ओळ क्र. १९-१९. पूर्वे नित्याः अ.१, अधि 3, सू.3, पृ.२६ ओळ क्र२. पूर्वे गुणाः नित्याः। तैर्विना काव्यशोभानुपपत्तेः । कित्ता पृ २६. ओळ क्र.3

१०. ध्वन्या. द्वितीय उद्योत. श्लोक६ पृष्ठ.२१६

११. का.प्र. अष्टम उल्लास. सू.८८, कारिका क्र.६७. पृ.४६५

१२. सा.द. दशम उल्लास कारिका क्र.१, पृ.४७१.

पंडितराज जगन्नाथाने काव्याचा आत्मा असलेल्या व्यंग्याचा रमणीयताप्रयोजक धर्म म्हणून अलंकाराचा उल्लेख केला आहे. त्याने आनंदवर्धन प्रभृती आचार्यांच्या विचारांना पुष्टी दिली आहे. ती अशी –

'काव्यात्मनो व्यङ्ग्यस्य रमणीयताल्योजका अलङ्काराः।' [१३]

या सर्व विवेचनावरून असा निष्कर्ष निघतो की, अलकार हा काव्याचा स्वाभाविक व अनिवार्य गुण नसून तो त्याचा अस्थिर धर्म आहे. तो काव्याचा आंतर गुण नसून बाह्य गुण आहे. काव्याचे सौदर्य अलंकारावर आश्रित नाही. पण त्यात अलंकार असला तर त्याचे सौंदर्य खुलून दिसते. काव्यात त्याचा समावेष हा अनिवार्य नाही. त्यामुळे त्याचा समावेश काव्यात कधी असतो तर कधी नसतो. अलंकार फक्त काव्याच्या आत्म्याला उपकारक म्हणून येतात.

## १.3 अलंकाराचे वर्गीकरण :

भरतमुनींनी एकूण ४ अलंकार सांगितले पण त्यांनी त्यांचे वर्गीकरण प्रत्यक्ष केले नाही आणि तसे सांगितले नाही. पण त्याच्या यमक अलंकाराच्या लक्षणावरून त्याच्या मते शब्दालंकार व अर्थालंकार हे दान प्रकारचे अलंकार असावेत असे वाटते. [१४]

भरतमुनीनंतर अनेक आलंकारिकांनी वेगवगळे अलंकार सांगितले आणि या अलंकारांना वर्गीकरणाचे प्रयत्न वेळोवेळी झाले. सर्वात पहिला प्रयत्न म्हणजे ' शब्द ' आणि ' अर्थ ' यांच्या आधारे ' शब्दालंकार ' आणि अर्थालंकार ' असा करण्याचा झाला. असे राजशेखरांनी कवीचे शब्दालंकारकवी आणि अर्थालंकारकवी असे वर्गीकरण केले आहे. त्यावरुन सूचित होते.[१५]

अशाप्रकारे वर्गीकरण भामहानेही केले आहे. ते असे – 'शब्दाभिधेयालङ्कारभेदादिष्टं द्वयं तु न । [१६] ( आम्हांला शब्द आणि अर्थ नावाचे भेदांनी हे दोन्ही अलंकार इष्ट आहेत.)

वाचां वक्रार्थशब्दोक्तिरलङ्काराय कल्पते । [१७]

(वाणीमध्ये शब्द आणि अर्थ यांची वक्रता अलंकारास

(उत्पत्तीला) कारण होते)

काही आलंकारिकांनी अलंकाराची मांडणी त्रिवर्गामदध्ये केलेली दिसते. १) शब्दालंकार २) अर्थालंकार आणि 3) उभयालंकार.

---

१3. रस गंगा. द्वितीयानन पृ.९२. ओळ क्र. 3–४
१४. शब्दाभ्यासस्तु यमकं पादादिषु विकल्पितम् । नाटय. अ.१६, श्लोक ६२. पृ.२६२. ओळ क्र १०
१५. द्विधाऽलङ्कावरकविः शब्दार्थभेदेन। का.मी. पंचम पृ. १८, ओळ.क्र. १५.
१६. काव्यालं (भा) १.१५. पृष्ठ ४७
१७. कित्ता. ५.६६. पृष्ठ १००

भोजाने 'सरस्वतीकण्ठाभरण' नामक ग्रंथात शब्दालंकार व अर्थालंकार यांच्या विवेचनानंतर 'उभयालंकारा' च्या विवेचनासाठी स्वतंत्र चौथा परिच्छेद लिहिला आहे. त्याने प्रत्येकी २४ अलंकार सांगितले आहेत. आचार्य रुय्यक सुद्धा अलंकाराच्या वर्गीकरणाची ' त्रिवर्गाची मूलपरंमरा सांगून त्याचे दृढीकरण करतो. तो म्हणतो की, –

इहार्थपौनरुक्त्यं शब्दार्थपौनरुक्त्यं शब्दार्थपौनरुक्त्य चेतित्रयः पौनरुक्त्य प्रकाराः ॥ [१८]
एवमेते शब्दार्थोभयालंकाराः संक्षेपतः सूत्रिता : ॥ [१९]

रुय्यकाने अर्थालंकाराचे वर्गीकरणास वैज्ञानिक आधार देण्याचा प्रथम प्रयत्न केला आहे. त्याने या प्रकारच्या अलंकारांना ५ वर्गात विभाजन केले आहे. ते असे –
१) सादृश्यगर्भ, २) विरोधगर्भ, 3) शृंखलागर्भ
४) न्यायमूलगर्भ आणि ५) गूढार्थप्रतीतिमूलक वर्ग.

उद्‍भटाने मात्र अलंकार-विवेचनाच्या क्षेत्रात नवीन पद्धतींचा अवलंब करुन त्याने पहिल्यांदाच अलंकारांना ६ वर्गामध्ये विभाजित केले. त्यासाठी त्याने कोणताही आधार सांगितला नाही.

रुद्रटाने ४ तत्त्वांच्या आधारे अलंकाराचे वर्गीकरण केले. ते असे – १) वास्तव, २) औपम्य, 3) अतिशय आणि ४ ) श्लेष.[२०]

विद्याधराने यथासंभव रुय्यकाचे वर्घीकरण स्पष्ट रुपाने मांडण्याचा प्रयत्न केला आहे. त्याने ७ वर्गात अलंकारांचे विभाजन केले आहे. ते असे – १) सादृश्यवर्ग, २) विरोधगर्भ, 3) शृंखलागर्भ, ४) तर्कन्यायमूल, ५) वाक्यन्यायमूल, ६) लोकमान्यमूल आणि ७) गूढार्थप्रतीतिमूल.

विद्यानाथाचे वर्गीकरण रुद्रट, रुय्यक आाणि विद्याधर यांच्यावर आधारित आहे. त्यांनी शब्दालंकार, अर्थालंकार आणि उभयालंकार यांच्या रुपात मांडणी केली आहे. तसेच अर्थालंकारांचे काही वर्गामध्ये पुन्हा विभाजन केले आहे.

प्रस्तुत संदर्भामध्ये अलंकारांचे वर्गीकरण करणे इथे अभिप्रेत नाही. तथापि फक्त अर्थान्तरन्यास अलंकार की जो प्रस्तुत प्रबंधाचा अभ्यास विषय आहे, त्याचा अंतर्भाव या वर्गीकरणात कुठे होतो त्याचा निर्देश करण्यासाठी इथे अलंकारांच्या वर्गीकरणाचा नाममात्र निर्देश केला आहे.

---

१८. अलं.सर्व.सञ्जी. सूत्र १, पृष्ठ २3
१९. कित्ता. सूत्र.८७. पृष्ठ 3७६
२०. अर्थस्यालंकाराः वास्तवौपम्यमति श्लेषः ।
[illegible] तु भवन्ति निःशेषाः ॥ काव्यालं ( रुं) ७.९ पृ. १९७

## १.४ : अर्थान्तरन्यास अलंकार : लक्षणविचार

प्रस्तुत प्रबंधाचा आधार अर्थान्तरन्यास अलंकार असल्यामुळे त्याचे स्वरुप आणि यथार्थ विवेचन सुरुवातीस करणे आवश्यक आहे. या अलंकाराचे मूळ समर्थ्य – समर्थक भाव आहे. भामह–दण्डीपासून विसाव्या शतकातील आलंकारिकांनी दिलेले जे लक्षण आहे, त्याच्यात विशेष नावीन्य तात्त्विक दृष्टया नाही. तरी देखील त्या त्या अलंकारशास्त्रज्ञांनी या अलंकाराचे काय लक्षण दिले आहे आणि त्याच्या लक्षणात काय काय फरक आहे ? तसेच त्या लक्षणाच्या आधारे या अलंकाराचे किती प्रकार पडतात हे जाणून घेण्यासाठी प्रस्तुत प्रबंधामध्ये प्रत्येक आलंकारिकांच्या विचारांचे ऐतिहासिक दृष्टिने विवेचन केले आहे. कदाचित या विवेचनामध्ये पुनरावृत्ती आढळेल तरीही त्याचे विवेचन करणे आवश्यक आहे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यास अलंकाराचे यथार्थ आकलन होण्यासाठी त्याचे सामान्य स्वरुप काय आहे हे समजण्याच्या दृष्टीने त्याचा विचार प्रस्तुत प्रकरणात केला आहे. त्यामुळे अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण व त्याचे प्रकार चांगल्या प्रकारे समजतील.

### १. भामह (इ.स. ६ वे शतक)

साहित्यशास्त्रकारांमध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण पहिल्यांदा भामहाने मांडले. त्याच्या 'काव्यालंकार' नामक ग्रंथात ते पुढीलप्रमाणे आले आहे :–

उपन्यसनमन्यस्य यदर्थस्योदितादृते ।
ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः पूर्वार्थानुगतो यदि ॥ [२१]

त्याच्या मतानुसार पूर्वोक्त अर्थाने युक्त परंतु त्या पूर्वोक्ति अर्थाहून भिन्न अशा अर्थाचे विधान जेव्हा केलेले असते तेव्हा अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

पूर्वोक्त अर्थाच्या सिद्धीसाठी योजलेल्या ' हि ' या पदाने देखील कारण हा अर्थ स्पष्टपणे प्रतिपादिला जातो. म्हणून ' हि ' सारख्या शब्दांनी हा अलंकार चांगल्या प्रकारे सूचित होतो. हेतू अर्थाच्या विस्तारामुळे ' हि ' (शब्द श्लोकात योजलेला असेल तर ) शब्दाने अर्थान्तरन्यास सूचित होतो.[२२]

### २. दण्डी ( इ.स. ६००–७०० )

आचार्य दण्डीने काव्यादर्शमध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण असे दिले आहे की,

ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किंचन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योऽन्यस्य वस्तुनः ॥[२३]

---

[२१] काव्यालं ( भा ) २.७१ पृष्ठ क्र ६७
[२२] 'हि' शब्देनापि हेत्वर्थपथनादुक्तसिऽद्धये ।
अयमर्थान्तरन्यासः सुतरां व्यज्यते यथा ॥ कित्ता २.७३ पृष्ठ क्र.६७
[23] काव्याद – २.१६९ पृ. १९९ – २००

### ३. शिलामेघसेन ( इ.स. ७ वे शतक )

शिलामेघसेनाने आपल्या सियबसलकर (स्वभाषालंकार) नावाच्या ग्रंथात या अलंकाराविषयी असे म्हटले आहे –

वस्तु प्रस्तुत्य किञ्चन तत्साधनसमर्थस्य ।
न्यासो योऽन्यस्य वस्तुतः ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः ॥ [२४]

### ४. उद्भट ( इ.स. ८ वे शतक )

उद् भटने काव्यालंकारसारसंग्रह नामक ग्रंथ लिहिला आहे. त्यांनी अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण दिलेले नाही, त्यामुळे आधुनिक विद्वान डॉ. ब्रह्ममित्र अवस्थी यांचे मत मान्य करता येणार नाही. त्यांनी अलंकारकोश नामक ग्रंथात असे म्हटले आहे, 'उद् भट्ने भामह स्वीकृत अनुगति एवं दण्डी स्वीकृत साधन सामर्थ्य समर्थक भाव के अन्दर समाहित करके पूर्व आचार्योंकी अपेक्षा अधिक स्पष्ट लक्षण दिया है ।[२५]

डॉ. मथुरानंदन कुलश्रेष्ठ यांनी अर्थातरन्यास अलंकार नामक आपल्या ग्रंथात असे म्हटले आहे– 'तात्पर्य यह है की उद् भट के अनुसार सामान्यसे विशेष का समर्थनही अर्थान्तरन्यास है । इसके क्षेत्रमें विशेषसे सामान्य का समर्थन नही आता '। [२६] पण हे मतही स्वीकार्य वाटत नाही. कारण उद् भट्ने दिलेली चार उदाहरणे सर्वच्या सर्व सामान्याद्वारा विशेषाच्या समर्थनावर आधारित आहेत. पण त्यातून त्यास विशेषद्वारा सामान्याचे समर्थन मान्य नाही असा निष्कर्ष काढणे योग्य नाही. त्यांनी लक्षणाचे मूळ समर्थ्य – समर्थक भाव आहे. इथे सामान्य विशेष भावाचा काही निर्देश केलेला नाही.[२७]

### ०५. वामन (इ.स. ८ वे शतक )

वामनाने आपल्या काव्यालंकारसूत्र या ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे -

उक्तसिद्ध्यै वस्तुनोऽर्थान्तरस्यैव न्यसनमर्थान्तरन्यासः। [२८]

त्याचे हे लक्षण भामह , दण्डी व रूद्रट यांच्या लक्षणाशी जुळणारे आहे.

श्लोकात प्रथम सांगितलेल्या अर्थाच्या सिद्धिसाठी (अथवा समर्थनासाठी) अन्य अर्थाचे वाक्य प्रस्तुत करणे म्हणजे अर्थान्तरन्यास होय. अर्थाचे ज्ञान झाले असता हेतुप्रस्तुत करणे म्हणजे अर्थान्तरन्यास नव्हे.[२९] हा अलंकार हेतुरूप असतो. यांत दोन भिन्न वाक्ये असतात. पैकी एक वाक्य समर्थ्य असते व दुसरे

---

[२४] सि.ब.ल. - श्लोक क्र. २९२ अलं. कोष. पृ.८१
[२५] अलं.कोश – पृष्ठ क्र. ७3 ओळ क्र. १५ – १७
[२६] अर्था. अलं – पृष्ठ क्र. ८६
२७ समर्थकस्य पूर्वं यद्वचोऽन्यस्य च पृष्ठतः ।
विपर्ययेण वा यत्स्याद्धिशब्दोक्त्याऽन्यथाऽपि वा ॥
ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः – का.सा.सं.२.६–७ पृष्ठ क्र. २3
[२८] का.सू. ४.3.२१ पृष्ठ क्र. ५५ ओळ क्र. 13
[२९] वस्तुग्रहणादर्थस्य हेतोर्न्यसनं नार्थान्तरन्यास : । कित्ता पृष्ठ क्र. ५५ ओळ क्र. १५

वाक्य समर्थक असते. समर्थक वाक्य असते. समर्थक वाक्य हाच अर्थांतरन्यास असतो आणि तो हेतू आहे असे वामनाने सांगितलेले आहे. जेव्हा अशा प्रकारचे समर्थक वाक्य नसेल तेव्हा हा अलंकार होत नाही. याच्या स्पष्टीकरणासाठी त्याने पुढील उदाहरण दिले आहे. 'इह नातिदूरगोचरमस्ति सरः । कमलसौगन्ध्यात् इति ।[30] (इथे सरोवर फार दूर नाही (कारण) कमळाचा सुगंध येत आहे) या उदाहरणात हेतूच्या प्रस्तुतीमुळे वस्तूचे ज्ञान होते. पण येथे समर्थ्य समर्थक भावाच्या अभावी हा अलंकार होत नाही.

अन्वय व व्यतिरेक या दोन प्रकारचा हेतू असतो. अर्थान्तरन्यास अलंकारातील हेतू अन्वयी असतो. तो व्यतिरेकी असल्यास हा अलंकार व्यतिरेकाहून भिन्न नाही असे काही मानतात. यानंतर रुद्रटाचे विचार दिले आहेत.

## ०६. रुद्रट : (इ.स. ८२५-८५०)

रुद्रटचा 'काव्यालंकार' नामक ग्रंथ लिहिला. त्यामध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे -

धर्मिणमर्थविशेषं सामान्यं वाभिधाय तत्सिद्ध्यै
यत्र सधर्मिकमितरं न्यस्येत्सोऽर्थान्तरन्यासः ॥[31]

## ०७. जिनसेनाचार्य (इ.स. ८१५ - ८७७)

अलंकारचिन्तामणी नामक ग्रंथात जिनसेनाचार्यांनी अर्थान्तरन्यासाचे लक्षण खालीलप्रमाणे सांगतात-

ससामान्य विशेषत्वात् कार्यकारणभावतः ।
प्रकृतं यत्समर्थ्यं स्यादर्थान्तरन्यसनं तम् ॥[32]

सामान्य विशेषभावाने किंवा कार्यकारणभावाने प्रकृताचे ( प्रस्तुताचे )समर्थन केले असता अर्थान्तरन्यास अलंकार होतो. जिनसेनाचार्यानंतर व्यासमहर्षीची मते याबाबतची मते मांडली आहेत.

## ०८. व्यास महर्षी ( इ.स. १० वे शतकापूर्वी )

व्यास महर्षींनी अग्निपुराण व विष्णुधर्मोत्तरपुराण या दोन ग्रंथांत अर्थान्तरन्यासाची लक्षणे सांगितलेली आहेत. त्यांतील एकेकाचा क्रमशः विचार असा -

अग्निपुराण-भवेदर्थान्तरन्यासः सादृशेनोत्तरेण सः ।[33]

उत्तर वाक्याशी पूर्ववाक्याचे सादृश्य असताना अर्थान्तरन्यास अलंकार होतो. ह्या लक्षणामध्ये दोन वाक्यांतील (पूर्वोत्तर) अर्थाचे सादृश्य सांगितले आहे. त्यामध्ये समर्थ्य-समर्थक भाव स्पष्ट सांगितलेला दिसत नाही.

---

[30] किता - पृष्ठ क्र. ५५ ओळ क्र. १५-१६
[31] काव्यालं ( रु ) ८.७९ पृ क्र. २७९
[32] अलं. चिन्ता, चतुर्थ परिच्छेद श्लोक ७४ पृष्ठ ८९

विष्णुधर्मोत्तर पुराण -

उपन्यासस्तन्यः स्यात्प्रस्तुताद्यत्क्वचिद् भवेत् ।

तत्साधनसमर्थस्य न्यासो पूर्वार्थानुगतो यदि ॥ [३४]

जर पूर्वी ज्ञात असलेला अर्थ उपन्यास म्हणून प्रस्तुत केला असेल तर त्याहून वेगळा असलेला त्याचे समर्थसाधन असलेला न्यास म्हणजे अर्थान्तरन्यास होय.

यानंतर कुन्तकाचे मत मांडले आहे.

## ०९. कुन्तक ( इ.स. ९५० – १०५० )

कुन्तकाने आपल्या ' वक्रोक्तिजीवितम् ' या ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे–

वाक्यार्थान्तरविन्यासो मुख्यतात्पर्यसाम्यतः ।

ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः यः समर्थकतयाहितः ॥ [३५]

मुख्य अर्थात प्रस्तुत अथवा प्रस्तावकाच्या द्वारा अधिकृत प्रधानभूत ( वस्तूच्या ) तात्पर्याच्या सादृशामुळे दुसऱ्या व्याक्यार्थाचा न्यास ( निवेश ) केला असता अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

कुन्तकाने असेही सांगितले आहे की अर्थान्तर हे वाचार्थरूप झाले पाहिजे, फक्त पदार्थ नव्हे.[३६]

यानंतर मम्मटाचे मत मांडले आहे.

## १०. मम्मट ( इ.स. १०५० – ११०० )

मम्मटाने काव्यप्रकाश नामक ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण दिले आहे.

सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते ।

यत्तु सोऽन्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा ॥ [३७]

जिथे सामान्याद्वारा विशेषाचे अथवा विशेषद्वारा सामान्याचे समर्थन केले जाते, तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. हे समर्थन साधर्म्याने अथवा वैधर्म्याने होऊ शकते.

मम्मटानंतर रुय्यकाचे मत दिले आहे.

## ११. रुय्यक ( इ.स. ११३५ – ११५० )

सामान्यविशेषकार्यकारणभावाभ्यां निर्दिष्टप्रकृतसमर्थनमर्थान्तरन्यासः । [३८]

एखाद्या निर्दिष्ट ( सांगितलेल्या ) प्रकृत अर्थाचे सामान्य – विशेष भावाने ( अथवा ) कार्यकारणभावाने समर्थन होते तेव्हा अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

---

[33] अग्नि पु. अ. ३४४ श्लोक क्र. २४, पृ ७०४, ओळ क्र. १४

[३४] वि.ध.पु. खंड 3 अ.१४ श्लोक क्र. ८

[३५] वक्रो. जी. 3.3८ पृ. ३९८

[३६] कित्ता पृ. ३९८, ओळ क्र. 13

[३७] का.प्र. दशम उल्लास, सू.१६५ कारिका क्र. १०९, पृष्ठ क्र. ६६१

[३८] अलं. सर्व. सञ्जी. सू. ३५, पृ. २०१

अलंकार सर्वनामामध्ये रुय्यकाने लक्षण देताना त्याने जिनसेनाचार्यांचे अनुकरण केलेले दिसते. यानंतर वाग्भट (द्वितीय) याच्या मताचा विचार केला आहे.

**१२. वाग्भट (प्रथम) ( इ.स. ११३६ – ११४३)**

वाग्भटालंकार नामक ग्रंथामध्ये वाग्भटाने अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण खालील प्रमाणे दिले आहे.

उक्तसिद्ध्यैमन्यार्थन्यासो व्याप्तिपुरः सरः ।
कथ्यतेऽर्थान्तरन्यासः श्लिष्टोऽश्लिष्टश्च स द्विधा ॥ [३९]

जिथे प्रस्तुत अर्थाच्या सिद्धीसाठी व्याप्तीपूर्वक अन्य अर्थाचा न्यास प्रस्तुत केला जातो तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. तो श्लिष्ट व अश्लिष्ट असा दोन प्रकारचा असतो.

यानंतर भोजाचे मताची चर्चा केली आहे.

**१३. भोज ( इ.स. १०२५ – १०५० )**

भोजाने 'सरस्वतीकण्ठाभरणम्' या ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.

ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किञ्चन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योऽन्यस्य वस्तुनः ॥ [४०]

भोजाने प्रस्तुतचे लक्षण हे दण्डीने दिलेल्या अर्थान्तरन्यासाचे लक्षण शब्दशः दिले आहे. [४१]
यानंतर हेमचंद्राचे विचार मांडले आहेत.

**१४. हेमचंद्र : ( इ.स. ११२५- ११७५ )**

'काव्यानुशासन' नामक ग्रंथात हेमचंद्राने अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे.

विशेषस्य सामान्येन साधर्म्यवैधर्म्याभ्यां समर्थनमर्थान्तरन्यासः। [४२]

विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने वा वैधर्म्याने समर्थन केले असता अर्थान्तरन्यास अलंकार होतो यानंतर विवेचन केले आहे. यानंतर शोभाकरमित्राच्या मताचा विचार करणे उचित ठरेल.

**१५. शोभाकरमित्र ( इ.स. ११५० – १२०० )**

शोभाकरमित्राने आपल्या ' अलंकाररत्नाकर ' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे केले आहे :

---

[३९] वा.लं. चतुर्थ परिच्छेद. श्लोक क्र. १२, पृष्ठ क्र. २४२
[४०] सर. कण्ठा. ४.६९ पृष्ठ क्र. २१५
[४१] काव्यद. २.१६९ पृष्ठ क्र. १९९-२००
[४२] काव्यानु. ( हेम. ) अ.६ सू.१९. पृ. क्र. ३८४ ओळ क्र. ५ – ६

विशेषस्यान्येन समर्थनमर्थान्तरन्यास : ।[४३]

जेथे विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन केले जाते तिथे अर्थान्तरन्यास नामक अलंकार होतो. त्याला विशेषद्वारा सामान्याचे समर्थन मान्य नाही असे दिसते.
यानंतर जयदेवाचा विचार करणे उचित ठरेल.

## १६. जयदेव ( इ.स. १२ – 13 वे शतक )

जयदेवाने आपल्या ' चन्द्रालोकः ' या ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण असे दिले आहे. –

भवेदर्थान्तरन्यासोऽनुषक्तार्थान्तरभिधा ।[४४]

जिथे उक्त अर्थाचे समर्थन मुख्यार्थाने (अभिधा) केले जाते, तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. या लेखकाचे वैशिष्ट यम्हणजे त्याने श्लोकातील एका चरणात अलंकाराचे लक्षण देऊन दुसऱ्या चरणात उदाहरण दिले आहे. या ग्रंथातील बहुतेक उदाहरणे स्वरचित आहेत.

यानंतर विद्याधराच्या मताचा विचार केला आहे.

## १७. विद्याधर : ( इ.स. १3 वे शतक )

विद्याधराने 'एकावली' नामक ग्रंथ रचला आहे. त्यामध्ये त्याने अर्थान्तरन्यासाविषयी असे म्हटले आहे.

सामान्येन विशेषः सामान्यं वा यदा विशेषेण ।
कथितः समर्थ्यतेऽर्थो भवति तदाऽर्थान्तरन्यासः ।।[४५]

जेथे सामान्यद्वारा विशेषाचे अथवा विशेषद्वारा सामान्याचे समर्थन होते तेथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. विद्याधराने केवळ साधर्म्यमूलक प्रकार मानले आहेत. यानंतर संघरक्खिताचे मत मांडले आहे.

## १८. संघरक्खित ( इ.स. १3 वे शतक )

संघरक्खिताने 'सुबोधालंकार' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराविषयी असे म्हटले आहे.

ञेयो सोत्थन्तरन्यासो वाक्यस्स साधनो ।
सव्व व्यापि विसेसट्ठो [illegible] विसिट्ठस्स भेदतो ।।[४६]

जो दुसऱ्या वाक्याच्या अर्थाची सिद्धी करतो तसेच जो सर्वव्यापक असून एका विशिष्ट अर्थाहून दुसरा विशिष्ट अर्थ वेगळा करून सांगतो तो अर्थान्तरन्यास होय. यानंतर अमृतानंद योगी यांचे मत पाहणे उचित ठरेल.

---

[४३] अलं. रत्ना. सूत्र ७६६, पृष्ठ क्र. १२९ ओळ क्र. २१
[४४] चन्द्रा. पंचम मयुख. श्लोक क्र. ६८, पृष्ठ क्र. ८५
[४५] एका. २८ पृष्ठ क्र. २८२
[४६] सुबोधालं. – श्लोक क्र. २४१ / अलं. कोश. पृ ८3

## १९. अमृतानंदयोगी (इ.स. 13 वे शतक)

अमृतानंदयोगीच्या ' अलंकारसंग्रह ' ग्रंथातील अर्थान्तरन्यासाचे लक्षण असे आहे –

प्रस्तुतार्थस्य सिध्यर्थं विन्यासोऽर्थान्तरस्य यः ।
असावर्थान्तरन्यासो भिद्यते बहुधा यथा ॥ [४७]

प्रस्तुत अर्थाच्या सिद्धीसाठी दुसऱ्या वस्तूचा विन्यास केल्यास अर्थान्तरन्यास अलंकार होतो. यानंतर विद्यानाथाचा विचार करणे ओघाने प्राप्त आहे.

## २०. विद्यानाथ ( इ.स. 1300 – १३२५ )

विद्यानाथाने आपल्या ' प्रतापरुद्रीय ' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

कार्यकारणसामान्यविशेषाणां परस्परम् ।
समर्थनं यत्र सोऽर्थान्तरन्यास उदाहृतः ॥ [४८]

जिथे कार्यकारण-भाव आणि सामान्य-विशेष-भाव यांनी प्रकृताचे समर्थन केले जाते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. यानंतर श्रीवत्सलाञ्छन भट्टाचार्यांचं मत मांडले आहे.

## २१. श्रीवत्सलाञ्छन भट्टाचार्य (इ.स.१३२३-१३८०

श्रीवत्सलाञ्छन भट्टाचार्यांनी आपल्या 'काव्यपरीक्षा' नावाच्या ग्रंथात अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण खालीलप्रमाणे आहे –

सामान्यं वा विशेषो वा यदन्येन समर्थ्यते ।
ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा [४९]॥

जेथे सामान्याचे वा विशेषाचे अनुक्रमे विशेषद्वारा अथवा सामान्याद्वारा साधर्म्याने अगर वैधर्म्याने समर्थन केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.
यानंतर विश्वेश्वर कविचन्द्राचे विचार मांडले आहेत.

## २२. विश्वेश्वर कविचन्द्र ( इ.स. १३६० )

विश्वेश्वर कविचन्द्राने आपल्या ' चमत्कारचन्द्रिका ' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे. –

ज्ञेयस्सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किञ्चन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो वस्त्वन्यवस्तुनः [५०]॥

---

[४७] अलं.सं – पंचम परिच्छेद ओळ क्र. ८ – ९. पृष्ठ क्र. 3९
[४८] प्र.रु. श्लोक क्र. २२२ पृष्ठ क्र. 303
[४९] का.प. पञ्चम उल्लास कारिका क्र. ८६ पृ क्र. ९४
[५०] च.चद्रि. – अष्टम विलास कारिका क्र. ४९ पृष्ठ क्र. १७२

प्रस्तुत अर्थाला साधण्यास समर्थ अशा दुसऱ्या अर्थाचा न्यास म्हणजे प्रयोग केला असता तिथे अर्थान्तरन्यास अलंकार जाणावा. यानंतर धर्मसुरीच्या मताचा विचार केला आहे.

## २३. धर्मसुरी ( इ.स. १४वे शतक )

'साहित्यरत्नाकर ' नामक ग्रंथात धर्मसुरीने असे म्हटले आहेः

सामान्यं वा विशेषेण विशेषो वा तदन्यतः ।
समर्थ्यते यत्र तत्रार्थान्तरन्यास ईरितः ॥ [५१]

जेथे सामान्याचे विशेषद्वारा अथवा विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन केले जाते तेथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. या लक्षणात साधर्म्य- वैधर्म्याचा उल्लेख नाही.
यानंतर वाग्भट ( द्वितीय ) यांचे मत मांडले आहे.

## २४. वाग्भट ( द्वितीय ) (इ.स. १४ वे शतक )

वाग्भटाने आपल्या ' काव्यानुशासन ' या ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.

विशेषस्य सामान्येन समर्थनमर्थान्तरन्यासः । साधर्म्येण वैधर्म्येण च । [५२]

विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन म्हणजेच अर्थान्तरन्यास होय. हे समर्थन साधर्म्यमूलक व वैधर्म्यमूलक असते.
यानंतर विश्वनाचे मत मांडले आहे.

## २५. विश्वनाथ ( इ.स. १४ वे शतक )

विश्वनाथाने आपल्या 'साहित्यदर्पण' नामक ग्रंथामध्ये 'अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे -

सामान्यं वा विशेषेण विशेषस्तेन वा यदि ।
कार्यं च कारणेदं कार्येण च समर्थ्यते ॥ [५३]

विश्वनाथाने पूर्ववर्ती आचार्यांच्या मताचा विचार करून स्वतःचे लक्षण दिले आहे.
यानंतर पुञ्जराजाचे मत मांडले आहे.

## २६. पुञ्जराज : (इ.स. १४९० - १५००)

'शिशुप्रबोधकाव्यालंकार' नावाचा ग्रंथ पुञ्जराजाने लिहिला. त्याच्या या ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण असे दिले आहे -

---

[५१] सा.र. सप्तम तरंग पृष्ठ क्र. ६४८ ओळ क्र. ५ - ६
[५२] काव्यानु. ( वा) अ.3 पृष्ठ क्र. 3८ ओळ क्र. २१

[५३] सा.द. दशम परिच्छेद, कारिका क्र. ६१, पृष्ठ क्र. ५७६

वाक्यार्थं प्रस्तुतं साध्यं यो हि साधयितुं क्षमः ।
वाक्यार्थोऽन्यः स उक्तोऽर्थान्तरन्यासो विचक्षणैः ॥ [५४]

जो वाक्यार्थ प्रस्तुत साध्य वाक्यार्थाला साधनक्षय आहे, त्या ठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार असतो असे त्यांनी सांगितले आहे.

या नंतर अ प्पय दीक्षितांच्या लक्षणाचा विचार केला आहे.

२७. अप्पय दीक्षित : ( इ.स. १५६३-१५७३ )

अप्पय दीक्षिताने आपल्या 'कुवलयानंद' नामक ग्रंथात या अलंकाराचे लक्षण असे सांगितले आहे -

उक्तिरर्थान्तरन्यासः स्यात्सामान्यविशेषयोः । [५५]

हे लक्षण स्पष्ट वाटत नाही. सामान्य व विशेष यांचे वर्णन करणारा तो अर्थान्तरन्यास होय असे इथे म्हटले आहे. केवळ सामान्य विशेषाबद्दल बोलण्याने हा अलंकार होत नाही. ते कसे बोलावे हे सांगितले नाही. पण इथे असे दिसते की सामान्य सांगून विशेषाचे वर्णन म्हणजे समर्थन आणि विशेष सांगून सामान्याद्वारा त्याचे वर्णन म्हणजे समर्थन केलेले असते. यानंतर विश्वनाथदेवांचे मत मांडले आहे.

२८. विश्वनाथदेव ( इ.स. १५९२ )

'साहित्यसुधासिन्धु ' नामक ग्रंथात या अलंकाराविषयी विश्वनाथदेव यांनी असे म्हटले आहे

सामान्यविशेषयोः समर्थ्यसमर्थकभावो यत्र स अर्थान्तरन्यास इति लक्षणम् । [५६]

सामान्य व विशेष यांच्यांत समर्थ्य-समर्थक भाव जिथे असतो तिथे तो अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर सुधीन्द्रतीर्थश्रीपाद यांच्या मताचा विचार करणे उचित ठरेल.

२९. सुधीन्द्रतीर्थश्रीपाद (इ.स.१५६१-१६१४ )

सुधीन्द्रतीर्थश्रीपाद यांनी आपल्या ' अलंकामञ्जरी ' नामक ग्रंथात या अलंकाराचे लक्षण दिले आहे -

अर्थान्तरन्यासः उक्तः चेत्सामान्यविशेषयुक् । [५७]

जेथे सामान्य-विशेषसंबंध ( युक ) असतो तिथे अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला जातो. या ग्रंथकाराचे वैशिष्ट्य म्हणजे त्याने एका चरणात अलंकाराचे लक्षण सांगून दुसऱ्या चरणात उदाहरण दिले आहे. यानंतर कविकर्णपूराच्या मताचा विचार ओघाने प्राप्त आहे.

30. कविकर्णपूर : ( इ.स. १६वे शतक )

---

[५४] शि.प्र.का.ल. - श्लोक क्र. १०७ पृष्ठ क्र. ६3

[५५] कुवल. पृष्ठ क्र. १3१ ओळ क्र. 3

[५६] सा.सु.सिं. अष्टम तरङ्ग पृष्ठ क्र. ४६८ ओळ क्र १०-११

[५७] अलं.मञ्ज. ( सुधी.) पृ.१२० क्र. ६

कविकर्णपूराने आपल्या ' अलंकारकौस्तुभ ' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे-

यस्मिन् विशेषः सामान्यं समर्थ्येत परेण यत् ।
साधर्म्यादथ वैधर्म्यात् स न्यासोऽर्थान्तरस्य हि ॥[५८]

जेथे विशेषाचे सामान्याद्वारा तसेच सामान्याचे विशेषद्वारा साधर्म्याने अथवा वैधर्म्याने समर्थन केलेले असते, तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. यानंतर पंडितराज जगन्नाथांचे मत दिले आहे.

### ३१.पंडितराज जगन्नाथ- ( इ.स. १६१०-१६५० )

पं. जगन्नाथ यांनी या अलंकाराचे लक्षणाबाबत असे म्हटले आहे -

सामान्येन विशेषेण सामान्यस्य वा यत्समर्थनं तदर्थान्तरन्यासः ॥ [५९]

विशेषाचे सामान्याद्वारा अथवा सामान्याचे विशेषद्वारा (साधर्म्य वा वैधर्म्य मूलक) समर्थन केले जाते, तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. प्रस्तुतचे लक्षण मम्मटाच्या लक्षणावर आधारित आहे. यानंतर भावदेवसुरी यांचे मत मांडले आहे.

### ३२. भावदेवसुरी - (इ.स. १७ वे शतक)

'काव्यालंकारसार ' मध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण देताना भावदेवसुरी असे म्हणतात - भवेदर्थान्तरन्यासोऽर्थान्तरं प्रस्तुतानुगम् ॥[६०]

ज्याठिकाणी प्रस्तुताचे अन्यार्थाने समर्थन होते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. एका चरणात व्याख्या आणि दुसऱ्या चरणात उदाहरण हे या कवीचे वैशिष्ट्य आहे. यानंतर चिरंजीवाच्या मताचा विचार केला आहे.

### ३३. चिरंजीव (इ.स. १६७५ - १७५०)

'काव्यविलास ' नामक ग्रंथात चिरंजीवाने अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे

भवेदर्थान्तरन्यासोऽनुषक्तार्थान्तराभिधा ॥[६१]

या ग्रंथकाराने जयदेवाने दिलेले लक्षण जसेच्या तसे दिले आहे.[६२]

यानंतर भट्ट देवशंकर पुरोहित यांचे मत मांडले आहे.

### ३४.भट्ट देवशंकर पुरोहित (इ.स. १७६५)

भट्ट देवशंकर पुरोहित यांनी ' अलंकारमञ्जूषा ' नामक ग्रंथ लिहिला असून त्यामध्ये त्यांनी प्रस्तुत अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.

सामान्ये प्रस्तुतेऽन्यस्य विशेषे प्रस्तुतेऽपि च ।
उक्तिरर्थान्तरन्यासऽलङ्कारः कथितो बुधैः ॥ [६३]

---

[५८] अलं. कौस्तु. (कर्ण ) ८.२७४ पृ. क्र. ३१४

[५९] रस. गंगा. पृष्ठ क्र. ६६९ ओळ क्र. ३०४

[६०] का.लं.सा. अ.६ श्लोक क्र. १९ पृष्ठ क्र. ३५१

[६१] का.वि. २.३६ ( उत्तरार्ध ). पृष्ठ क्र. ३३ ओळ क्र. २

सामान्य प्रस्तुताचे अथवा वर्णनीय वस्तूचे विशेषद्वारा समर्थन अथवा प्रस्तुत विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन जिथे केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर नरसिंह कवीच्या मताचा विचार करणे ओघाने प्राप्त आहे.

### ३५. नरसिंहकवी ( इ.स. १७३४ – १७७० )

आपल्या ' नञ्जराजयशोभूषण ' नामक ग्रंथात नरसिंह कवी अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगतात –

सामान्यं वा विशेषेण विशेषो वा ततोन्यतः ।
समर्थ्यते तत्रार्थान्तरन्यास ईरितः ॥[६४]

ज्या ठिकाणी सामान्याचे विशेषद्वारा अथवा विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन केलेले असते त्या ठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर हरिप्रसादाचे मत मांडले आहे.

### ३६. हरिप्रसाद ( इ.स. १७२७ )

हरिप्रसाद या ग्रंथकाराने आपल्या ' काव्यालोक ' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रकारे दिले आहे–

सामान्येन विशेषो यत्र विशेषेण सामान्यम् ।
उभयं समर्थ्यमानं क्रमेणार्थान्तरन्यासः ॥ [६५]

जेथे विशेषाचे सामान्याद्वारा अथवा सामान्याचे विशेषद्वारा दोघांचे दोन्ही प्रकारांनी समर्थन केले जाते तेथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर श्री विद्याभूषण यांचे मत मांडले आहे.

### ३७. श्री विद्याभूषण ( इ.स. १८वे शतक )

अर्थान्तरन्यासाचे लक्षण सांगताना श्री विद्याभूषण यांनी आपल्या ' साहित्यकौमुदी ' नामक ग्रंथात असे सांगितले आहे –

सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते ।
यत्र सोऽर्थान्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा ॥ [६८]

ज्या ठिकाणी सामान्याचे विशेषद्वारा आणि विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने अथवा वैधर्म्याने समर्थन केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास आलंकार होतो.

यानंतर पं. विश्वेश्वर पाण्डेय यांच्या मतांचा विचार केला आहे.

### ३८. पं. विश्वेश्वर पाण्डेय ( इ.स.१८वे शतक )

---

[६२] चन्द्रा. ५.६८ पृष्ठ क्र.१७५
[63] अलं. मञ्जू. कारिका क्र.९४ पृष्ठ क्र. १६७
[६४] व.रा.य.भू. – विलास ७ पृष्ठ क्र. २१०, ओळ क्र. 30
[६५] का. लोक. पृष्ठ क्र. ४१२ सूत्र क्र. १७४
[६८] सा.कौ. १०.२४ पृष्ठ क्र. १५७

पं. श्री. विश्वेश्वर पाण्डेय यांनी अलंकारशास्त्रावर 'अलङ्कारकौस्तुभ' अलङ्कारमुक्तावली' आणि 'अलङ्कारप्रदीप' नामक प्रमुख तीन ग्रंथ लिहिले आहेत. या ग्रंथांतून त्यांनी अर्थान्तरन्यास अलंकाराचे वर्णन केले आहे. ते पुढीलप्रमाणे :

१) अलङ्कारकौस्तुभ -

यदि सामान्यविशेषौ समर्थयते विशेषसामान्ये ।
साधर्म्याद्वैधर्म्यादपि वा सोऽर्थान्तरन्यासः ॥ [६९]

जर सामान्य आणि विशेष यांचे अनुक्रमे विशेषद्वारा अथवा सामान्याद्वारा साधर्म्याने अथवा वैधर्म्याने समर्थन केलेले असेल तर तिथे अर्थान्तरन्यास अलंकार असतो.

२) अलंकार मुक्तावली -

यदि सामान्यविशेषौ समर्थयते विशेषसामान्ये ।
साधर्म्याद्वैधर्म्यादपि वा सोऽर्थान्तरन्यासः ॥[७०]

प्रस्तुतचे लक्षण 'अलंकारकौस्तुभ' या ग्रंथातील जसेच्या तसे आहे, असे दिसून येते.[७१]

3)अलङ्कारप्रदीप -

सामान्यविशेषाभ्यां विशेषसामान्यसमर्थनमर्थान्तरन्यासः ॥[७२]

सामान्य आणि विशेषाचे विशेषद्वारा वा सामान्याद्वारा समर्थन जिथे असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर वेणीदत्ताचे मत मांडले आहे.

## ३९. वेणीदत्त ( इ.स. १८ – १९ वे शतक )

वेणीदत्ताने आपल्या ' अलंकारमञ्जरी ' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराविषयी असे म्हटले आहे –

सामान्यस्य पदार्थस्य विशेषेण समर्थनम् ।
प्रथमोऽर्थान्तरन्यासप्रकारः परिकीर्तितः ॥[७३]
विशेषस्य तथाऽर्थस्य सामान्येन समर्थनम् ।
द्वितीयोऽर्थान्तरन्यासप्रकारः समुदीरितः ॥ [७४]

सामान्य पदार्थाचे विशेषद्वारा समर्थन आणि विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन जिथे असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. वेणीदत्ताने ही माहिती प्रकाराच्या रूपात दिली आहे.

यानंतर कृष्णसुधीच्या मताचा विचार करणे उचित ठरेल.

---

[६९] अलं. कौस्तु ( विश्व ) कारिका क्र. १. पृष्ठ क्र. ३१८ आलए क्र. २६- २७
[७०] अलं. मुक्ता. कारिका क्र. २८ पृष्ठ क्र. ३४
[७१] अलं. कौस्तु ( विश्व ) कारिक क्र. १ पृष्ठ क्र. ३१८, ओळ क्र. २६-२७
[७२] अलं. प्र. सूत्र ३७. पृष्ठ २७, ओळ क्र. १२-१३
[७३] अलं. मञ्ज. (वेणी ) पृष्ठ क्र.२३, श्लोक क्र. ११५

[७४] कित्ता पृष्ठ क्र. २३ श्लोक क्र. ११८

## ४०. कृष्णसुधी ( इ.स. १८५५ )

'काव्यकलानिधी' नामक ग्रंथात कृष्णसुधी यांनी प्रस्तुत अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.

अर्थान्तरन्यास उक्तस्साधर्म्येणेतरेण वा ।
सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते ॥ [७५]

सामान्याचे विशेषद्वारा अथवा विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने अथवा वैधर्म्याने समर्थन केले असेल तर तिथे अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला जातो.

यानंतर श्रीकृष्णब्रह्मतन्त्र परकालस्वामी यांच्या मताचा विचार करणे ओघानेच प्राप्त आहे.

## ४१. श्रीकृष्णब्रह्मतन्त्र परकालस्वामी (इ.स.१९वे शतक)

श्रीकृष्णब्रह्मतन्त्र परकालस्वामींनी 'अलङ्कारमणिहार ' नामक ग्रंथ लिहिला. त्यामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराविषयी पुढील प्रमाणे सांगितले आहे –

समर्थनं विशेषस्य सामान्येनास्य तेन वा ।
आहुरर्थान्तरन्यासं साधर्म्येणेतरेण वा ॥[७६]

ज्या ठिकाणी विशेषाचे सामान्याद्वारा अथवा सामान्याचे विशेषद्वारा समर्थन साधर्म्याने अथवा वैधर्म्याने केलेले असते त्याठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला जातो.

यानंतर प्रभाकरशास्त्री गाडगीळ यांचे मत मांडले आहे.

## ४२. प्रभाकरशास्त्री गाडगीळ (इ.स. १९०१)

प्रभाकरशास्त्री गाडगीळ यांनी आपल्या 'बालालंकार ' या ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे-

सामान्येन विशेषस्य विशेषेण सामान्यस्य वा यत्समर्थनं तदर्थान्तरन्यास : ॥ [७७]

विशेषाचे सामान्याद्वारा अथवा सामान्याचे विशेषद्वारा जेथे समर्थन केले जाते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. हे समर्थन साधर्म्याने आणि वैधर्म्याने असे दोन प्रकारे होते.[७८] प्रस्तुतचे लक्षण ग्रंथकाराने पंडितराज जगन्नाथाचे शब्दशः घेतले आहे[७९] आणि ते मम्मटाच्या लक्षणावर आधारित आहे.[८०] यानंतर ' काव्यप्रभावृत्ती' तील मत मांडले आहे.

## ४३. काव्यप्रभावृत्ती

---

[७५] का.क.निधी. पृष्ठ क्र. ४२१. कारिका क्र. ६१ उत्तरार्ध व कारिका क्र. ६२ ओळ क्र. ७-८
[७६] अलं. मणि. तृतीय भभाग, पृष्ठ क्र. 113, ओळ क्र. 3 – ४
[७७] बालं. पृष क्र. ६८, ओळ क्र. २२-23
[७८] तच्च समर्थनं साधर्म्यवैधर्म्याभ्यां द्विविध्म । कित्ता पृष्ठ क्र. ६८. ओळ क्र २५-२६
[७९] पहा. रस. गंगा. पृष्ठ क्र. ६६९, सूत्र क्र. ६७
[८०] का.प्र. दशम उल्लास, सूत्र क्र. १६५ कीरका क्र. १०९. पृष्ठ क्र. ६६१

अग्निपुराण नामक ग्रंथावर काव्यप्रभावृत्ती नामक टीका उपलब्ध आहे. टीकाकाराने अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे-

यत्र सादृश्येन पूर्वोक्तस्य शब्दसादृश्येनार्थसादृश्ये वा ।
उत्तरेण योऽर्थान्तरस्य न्यासः क्रियते सोऽर्थान्तरन्यास उच्यते ॥[८१]

जिथे उत्तरवाक्याने पूर्ववाक्याचे शब्दशः अथवा अर्थतः सादृश्याने समर्थन केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास म्हटला जातो. याच ठिकाणी वृत्तिकाराने सादृश्याचे दोन प्रकार सांगितले आहेत. १) शब्दशः सादृश्य आणि २) अर्थशः सादृश्य, या दोन्ही प्रकारची उदाहरणे देऊन तो पुढे सादृश्य चतुर्विध आहे असे सांगतो.[८२]
या नंतर अच्युतरायांचे मत मांडले आहे.

## ४४. अच्युतराय

अच्युतराय यांनी आपल्या ' साहित्यसार ' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण खालीलप्रमाणे दिले आहे :

वाक्सास्त्यर्थान्तरन्यासो या सामान्यविशेषयो : ।[८३]

सामान्य आणि विशेषाचे कथन करणे म्हणजे अर्थान्तरन्यास होय. त्याचे हे लक्षण कुवलयानंदानुसार केले आहे असे दिसते. त्यांनी आपल्या व्याख्येत त्या ग्रंथातील अर्थान्तरन्यासाचे लक्षण आणि उदाहरण उद्धृत केले आहे.[८४]

## ४५. त्रिमल्लभट्ट

'अलंकारमञ्जरी ' नामक ग्रंथामध्ये त्रिमल्लभट्टांनी अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

उक्तार्थस्यार्थान्तरेण दृढीकरणमर्थान्तरन्यासः ।[८५]

प्रस्तुत अर्थाचे अन्य अर्थाचे द्वारा दृढीकरण करणे म्हणजे अर्थान्तरन्यास अलंकार होय. ग्रंथकाराने एका चरणात लक्षण व दुसऱ्या चरणात उदाहरण दिले आहे. यानंतर हरिदास सिद्धान्त वागीश यांचे मत दिले आहे.

## ४६. हरिदास सिद्धान्त वागीश

हरिदास सिद्धान्त वागीश यांनी आपल्या 'काव्यकौमुदी ' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.

वाक्यान्तरेण वाक्यान्तरसमर्थनमर्थान्तरन्यासः ।[८६]

एखाद्या वाक्याने दुसऱ्या वाक्याचे समर्थन करणे म्हणजे अर्थान्तरन्यास अलंकार होय.

---

[८१] अग्नि.पु.का.लंशा. – अ.८ पृष्ठ क्र. २०१ ओळ क्र/ १२–१३
[८२] इति चतुर्विधं सादृश्यमुक्तमं । कित्ता पृष्ठ क्र. २४२ ओळ क्र. ११
[८३] सा.सा. कौस्तुभरत्न ८ श्लोक क्र. २६७ ओळ क्र. २
[८४] उक्तिरर्थान्तरन्यासः स्यात्सामान्यविशेषयोः ।
हनुमानब्धिमतद्दुष्करं किं महात्मनाम् ॥ कित्ता. पृष्ठ क्र. २६ ओळ क्र. २८–२९, कुवल – पृष्ठ १३१, श्लोक क्र. १२१
[८५] अलं. मञ्ज. ( त्रिम. ) पृष्ठ क्र. ११२. ओळ क्र. १४

यानंतर गोविंदाचे मत मांडले आहे.

४७. गोविन्द

गोविंदाने आपल्या 'काव्यप्रदीप' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यासाविषयी असे म्हटले आहे –

सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते ।
यत्र सोऽर्थान्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा ॥[८८]

सामान्याचे विशेषद्वारा अथवा विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने अथवा वैधर्म्याने समर्थन जिथे केले जाते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर मङ्खकाचे मत मांडले आहे.

४८. मङ्खक

महाकवी मङ्खकाने ' साहित्य–मीमांसा ' नामक ग्रंथ लिहिला. त्यात त्याने प्रस्तुत अलंकारचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

जायेतार्थान्तरोक्तिः सा वस्तु प्रस्तुत्य किञ्चन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योग्यस्य वस्तुतः ॥[८९]

प्रस्तुत वस्तूचे कथन करून त्याच्या साधनासाठी समर्थन योग्य वस्तूचा ( अर्थाचा ) न्यास केला असता तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

यानंतर भानुदत्ताच्या मताचा विचार केला आहे.

४९. भानुदत्त

भानुदत्ताने आपल्या ' अलंकारतिलक ' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

प्रस्तुतस्य वस्तुनो वस्त्वन्तरेण समर्थनमर्थान्तरम् ।[९०]

प्रस्तुत वस्तूचे दुसऱ्या वस्तूने समर्थन जिथे केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. यानंतर शिवदत्त शिवनाथ सहृदयशिरोमणी यांच्या मताचा विचार करणे उचित ठरेल.

५०. शिवदत्त शिवनाथ सहृदयशिरोमणी

शिवदत्त शिवनाथ सहृदयशिरोमणी यांनी आपल्या 'काव्यरसायन' नामक ग्रंथामध्ये अर्थान्तरन्यासाचे लक्षण असे सांगितले आहे –

सस्यादर्थान्तरन्यासोयत्रार्थान्तरतो वचः ।[९१]

जेथे अर्थान्तरद्वारा प्रस्तुतार्थाचे समर्थन केलेले असते तेथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

---

[८६] का.कौ. पञ्चदशी कला पृष्ठ क्र. १५७, ओल क्र. १९–२०
[८८] का.प्र. गो. १०–२३ पृष्ठ क्र. ४१३
[८९] सा.मी. प्रकरण. कारिका क्र. ३४२ पृ. क्र. १२०
[९०] अलं.तिल. चतुर्थ परिच्छेद पृष्ठ क्र.. १०२ ओळ क्र. १५

यानंतर श्रीकृष्णकवींचे मत मांडले आहे.

५१) श्रीकृष्णकवी

'मन्दारमरन्दचम्पू' नामक ग्रंथात श्रीकृष्णकवीने अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

अप्रस्तुतविशेषार्थान्तरन्यसनपूर्वकम् ।
सामान्यप्रस्तुतस्यार्थान्तरन्यासः समर्थनम् ॥[९२]

सामान्य प्रस्तुताचे अप्रस्तुत विशेषद्वारा समर्थन म्हणजे अर्थान्तरन्यास अलंकार होय.

यानंतर नरेंद्रप्रभसुरी यांच्या मताचा विचार करणे उचित ठरेल.

५२ ) नरेन्द्रप्रभसुरी

नरेन्द्रप्रभसुरीने आपल्या ' अलङ्कारमहोदधि ' नामक ग्रंथात अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे –

स स्मृतोऽर्थान्तरन्यासः सामान्यमितरोऽपि यत् ।
साधर्म्य वैधर्म्यवता तदन्येन समर्थ्यते ।।[९३]

जिथे सामान्याचे विशेषद्वारा आणि विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने वा वैधर्म्याने समर्थन केलेले असते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.
यानंतर शंकरदेव अवतरे यांचे मत मांडले आहे.

५३) डॉ. शंकरदेव अवतरे

'अभिनव काव्यशास्त्र ' या ग्रंथामध्ये डॉ. शंकरदेव अवतरे यांनी अर्थान्तरन्यासाचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

अर्थान्तरनिवेशेन विधेयार्थः समर्थ्यते ।
यत्र सोऽर्थान्तरन्यासश्चतुर्धोऽर्थेनभिद्यते ।। [९४]

विधेयार्थाचे अर्थान्तरद्वारा जिथे समर्थन केले जाते त्याठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

## १.५ अर्थान्तरन्यासाचे प्रकार

---

[९१] का.र. द्वितीय प्रयोग पृष्ठ क्र. १३६. ओळ क्र. १५
[९२] म.म.चम्पू. दशम व्यङ्ग्यबिन्दू श्लोक क्र. १६६. पृष्ठ क्र. १४१

[९३] अलं. महो. अष्टम तरङ्ग. कारिका क्र. ३७ पृष्ठ क्र.. २७४
[९४] अभि. काव्य. पृ.क्र. ६२२ सूत्र क्र. ३८९ श्लोक क्र. ७३४

साहित्यशास्त्रकारांनी केलेले अर्थान्तरन्यासाचे लक्षण पाहिले. त्यातून सूचित झालेल्या अर्थान्तरन्यासाच्या प्रकारांचे भामह-दण्डी यांच्यापासून विसाव्या शतकापर्यंतच्या टीकाकारांनी केलेल्या प्रकारांचे विवेचन ओघानेच येते. त्याचा विचार पुढे केला आहे.

संस्कृत साहित्यशास्त्रकारांमध्ये भामहाचा बराच वरचा क्रमांक आहे. त्याचा निर्देश यापूर्वी केला आहेच. त्याने अर्थान्तरन्यासाचे स्पष्टपणे प्रकार सांगितले नसले तरी त्याच्या लक्षणातून अर्थान्तरन्यासाचे प्रकार सूचित होतात ; ते असे- १. 'हि' शब्द असलेला एक प्रकार व २. 'हि' शब्दरहित दुसरा प्रकार.[९५] भामहानंतर दण्डीने या अलंकाराचे आठ प्रकार पुढील श्लोकात सांगितले आहेत : -

विश्वव्यापी विशेषस्थः श्लेषाविद्धो विरोधवान् ।
अयुक्तकारी युक्तात्मा युक्तायुक्तो विपर्ययः ।। [९६]

या श्लोकानुसार १) विश्वव्यापी २) विशेषस्थ ३)श्लेषाविद्ध ४) विरोधवान् ५) अयुक्तकारी ६) युक्तात्मा ७) युक्तायुक्त आणि ८) विपर्यय हे आठ प्रकार आहेत. त्यांचे थोडक्यात विवेचन पुढीलप्रमाणे : १) विश्वव्यापी - सर्व पदार्थमात्रांना लागू पडणारा अर्थ समर्थक म्हणून देणे.उदा.

भगवन्तौ जगन्नेत्रे सूर्याचन्द्रमसावपि ।
पश्य गच्छत एवास्तं नियतिः केन लङ्घ्यते । [९७]

ऐश्वर्यसंपन्न आणि जगाचे नेत्र असलेले हे सूर्य व चंद्र सुद्धा पहा, अस्ताला जातात. शेवटी नियती कोणाला ओलांडता येईल ?

प्रस्तुत उदाहरणात सूर्य व चंद्राने अस्ताला जाणे या विशेष अर्थाचे समर्थन नियती (भाग्य ) टाळता न येणे या सामान्याद्वारा केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. इथे अर्थान्तर-दैवाची अटळता-सर्वगत अथवा सार्वत्रिक आहे, म्हणून विश्वव्यापी अर्थान्तरन्यास आहे.

२) विशेषस्थ :- विशिष्ट ठिकाणी लागू पडणारा हेतू समर्थक म्हणून देणे. उदा.

पयोमुचः परितापं हरन्त्येव शरीरिणाम्
नन्वात्मलाभो महतां परदुःखोपशान्तये ।।[९८]

हे ढग जीवांचा ( ग्रीष्मजनित ) ताप नाहिसा करतात. खरोखरच, मोठया लोकांचे जन्मग्रहण दुसऱ्यांचे दुःख शांत करण्यासाठी असते.

---

[९५] काव्यालं. (भा ) २.७३ पृ. ६७ 'हि' शब्दाने युक्त असलेल्या उदाहरणासाठी पहा -
अद्यप्रभृत्यवनताङ्गि तवास्मि दासः
क्रीतस्तपोभिरिति वादिनि चन्द्रमोलौ ।
अह्नाय सा नियमजं क्लममुत्ससर्ज
क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ।। कुमार. ५.८६ पृ. १०६
तदेषा भवतः कान्ता त्यज वैनां गृहाण वा ।
उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी ।। अभि. शा. पृ. ६०७
[९६] काव्याद. २.१७० पृ. २००
९७ कित्ता. २.१७२ पृ. २०१
९८
[९८] कित्ता. २.१७३ पृ. २०१

इथे पहिल्या ओळींतील विशेषाचे समर्थन करण्यासाठी अर्थान्तर (दुसऱ्याचे दुःख हरण करण्यासाठी जन्म घेणे) सर्वसाधाराण लोकांमध्ये नसून विशेष महात्म्यांमध्ये स्थित आहे. (कारण सर्वांचे जन्मग्रहण परदुःख निवारण्यासाठी नसते) अशाप्रकारे इथे विशेषस्थ अर्थान्तरन्यास आहे.

3) श्लेषाविद्ध : श्लेषाने अर्थान्तर निघणे. उदा.

उत्पादयति लोकस्य प्रीतिं मलयमारुतः ।
ननु दाक्षिण्यसंपन्नः सर्वस्य भवति प्रियः ॥[९९]

मलय पर्वतावरून आलेला वारा साऱ्या जगाला आनंद उत्पन्न करतो. खरोखरच, दाक्षिण्याने युक्त (सौजन्याने युक्त, दुसरा अर्थ दक्षिणेकडील) (लोक अथवा पदार्थ) सर्वांना आवडतात.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळींतील अर्थाचे समर्थन करण्यासाठी योजिलेल्या अर्थान्तरामध्ये दाक्षिण्य हे पद श्लिष्ट आहे; म्हणून हा श्लेषाविद्ध अर्थान्तरन्यास आहे.
४) विरोधवान : परस्परविरुद्ध वस्तूंना लागू पडणारा हेतू समर्थक म्हणून देणे – उदा.

जगदानन्दयत्येष मलिनोऽपि निशाकरः ।
अनुगृह्णाति हि परान् सदोषोऽपि द्विजेश्वरः ।[१००]

हा चंद्र कलङ्कयुक्त असूनही संपूर्ण जगाला आनंन्दित करतो, कारण ब्राह्मण स्वतः दोषयुक्त असूनही दुसऱ्यांवर ( उपदेशद्वारा ) अनुगृहीत करतो.

प्रस्तुत श्लोकात चंद्राच्या आनन्ददायकत्वरूप अर्थाचे दोषयुक्त ब्राह्मणाच्या अनुग्राहकत्वरूप विरोधवान अर्थान्तरद्वारा समर्थन केले आहे; म्हणून इथे विरोधवान अर्थान्तरन्यास आहे.
५) अयुक्तकारी : अयुक्तियुक्त कर्म करणाऱ्या समर्थ्य वस्तूने युक्त असलेला अलंकार. उदा.–

मधुपानकलात् कण्ठान्निर्गतोऽप्यलिनां ध्वनिः ।
कटुर्भवति कर्णस्य कामिनां पापमीदृशम् ॥ [१०१]

(फुलातील ) मधाचे प्राशन केल्याने मधुर झालेल्या कण्ठातून निघालेला गुंजारव कामसंतप्त प्रेमींना कर्णकठोर होतो; शेवटी (कामासक्तिरूप) पाप असेच असते.

---

[९९] कित्ता. २.१७४ पृ. २०१
[१००] कित्ता. २.१७५ पृ. २०२
[१०१] कित्ता. २.१७६ पृ. २०२

प्रस्तुत श्लोकात मधुर ध्वनीचा कठोरत्वपूर्ण प्रभाव हा समर्थ्य अर्थ आहे. मधुर असल्याने कठोरत्व दाखविणे अयोग्य (अननुकूल) झाल्याच्या रूपात या अर्थाने अयुक्त कर्मसंपादक होण्यामुळे इथे अयुक्तकारी अर्थान्तरन्यास आहे.

६) युक्तात्मा : युक्तिसंगत समर्थ्य वस्तूने युक्त असलेला अलंकार उदा. -

अयं मम दहत्यङ्गमम्भोजदलसंस्तरः ।
हुताशनप्रतिनिधिर्दाहात्मा ननु युज्यते ॥ [१०२]

कमळाच्या पाकळ्यांपासून तयार केलेली शेज माझ्या (विरहातुर) अंगाला जाळीत आहे. अग्नीप्रमाणे असणाऱ्या पदार्थाची दाहकता उचित (स्वाभाविक) च आहे.

सामान्यतः जगतामध्ये कमळापसून बनविलेल्या शेजेची दाहकता ही अप्रसिद्ध असल्याने अनुपपन्न आहे, हा इथे समर्थ्य अर्थ आहे, याचे समर्थन ' अग्नीप्रमाणे वर्ण असणाऱ्या पदार्थाची दाहकता स्वाभाविक असते ' हे सांगून केले आहे. अशाप्रकारे समर्थ्य अर्थाच्या युक्तात्मतेचे समर्थन होत असल्याने इथे युक्तात्मा अर्थान्तरन्यास आहे.

७) युक्तायुक्त क्रमशः युक्तियुक्त और अयुक्तियुक्त कर्म करणाऱ्या समर्थ्य दोन वस्तूंनी युक्त.

उदा. - क्षिणोतु कामं शीतांशुः किं वसन्तो दुनोति माम् ।
मलिनाचरितं कर्म सुरभेर्नन्वसांप्रतम् ॥ [१०३]

चंद्राने मला पीडा करावी पण हा वसंत मला का सतावीत आहे ? ( चंद्रासारख्या ) कलंकित लोकांकडून केले जाणारे कर्म ( वसंतासारख्या ) विख्यात कीर्तिमान व्यक्तीला अयोग्य आहे.

प्रस्तुत श्लोकात समर्थनीय वाक्यामध्ये चंद्राचे पीडकत्व उचित ( युक्त ) असल्याचे सांगितले आहे आणि वसंताचे तापकत्व अनुचित ( अयुक्त ) दाखविले आहे. त्यांचे ( युक्त व अयुक्त अशा विशेषांचे ) समर्थन सामान्य अर्थाद्वारा केले असल्याने इथे युक्तायुक्त अर्थान्तरन्यास आहे.

८) विपर्यय : पूर्वोक्त युक्तायुक्ताच्या विपरीत रूपाने युक्त- उदा.

कुमुदान्यपि दाहाय किमयं कमलाकर ।
नहीन्दुगृह्येषुग्रेषु सूर्यगृह्यो मृदुर्भवेत् ॥ [१०४]

कमळाचे फूलही मला दुःख देते, मग कमलबनाची गोष्ट कसली ? जेव्हा चंद्राशी संबद्ध पदार्थ तापकारी होतात तेव्हा सूर्याशी संबद्ध पदार्थ शीतल बनू शकत नाही.

कुमुदांचे (चंद्रविकासी कमळांचे) तापकत्व अयुक्त आणि (सूर्यविकासी ) कमळांचे तापकत्व युक्त आहे. इथे त्यांचे समर्थन केले आहे. म्हणून युक्तायुक्ताचे समर्थन विपरीत असल्याने इथे विपर्यय नामक अर्थान्तरन्यास आहे.

---

[१०२] कित्ता. २.१७७ पृ. २०२
[१०३] कित्ता २.१७८ पृ. २०३

[१०४] कित्ता. २.१७९ पृ. २०३ - २०४

दण्डीने वरील जे प्रकार सांगितले आहेत ते मुख्यतः समर्थनाचे प्रकार आहेत. रत्नश्रीज्ञान या टीकाकाराने दण्डीला अभिप्रेत असलेल्या या प्रकारांशिवाय आणखी दोन प्रकार सांगितले आहेत. ते असे – १) अविरुद्ध आणि २) अविरुद्धाविरुद्ध[१०५]

याशिवाय इतर प्रकारांविषयी असे सांगितले आहे की, इतर प्रकार ' आदी ' या शब्दात संगृहीत होतात. अर्थात दण्डीच्या मते केवळ आठच प्रकार नाहीत तर अनेक प्रकार संभवतात असे दिसून येते. [१०६] दण्डीने सांगितलेल्या प्रकारांना नंतरच्या काळात पाठिंबा वा समर्थन मिळाले नाही.

उद्भटाने या अलंकाराचे समर्थ्य व समर्थक वाक्यांच्या पूर्वोत्तर प्रयोगाच्या आधारे दोन प्रकार सांगितले आहेत.[१०७] या दोन प्रकारांचे त्याने पुन्हा प्रत्येकी दोन उपप्रकार सांगितले आहेत. १) ' हि ' शब्दाने युक्त आणि २ ) ' हि ' शब्दाने रहित. अशा प्रकारे त्याने हा अलंकार चतुर्विध सांगितले आहे.[१०८] याचाही प्रभाव उत्तरकालीन शस्त्रकारांवर पडलेला दिसत नाही.

रुद्रटाने सामान्य आणि विशेष यांच्या आधारे अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार केले आहेत. सामान्य वा विशेष यांच्यातील परस्परांच्या समर्थनाची क्रिया रुद्रटाने दोन प्रकारची मानली आहे. त्यांतील एक समर्थन साधर्म्यरूपाने असते तर दुसरे समर्थन वैधर्म्यरुपाने असते. त्यामुळे अर्थान्तरन्यास अलांकाराचे खालील चार प्रकार पडतात. ते असे –

१. विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन
२. विशेषाचे सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन
3. सामान्याचे विशेषद्वारा साधर्म्याने समर्थन
४. सामान्याचे विशेषद्वारा वैधर्म्याने समर्थन

आतापर्यतच्या कोणाही आलंकारिकांनी ' सामान्य – विशेषभाव ' हा शब्द लक्षणात वापरला नव्हता. तो रुद्रटानेच प्रथम वापरला.[१०९] नंतरच्या काळात त्याच्या या लक्षणाचा आणि विभाजनाचा प्रभाव चांगलाच आढळतो. अगदी हेच विभाजन मम्मट, श्रीवत्सलाञ्छन भट्टाचार्य, विश्वनाथदेव,कविकर्णपूर,पंडितराज जगन्नाथ, श्री विद्याभूषण, पं. विश्वेश्वर पांडेय, कृष्णसुधी, श्रीकृष्ण ब्रह्मतन्त्र परकाल स्वामी, पं. प्रभाकर शास्त्री गाडगीळ, गोविंद, भानुदत्त,शिवदत्त शिवनाथ सहृदयशिरोमणी आणि नरेंद्रप्रभसुरी या आलंकारिकांनी आपल्या ग्रंथांत मान्य केले आहे.[११०]

---

[१०५] काव्याद. रत्नश्री टीका पृ. ८४६, ओळ क्र. १६ व १९

[१०६] इत्येवमादयो भेदाः प्रयोगेष्वस्य लक्षिताः । काव्याद. २.१७१ पृ. २००

[१०७] समर्थकस्य पूर्वं यद्वचोऽन्यस्य च पृष्ठतः ।
विपर्ययेण वा यत्स्याध्दिशोक्त्याऽन्यथाऽपि वा । का.सा.सं. २.६ – ५ पृ. 23

[१०८] स च समर्थकस्य प्रागुपादने समर्थस्य वेति द्विभेदः । प्रतिभेदश्च हि शब्देन योगो वियोगो वेति चतुर्विधः । कित्ता. पृ.23, ओळ क्र. १२ –13

[१०९] काव्यालं. ( रु ) ८.७९ पृ. २७९

[११०] का.प्र. दशम उल्लास, सूत्र क्र. १६५ कारिका क्र. १०८ पृ. ६६१ .
का.प. ५.८६ पृ.९४. अयं द्विविधोऽपि साधर्म्यवैधर्म्याभ्यां प्रवर्तमानश्चतुर्विधो भवति । सा.र.पृ. ६४८ ओळ क्र. ८–९.

अर्थान्तरन्यास अलंकारात कार्य-कारण-भावाचा उल्लेख केला आहे. विद्यानाथाने या अलंकाराचे प्रकार सांगताना जिनसेनाचार्यांचे अनुसरण केले आहे.[११३]

भोजाने रुद्रटाने केलेल्या लक्षणाच्या आधारे साधर्म्य व वैधर्म्य यांच्याद्वारा होणारे समर्थन सांगितले आहे. त्याच्याशिवाय त्याने विपर्ययाने हा एक प्रकार सांगितला आहे.[११४] तो असा -

१. प्रथम साध्यसमर्थ्य वाक्य व नंतर साधनसमर्थक वाक्य

२. प्रथम समर्थक साधक वाक्य व नंतर समर्थ्यसाध्य वाक्य

विपर्यय म्हणजे पहिल्यांदा साधनसमर्थ वस्तू सांगून त्यानंतर साध्य सांगणे

रुद्रटाने अर्थान्तरन्यास, उभयन्यास आणि प्रत्यनीक न्यास हे तीन वेगळे अलंकार सांगितले आहेत. पण भोजाने अर्थान्तरन्यास अलंकारात उभयन्यासाचा अन्तर्भाव केला आहे आणि प्रतीकन्यास हा अर्थान्तरन्यासाचा एक प्रकार सांगितला आहे.[११५]

हेमचन्द्राने सामान्य-विशेषभावाधारित केवळ दोनच प्रकार सांगितले आहेत. ते असे

१) विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन

२) विशेषाचे सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन[११६]

वाग्भट ( द्वितीय ) याच्यावर हेमचंद्राचा प्रभाव आहे. त्याने हेमचंद्राचेच अनुकरण केले आहे.[११७] त्याच्या पूर्ववर्ती असलेल्या मम्मटाने सांगितलेले सामान्याचे विशेषद्वारा समर्थन या अर्थान्तरन्यासाचे प्रकार हेमचंद्र व वाग्भट यांना मान्य नाहीत. शोभाकरमित्राने याच मताचा स्वीकार करुन त्याने ' हि ' शब्दाचा प्रयोग आणि अप्रयोग यांच्या आधारे वरील प्रकाराचे पुन्हा प्रत्येकी २ उपप्रकार सांगितले आहेत.[११८]त्याने सांगितलेले प्रकार पुढीलप्रमाणे आहेत -

१) विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने ' हि ' शब्दसहित समर्थन

२) विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने ' हि ' शब्दरहित समर्थन

3) विशेषाचे सामान्याद्वारा वैधर्म्याने ' हि ' शब्दसहित समर्थन

४) विशेषाचे सामान्याद्वारा वैधर्म्याने ' हि ' शब्दरहित समर्थन

---

[११२] कारणात् कार्यसमर्थनं तु काव्यलिङ्गे अन्तर्भूतमिति
नोक्तमतोऽर्थान्तरन्यासस्य अत्रो भेदाः। कित्ता. पृ. ९०, ओळ क्र. ७४

[११3] प्र..रु. श्लोक क्र.२२२ पृ. 303.
आणखी पहा - कार्यकारणभावेऽपि कारणात् कार्यसमर्थनं काव्यलिङ्गेऽन्तर्भूतमिति तन्नोक्तम् । कित्ता. पृ. 30४ ओळ क्र. 3-४

[११४] स उपन्यस्तवस्तूनां साधर्म्येण च कथ्यते ।
वैधर्म्येण च विद्व्द भिवैपरीत्येन कुत्रचित् ॥ सर. कण्ठा. ४.७० पृ. २१५

[११५] प्रोक्तो यस्तूभयन्यासोऽर्थान्तरन्यासेः एव सः ।
स प्रत्यनीकन्यासश्च प्रतीकन्यास एव च ॥ कित्ता. ४.७१ पृ. २१६

[११६] काव्यानु. (हे) अ.६ सूत्र, १९ पृ. 3८४ ओळ क्र. ५-६

[११७] काव्यानु. ( वा) अ.3, पृ. 3८ ओळ क्र.२१

[११८] अयं साधर्म्यवैधर्म्याभ्यां द्विविधः सन् हिशब्दाद्युपादाने शाब्दः तदभावे त्वार्थ इति चतुर्विधः । अलं.,रत्ना. पृ. १3०, ओळ क्र. ८

रुय्यकाने अर्थान्तरन्यासाचे आठ प्रकार स्वीकारले आहेत. त्याने रुद्रटाने सांगितलेल्या प्रकारांबरोबरच 'कार्य–कारण–भावा ' ने होणाऱ्या प्रकारांचा अन्तर्भाव अर्थान्तरन्यासात केला आहे. त्यामुळे रुय्यकानुसार अर्थान्तरन्यासाचे पुढील आठ प्रकार संभवतात.

१) विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन
२) विशेषाचे सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन
3) सामान्याचे विशेषद्वारा साधर्म्याने समर्थन
४) सामान्याचे विशेषद्वारा वैधर्म्याने समर्थन
५) कार्याचे कारणाद्वारा साधर्म्याने समर्थन
६) कार्याचे कारणाद्वारा वैधर्म्याने समर्थन
७) कारणाचे कार्यद्वारा साधर्म्याने समर्थन
८) कारणाचे कार्यद्वारा वैधर्म्याने समर्थन[११९]

अर्थान्तरन्यासाचे विवेचन करताना विश्वनाथ, हरिदाससिद्धान्त वागीश आणि डॉ. शंकरदेव ' अवतरे ' यांनी रुय्यकाच्या मतास अनुसरले आहे.[१२०]

विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन आणि सामान्याचेविशेषद्वारा समर्थन हे दोन प्रकार विद्याधराने सांगितले आहेत.[१२१] त्याने फक्त साधर्म्यमूलक प्रकार मानले आहेत. रुद्रट, मम्मट, रुय्यक यांना अभिप्रेत असलेले वैधर्म्यमूलक समर्थन स्वीकारले नाही. अर्थान्तरन्यासाचे विवेचन करताना संघरक्खित, भट्ट देवशंकर पुरोहित, नरसिंह कवी, हरिप्रसाद, वेणीदत्त आणि श्रीकृष्ण कवी यांनी आपल्या ग्रंथात विद्याधरास अनुसरले आहे.[१२२]

---

[११९] तत्र सामान्यं विशेषस्य, विशेषो वा सामान्यस्य समर्थक इति द्वौ भेदौ । तथा कारणस्य, कारणं वा कार्यस्य समर्थकमिति च द्वौ भेदौ । तत्र भेदचतुष्टये प्रत्येकं साधर्म्यवैधर्म्याभ्यां भेदद्वयेऽष्टौ भेदाः । – अलं. सर्व. सञ्जी. पृ. २०१ ओळ क्र.६-९

[१२०] साधर्म्येणेत्तरेणार्थान्तरन्यासोऽष्टधा ततः । सा.द. दशम परि. कारिका क्र. ६२ ( पूर्वार्ध ) पृ. ५७६ ओळ क्र. १५
सोऽपि च साधर्म्येण वैधर्म्येण च सम्भवतीति समुदायेऽष्टविधः । – का.कौ. पृ. १५८, ओळ क्र. २–3
सामान्यस्य विशेषेण विशेषस्यापि तेन च ।
कारणस्य च कार्येण कार्यस्य कारणेन च ॥
समर्थनेन साधर्म्याद् वैधर्म्याच्चापिसोऽष्टधा ।
भिन्नो विज्ञापकादिभ्यो हेतुरत्र समर्थकः ॥ अभि. काव्य. सूत्र 3८९ श्लोक क्र. ४3५, ४3६ पृ. ६२२

[१२१] एका. पृ. २८२ श्लोक क्र. २८

[१२२] सुबोधालं. श्लोक क्र. २४१.
अलं. मञ्जू. का. क्र. ९४. पृ. १६७.
न.रा. य.भू. विलास ७ पृ. २१०, ओळ क्र. २९–30.
का. लोक. पृ. ४१५, सू. १७४.
अलं. मञ्ज ( वे) पृ. २3, श्लोक ११५, ११८.
म.म. चम्पू. १०.१६६, पृ. १४१.

वाग्भट ( प्रथम ) याने पहिल्यांदाच थोडे वेगळ्या पद्धतीचे प्रकार सांगितले आहे. त्याने श्लिष्ट आणि अश्लिष्ट असे श्लेषावर आधारित दोन प्रकार मानले आहेत. [१२३] या मताचे समर्थन पुढील काळात कोणत्याही आलंकारिकाने केले नाही.

'हि' शब्दाचा प्रयोग आणि अप्रयोग याच्या आधारे भामह, शोभाकरमित्र, पण्डितराज जगन्नाथ, पुञ्जराज आणि प्रभाकरशास्त्री गाडगीळ यांनी प्रकार केले आहेत. [१२४] परंतु या प्रकारांमध्ये कोणतेही विशेष सौंदर्य नसल्याने रुय्यकाचा टीकाकार (विमर्शिनीकार) स्वीकारत नाही. हे मत स्वीकार्य वाटते.[१२५]

पुञ्जराजाने विश्वव्यापी आणि विशेष हे दोन मुख्य प्रकार मानले असून ' हि ' सहित व ' हि ' रहित असे त्या प्रत्येकाचे प्रत्येकी दोन प्रकार पडतात असे सांगितले आहे.[१२६]

अमृतानंदयोगी यांनी प्रस्तुत अलंकार अनेक प्रकारचा असल्याचे सांगून त्याने कोणत्याही प्रकारच्या नावाचा उल्लेख दिला नाही.[१२७]

## १.६ अर्थान्तरन्यास आणि इतर अलंकार : तुलनात्मक विचार

अलंकाराच्या संख्येबाबत विचार करता असे दिसून येते की, भरतमुनींनी फक्त चार अलंकार सांगितले पण नंतरच्या काळात उद् [illegible] ४१ अलंकार, मम्मटाने ६७ अलंकार, विश्वनाथाने ८४ अलंकार, अप्पय दीक्षिताने ११९ अलंकार अशी वाढत वाढत २२५ झाली आहे.

यावरुन असे लक्षात येते की, कोणत्यातरी आधारे आणि त्यातूनही सूक्ष्मातिसूक्ष्म भेद करुन अलंकारांच्या नवीन नवीन प्रकारांचा विकास झाला. त्यांतील काहींमध्ये साधर्म्य व वैधर्म्य असणे स्वाभाविक आहे. म्हणून एका अलंकाराचा दुसऱ्या अलंकाराशी काय संबंध आहे आणि त्याच्या प्रकारांचे मूळ काय हे पाहणे आवश्यक आहे. आता अर्थान्तरन्यास अलंकाराचे स्वरुप व प्रकार पाहता असे वाटते की, त्याचा संबंध उपमा अलंकारासह अथवा साधर्म्यावर आधारित सर्व अलंकारांशी आहे. तसेच त्याचा संबंध तर्कमूलक

[१२३] वा.ल. ६.९२, पृ. २४२

[१२४] काव्यालं. ( भा ) २.७३, पृ. ६७,
अलं. रत्ना. पृ. १३०, ओळ क्र. ८-९.
रस गंगा. सू.क्र.२१
शि. प्र. का.ल श्लोक १०८, पृ. ६३,
बाल. पृ. ६९ ओळ क्र. ११-१३.

[१२५] अलं. सर्व.सू.३५

[१२६] शि.प्र. का.लं. श्लोक १०८, पृ. ६३

[१२७] अलं.सं. पंचम परिच्छेद पृ. ३९, ओळ क्र. ९

अलंकाराबरोबरही असू शकतो, म्हणून शास्त्रकारांमध्ये हा विचार पडला की, अर्थान्तरन्यास अलंकार साधर्म्यमूलक आहे की तर्कमूलक आहे ? या समस्येचा विचार प्रस्तुत प्रबंधात अन्यत्र केला आहे. [१२८]

अर्थान्तरन्यास अलंकाराचे मूळ समर्थ्य-समर्थक-भाव असल्यामुळे ज्या अलंकारात तो आहे त्यांचा या अलंकाराशी संबंध प्रत्यक्ष आहे. उदा. प्रतिवस्तुपमा[१२९] व दृष्टान्त[१३०] निदर्शना अलंकारात सामान्यविशेषभाव आणि समर्थ्यसमर्थक भाव दिसून येतो.[१३१] या शिवाय विकस्वर, उदाहरण इत्यादी अलंकारातही समर्थ्यसमर्थक भाव असल्यामुळे या अलंकारांचा अर्थान्तरन्यासाबरोबर काय फरक आहे हे पाहणे युक्तिसंगत होईल. त्यामुळे या प्रकरणात या गोष्टीचा क्रमशः विचार केला आहे.

(अ) अर्थान्तरन्यास आणि काव्यलिंग :

अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार सांगताना जिनसेनाचार्य यांनी ' कार्यकारणभावावर आधारित पहिल्यांदा कार्याद्वारा कारणाचे समर्थन हा प्रकार सांगितला.[१३२] रुय्यकाने अर्थान्तरन्यासाचे वर्णन करताना कारणद्वारा कार्याचे समर्थन हा प्रकार सांगून त्याचे साधर्म्य- वैधर्म्य मानले.[१३३] त्यानंतर विश्वनाथ, हरिदास सिद्धान्त वागीश आणि डॉ.शंकर देव 'अवतरे' यांनी रुय्यकाचे मत अनुसरले. इतरांनी कार्य-कारणभावाधारित अर्थान्तरन्यासाचा प्रकार मानला नाही.

या प्रसंगी अशी शंका निर्माण होते की, कार्यकारणभावावर आधारित अथवा कार्यद्वारा कारणाचे समर्थनरुप अलंकार काव्यलिंगाशी संबधित आहे का? आणि काव्यलिंग अलंकारात देखील समर्थ-समर्थक-भाव[१३४] असल्यामुळे काव्यलिंग अलंकार अर्थान्तरन्यासाशी निगडित आहे का? म्हणून या ठिकाणी हे स्पष्ट करणे आवश्यक आहे की अर्थान्तरन्यास आणि काव्यलिंगालंकार यांच्यात काय फरक आहे? आणि त्या फरकाचा आधार काय?

काव्यलिंग अलंकारास काही लोक हेतू वा काव्यहेतू असे म्हणतात. प्रस्तुत अलंकार उद्भटने प्रथमच सांगितला.[१३५] त्याच्यानंतर मम्मट, रुय्यक, जयदेव, विश्वनाथ, अप्पय दीक्षित, पंडितराज जगन्नाथ यांनी हा अलंकार मानला आहे.[१३६] मम्मटाने दिलेल्या

---

[१२८] प्रस्तुत प्रबंध प्रकरण क्र. १ उपघटक क्र.१.७

[१२९] प्रतिवस्तूपमा तु सा ।
सामान्यस्य द्विरेकस्य यत्र वाक्यद्वये स्थितिः । का.प्र. सूत्र १५४, पृ. ६33 ओळ क्र. ५ - ६

[१३०] दृष्टांतः पुनरेतेषां सर्वेषां प्रतिबिम्बनम् । सूत्र १५५, कारिका १०२ पृ. ६3६, ओळ क्र. 3

[१३१] निदर्शना । अभवन् वस्तुसम्बन्ध; उपमा परिकल्पकः । का. प्र.सूत्र. १४९ कारिका ९७ पृ. ६१3, ओळ क्र. ५-६

[१३२] अलं. चिन्ता. ४.७४ पृ. ८९

[१३३] अलं. सर्व.सञ्जी. पृ. २०१, ओळ क्र. ६-९

[१३४] समर्थनीयस्यार्थस्य काव्यलिङ्गं समर्थनम् । कुवल. पृ.१२७, ओळ क्र. ५

[१३५] श्रुतमेकं यदन्यत्र स्मृतेरनुभवस्य वा ।
हेतुतां प्रतिपद्येत काव्यलिङ्गं तदुच्यते ॥ ७ ॥ (७४) का.सा.सं.पृ.७०

[१३६] काव्यलिङ्गं हेतोर्वाक्यपदार्थता । का.प्र. १०.११४ सू.१७४ पृ. ६६७
हेतोर्वाक्यपदार्थत्वे काव्यलिङ्गम् । अलं.सर्व. सञ्जी.सू.५७, पृ. २६3
स्यात्काव्यलिङ्गं वागर्थो नूतनार्थ समर्पकः । चन्द्रा. ५.3८, पृ.१४७

लक्षणाचा प्रभाव नंतरच्या आलंकारिकांवर दिसून येतो. विश्वनाथाने अनुमान, काव्यलिंग आणि अर्थान्तरन्यास यांच्यातील भेद दाखविला आहे. मम्मटाने काव्यलिंगातर्गत काव्यहेतूचा अंतर्भाव केला आहे. त्याच्या पूर्ववर्ती असलेल्या दण्डी व भोज यांनी काव्यलिंगाला हेतूमध्ये अन्तर्भूत करून त्याचे नाव 'कारकहेतू' असे दिले आहे. रुय्यकाचा टीकाकार जयरथ प्रस्तुतचा अलंकार स्वीकारीत नाही.

काव्यलिंग आणि अर्थान्तरन्यास यांच्यातील फरकाविषयी चर्चा रुय्यक, विद्याधर, विद्यानाथ, पंडितराज जगन्नाथ, भट्टशंकर पुरोहित आणि पं. विश्वेश्वर पाण्डेय यांनी केली आहे. त्याचे सार इथे दिले आहे : –

अर्थान्तरन्यास अलंकारामध्ये दोन स्वतंत्र वाक्ये असतात. त्यांतील एक वाक्य समर्थनीय असते आणि दुसरे वाक्य समर्थक असते. समर्थनीय वाक्य हे सापेक्ष नसते आणि ते त्याच्या पूर्ततेसाठी समर्थक वाक्यावर अवलंबून नसते. समर्थक वाक्य त्याला फक्त पुष्टी देते. पण काव्यलिंग अलंकारात कारण हे समर्थक वाक्य म्हणून येत नाही ते कारणरूपात आलेले असते. म्हणजे इथे चमत्काराचे कारण हेतूचे वर्णन आहे. समर्थनात नाही. रुय्यकाने दिलेली दोन उदाहरणे अशी आहेत : –

कार्यकारणधर्ममूलक अर्थान्तरन्यास –

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।
वृणुते हि विमृष्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव सम्पदः ॥[१३७]

काव्यलिंग –

यत्त्वनेत्रसमानकान्ति सलिले मग्नं तदिन्दीवरं
मेघैरन्तरितः प्रिये तव मुखच्छायानुकारी शशी ।
येऽपि त्वद्गमनानुसारिगतयस्ते राजहंसा गता–
स्त्वत्सादृश्यविनोदमात्रमपि मे दैवेन न क्षम्यते ॥[१३८]

या ठिकाणी 'सहसा विदधीत . .. ' या श्लोकातील पहिले वाक्य हेतू निरपेक्ष आहे. ते आपोआप पूर्ण आहे. ते वाक्य दुसऱ्या कारणाची अपेक्षा करीत नाही. पण याच श्लोकातील दुसरे वाक्य म्हणजे ' विचारपूर्वक कार्य करणाऱ्या व्यक्तीच्या गुणावर लुब्ध होऊन लक्ष्मी त्याला स्वतः होऊन वरते.' हे वाक्य समर्थक वाक्य आहे आणि ते निर्देश केल्याबरोबर पूर्ववाक्याचे कारण बनते. रुय्यकाच्या मतानुसार या श्लोकात कारणद्वारा कार्याचे समर्थनरूप अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या ठिकाणी दुसऱ्या उदाहरणात पहिल्या तीन पादांमध्ये हेतूचे वर्णन आले आहे. हेतुरूपात असलेल्या उपर्युक्त तीन पादांचे वर्णन न होता अंतिम वाक्याचा अर्थ पूर्ण होत

---

हेतोर्वाक्यपदार्थत्वे काव्यलिङ्गं निगद्यते ॥ सा.द. १०.६२ पृ. ५८3
समर्थनीयस्य काव्यलिङ्गं समर्थनम् । कुवल. श्लोक क्र. १२० पृ. १२७
अनुमितिकारणत्वेन सामान्यविशेषभावाभ्यां चानालिङ्गितः
प्रकृतार्थोपपादकत्वेन विवक्षितोऽर्थः काव्यलिङ्गम् । रस.गंगा. सूत्र ६६, पृ. ६६१ ओळ क्र. 3 – ५
[१३७] अलं.सर्व. सञ्जी. श्लोक क्र. १३८ पृ. २०3
[१३८] कित्ता. श्लोक क्र. १९२ पृ. २६४

नाही. आणि जिथे शेवटच्या वाक्याच्या पूर्ततेसाठी पहिल्या वाक्याची अपेक्षा असते तिथे काव्यलिंग अलंकार असतो. शिवाय जिथे कारण अथवा हेतू वाक्यार्थात उपनिबद्ध असतो तिथे काव्यलिंग अलंकार होतो. म्हणून प्रस्तुत उदाहरणात काव्यलिंग अलंकार आहे.
परंतु रूय्यकाने सांगितलेल्या 'सहसा विदधीत.' या श्लोकात हेतूचा स्पष्ट निर्देश असल्यामुळे विद्वान लोक काव्यलिंग अलंकार मानीत नाहीत, कारण काव्यलिंग अलंकारात हेतू व्यंग्य असतो. शिवाय या श्लोकातील कार्यकारणसंबंध सामान्य-विशेषभावाधारित नाही म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार होत नाही. डॉ. रेवाप्रसाद द्विवेदी हे या ठिकाणी काव्यलिंग आणि अर्थान्तरन्यास या दोहोंपैकी कोणताही अलंकार मानीत नाहीत.[१३९] या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा की, काव्यलिंग अलंकारात प्रस्तुताच्या समर्थनाची अपेक्षा असते आणि जिथे ते समर्थन कोणत्यातरी वाक्याने केले जाते. तसेच निरपेक्ष विषयाचे अप्रस्तुत उक्तीने समर्थन केले जाते आणि कवीकडून त्याच्या माध्यमातून अर्थप्रतीतीचे दृढीकरण होते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार असतो. या नियमाला अगदी उलट असणारे अर्थान्तरन्यासाचे उदाहरण अप्पय दीक्षितांनी दिलेले आढळते. तिथे निरपेक्षाचे समर्थनात काव्यलिंग व सापेक्षाचे समर्थनात अर्थान्तरन्यास अलंकार होतो. अप्पय दीक्षिताने दिलेले काव्यलिंग अलंकाराचे उदाहरण पुढीलप्रमाणे –

चिकुरप्रकरा जयति ते विदुषी मूर्धनि यान्बिभर्ति सा ।
लोकोच्छेदिनि मोक्षनामनि महामोहे निलीयामहे ।। [१४०]

Th 11146

या उदाहरणात पहिल्या ओळीत आलेले वाक्य पूर्ण आहे म्हणजे ते निरपेक्ष असून ते त्याच्या समर्थनाची अपेक्षा करीत नाही. तरीदेखील त्याचे समर्थन दुसऱ्या वाक्याने केले आहे आणि इथे त्याने काव्यलिंग नामक अलंकार मानला आहे. तात्पर्य असे, काव्यलिंग अलंकारात असे उदाहरण आढळते की, त्या ठिकाणी समर्थन निरपेक्ष असते.

अर्थान्तरन्यास अलंकाराच्या समर्थनाविषयी अप्पय दीक्षित असे लिहितात की, जिथे प्रस्तुत विशेष असते आणि अप्रस्तुत सामान्यरूप असते तिथे समर्थन निरपेक्ष असते. मात्र जिथे समर्थनीय वाक्य म्हणजे प्रस्तुत सामान्य सापेक्ष असते. ते असे म्हणतात की,
"तस्मादुभयोर्व्यभिचारात् समर्थनापेक्षसमर्थने काव्यलिङ्गं, तन्निरपेक्षसमर्थनेऽर्थान्तरन्यास इति न विभागः, किन्तु समर्थ्यसमर्थकयोः सामान्यविशेषसम्बन्धेऽर्थान्तरन्यासः तदितरसम्बधे काव्यलिंगमित्येव व्यवस्थाऽवधारणीया ।[१४१] म्हणजे काव्यलिंग अलंकारात काही ठिकाणी समर्थन सापेक्ष नसते तर ते निरपेक्ष रूपात आढळते आणि अर्थान्तरन्यास अलंकारात देखील समर्थन सापेक्ष इष्ट आहे हा दोहोंतील फरक आहे. याचे तात्पर्य असे

---

[१३९] अलं.सर्व.प्रस्ता. पृ. ४०६
[१४०] कुवल.पृ. १२८ ओळ क्र. ७-८
[१४१] कित्ता. पृ..133 ओळ क्र. ९-१२

की, जिथे समर्थनीय वाक्य व समर्थक वाक्य यांच्यात सामान्य–विशेष–भावसंबंध असेल तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो आणि व्यतिरिक्त ठिकाणी काव्यलिंग अलंकार होतो.[१४२]

या संदर्भात प्रस्तुत प्रबंधकर्त्याचे असे मत आहे की, अर्थान्तरन्यास अलंकारात कार्य–कारण–रूप–समर्थन मानण्याची आवश्यकता नाही. कार्य–कारण–भाव–संबंध असताना जिथे सामान्य–विशेष–भाव संबध लागू पडतो तिथे अर्थान्तरन्यास अलंकार म्हणून स्वीकारण्यास कोणतीही आपत्ती येणार नाही. जिथे असे नसेल तिथे ( कार्य–कारणाचा समावेश ) काव्यलिंग अलंकारात होतो.

भामहासारख्या अनेक आलंकारिकांनी काव्यलिंगाला अलंकाराचे स्थान दिले नाही. कारण तिथे विशेष चमत्कृती नसते. पुढे पंडितराज जगन्नाथाने इतर आलंकारिकांनी मानलेल्या काव्यलिंग अलंकाराच्या ठिकाणी कोणताही अलंकार न मानता तिथे निर्हेतुत्व दोषाचा अभाव मानला आहे. वास्तविक पाहता कोणत्याही कार्यकारणाचे कथन अलंकार होऊ शकत नाही. याचा निष्कर्ष असा की, अर्थान्तरन्यास अलंकारात सामान्य विशेष–भाव असतो आणि वैधर्म्यमूलक समर्थनाचा ध्वनित समावेश होतो. अर्थान्तरन्यास अलंकारात फक्त सामान्य-विशेष भाव संबंध पाहिजे. तिथे कार्यकारणाचा संबंध अर्थान्तरन्यास अलंकाराशी जोडणे योग्य नाही.

शोभाकरमित्राच्या मतानुसार कार्याने कारणाचे समर्थन अथवा कारणाने कार्याचे समर्थन जिथे केले असले तिथे हेतू अलंकार होतो. ( हेतू हे काव्यलिंगाचे दुसरे नाव आहे.) अर्थान्तरन्यास नाही.[१४३]

पंडितराज जगन्नाथ तसेच विद्याधर , विद्यानाथ, पं. विश्वेश्वर पंडित आणि भट्ट शंकर पुरोहित यांनी अर्थान्तरन्यास आणि काव्यलिंग यांतील फरक स्पष्ट करताना असे सांगितले आहे की, रुय्यकाने सांगितलेल्या कार्यद्वारा कारणाचे समर्थन व कारणद्वारा कार्याचे समर्थन या दोन मुख्य प्रकारांचा अंतर्भाव काव्यलिंगात होऊ शकतो.[१४४] कारण रुय्यकाचे मत स्वीकारले तर त्याने दिलेले प्रसिद्ध उदाहरण : –

वपुः प्रादुर्भावादनुमितमिदं जन्मनि पुरा
पुरारे न प्रायः क्वचिदपि भवन्तं प्रणतवान् ।
नमन्मुक्तः संप्रत्यहमतनुरग्रेऽप्यनतिभाक्
महेश क्षन्तव्यं तदिदमपराधद्वयमपि ॥[१४५]

या श्लोकाचा अन्तर्भाव अर्थान्तरन्यासात होतो. या श्लोकात दोन कारणांच्या द्वारा कार्याचे समर्थन केले आहे आणि हा श्लोक परंपरेने पाहता काव्यलिंगाचे उदाहरण म्हणून स्वीकृत आहे. रुय्यकाचे मत मान्य केले तर हे उदाहरण अर्थान्तरन्यासाचे होईल की जे पारंपरिक

---

[१४२] अप्पयदीक्षितास्तु – समर्थ्यसमर्थकयोः सामान्यविशेषभावसम्बन्धेऽर्थान्तरन्यासः, तदितरसम्बन्धे तु काव्यलिङ्गम्, इत्येव व्यवस्था । अलं.मञ्जू. पृ.१६९ ओळ क्र. २3 व पृ. १७० ओळ क्र. २

[१४३] परप्रत्यायकं लिङ्ग हेतुः । लिङ्गेन परप्रत्यायनं परार्थानुानरूपं काव्यलिङ्ग पर्यायो हेत्वलंकार । अलं. रत्ना. पृ १३५

[१४४] अलं. सर्व. सञ्जी.सू.२१ पृ. २०४

मताचे विरुद्ध आहे. म्हणून कार्यकारणभावाधारित समर्थन अर्थान्तरन्यास अलंकारात येत नाही.

भट्टशंकर पुरोहित यांनी या संदर्भात असे म्हटले आहे की, जिथे प्रस्तुताचे समर्थन केले जाते तिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. तसेच जिथे वाक्यार्थ हेतू म्हणून वर्णन केलेला असतो आणि नंतर कार्याचा निर्देश केलेला असतो तिथे काव्यलिंग अलंकार मानला जातो. "तस्मादगत्या प्रस्तुतसमर्थकतयान्वयेऽङ्गीकर्तव्येऽर्थान्तरन्यासो वाक्यार्थेहेतुककाव्यलिङ्गेऽन्तर्भवितुमर्हति ।" [१४६] या प्रसंगी इतरांची मते उद्‌धृत करताना त्यांनी असे लिहिले आहे की, समर्थन सापेक्ष असेल तर काव्यलिंग अलंकार होतो आणि समर्थन निरपेक्ष असेल तर, अर्थान्तरन्यास अलंकार होतो. ते असे म्हणतात की, ' अत्र केचित् – समर्थनसापेक्षस्यार्थस्य समर्थने काव्यलिङ्गम् । निरपेक्षस्यापि प्रतीतिवैभवात्समर्थनेऽर्थान्तरन्यासः । [१४७] या उलट त्यांनी अर्थान्तरन्यास अलंकारात देखील प्रस्तुताचे समर्थन सापेक्ष असते हे दाखविण्यासाठी पुढील दोन उदाहरणे दिली आहेत : –

'अथोपगूढे शरदा शशाङ्के
प्रावृड ययौ शान्ततडित्कटाक्षा।
कासां न सौभाग्यगुणोऽङ्गनानां
नष्टः परिभ्रष्टपयोधराणाम् ॥ '
' दिवाकराद्रक्षति यो गुहासु
लीनं दिवाभीतमिवान्धकारम् ।
क्षुद्रेऽपि नूनं शरणं प्रपन्ने
ममत्वमुच्चैः शिरसां सतीव ॥ ' [१४८]

या दोन्ही श्लोकांत अर्थान्तरन्यास अलंकार आहे. पण इथे समर्थन सापेक्ष आहे. त्यानंतर अलङ्कारमञ्जूषाकाराने अप्पय दीक्षितांचे मत उद्‌धृत केले आहे. त्याने त्याचे विवेचन केले आहे. याची नोंद पूर्वी घेतली आहे.[१४९]

यानंतर प्रस्तुत दोन अलंकारांतील भेद सांगताना श्रीकृष्णब्रह्मतन्त्र परकाल स्वामींना असे सांगितले आहे की, 'काव्यलिंग अलंकार केवळ आर्थ असतो परंतु अर्थान्तरन्यास अलंकार शाब्द आणि आर्थ या दोन प्रकारचा असतो.'[१५०]

---

[१४५] का.प्र.१०, ५०१ पृ. ६७८
[१४६] अलं. मञ्जू. पृ. १६९, ओळ क्र. ९-१०
[१४७] कित्ता. – पृ. १६९, ओळ क्र. ११-१२

[१४८] अलंः मञ्जू. पृ. १६९, ओळ क्र. १४-२१
[१४९] अप्पय दीक्षितास्तु – समर्थ्यसमर्थकयोः सामान्यविशेष-भाव-सम्बन्धे अर्थान्तरन्यासः तदितरसम्बन्धे तु काव्यलिङ्गम् इत्येव व्यवस्था । अलं.मञ्जू. पृ. १६९, ओळ क्र. २३, पृ. १७०, ओळ क्र. २

(आ) अर्थान्तरन्यास आणि प्रतिवस्तूपमा :

अर्थान्तरन्यास आणि प्रतिवस्तूपमा या दोन अलंकारांत समर्थ्यसमर्थकभाव असतो. यातील एका वाक्यात सांगितलेला विषय दुसऱ्या वाक्यातील विषयाचा सहजपणे बोध करून देतो. हे या दोन अलंकारांतील साम्य आहे. आता दोहोंतील फरक असा की, प्रतिवस्तूपमा अलंकारातील दोन्ही वाक्ये एकतर सामान्य असतात अथवा विशेष असतात. पण अर्थान्तरन्यासामध्ये एक वाक्य सामान्य व दुसरे वाक्य विशेष असते. प्रतिवस्तूपमा अलंकारातील दोन वाक्यांत वस्तुप्रतिवस्तुभाव असून त्यातूनच साम्याची प्रचीती आपणांस येते. पण अर्थान्तरन्यासात समर्थ्यसमर्थकभाव असतो.[१५१]

( इ ) अर्थान्तरन्यास आणि दृष्टांत :

अर्थान्तरन्यास आणि दृष्टांत या दोन अलंकारांत समर्थ्य–समर्थकभाव असतो हे दोहोंत साम्य आहे. आता त्या दोघांतील भेद असा दिसून येतो की, दृष्टांत अलंकारात दोन्ही वाक्यांतील विधाने एकतर सामान्य असतात किंवा विशेष असतात. या अलंकारात सामान्य–विशेष–भाव केव्हाही असत नाही. तसेच त्याच्यामध्ये विशेष विशेषभाव किंवा सामान्यसामान्यभाव वसत असतो. पण अर्थान्तरन्यास अलंकारात तसे नसते. यांमध्ये एक सामान्य व दुसरे विशेष असते. म्हणजेच यामध्ये सामान्य विशेष किंवा विशेषसामान्य भाव वसत असतो. बिंब–प्रतिबिंब हा दृष्टान्ताचा आत्मा आहे आणि समर्थ्यसमर्थकभाव हा अर्थान्तरन्यासाचा प्राणप्रदधर्म आहे म्हणजेच तोच त्याचे मूल आहे.[१५२]

( ई ) अर्थान्तरन्यास आणि निदर्शना :

मम्मटाने आपल्या काव्यप्रकाश नामक ग्रंथात निदर्शना अलंकार दोन प्रकारचा सांगितला आहे. पहिल्या प्रकारातील निदर्शनेचे लक्षण 'अभवन् वस्तुसंबन्ध उपमापरिकल्पकः ।[१५३] असे सांगितले आहे. या प्रकारातील निदर्शनेचा अर्थान्तरन्यासाशी संबंध नाही.

पण त्याने सांगितलेल्या दुसऱ्या प्रकारच्या निदर्शनेचा संबंध अर्थान्तरन्यास अलंकाराशी आहे. या प्रकारच्या निदर्शनेचे लक्षण त्याने असे केले आहे – 'स्वस्वहेत्वन्वयस्योक्तिः क्रियैव च सापरा ।[१५४] या निदर्शनेचे उदाहरण त्याने असे दिले आहे की,

उन्नतं पदमवाप्य यो लघुर्हेलयैव स पतेदिति ब्रुवन् ।

---

[१५०] अस्मिन्नलंकारे समर्थ्यसमर्थकभाव आर्थशाब्दश्चालंकारताप्रयोजकः । अलं.मणि. तृतीय भाग. पृ. १३७, ओळ क्र. २१–२२

[१५१] पहा. का.प्र. गजेंद्रगडकर आवृत्ती पृ. ३५३

[१५२] पहा. का..प्र. गजेंद्रगडकर आवृत्ती पृ. ३५३

[१५३] का.प्र. दशम उल्लास सूत्र. ४९, का.क्र. ९७ ( उत्तरार्ध ) पृ. ६१३

[१५४] कित्ता. दशम उल्लास सूत्र ५०. का.क्र. ९८ ( पूर्वार्ध ) पृ. ६१७

शैलशेखरगतो दृषत्कणश्चारुमारुतधुतः पतत्यधः ॥[१५५]

'जो ( मुळातच ) हलका आहे, तो उच्च पद प्राप्त झाल्यावरही अगदी सहजासहजी खाली कोसळेल' असे घोषित करीत, गिरिशिखरावरचा पाषाणकण मंद झुळुकीने उडविला जाऊन खाली पडतो.

या दोन्ही अलंकारांत सामान्य-विशेष-भाव आणि समर्थ्य-समर्थक भाव आहे. हे या दोन अलंकारांतील साम्य आहे. या दोन अलंकारांतील फरक असा की, निदर्शना अलंकारात सामान्य उक्ती आणि विशेष उदाहरण हे दोन्ही कार्यकारणभावावर आधारित असतात. पण अर्थान्तरन्यास अलंकारात सामान्य व विशेष उक्तीत कार्यकारणभाव संबंध स्वतंत्रपणे असू शकतो. म्हणजे कधी विशेष सामान्याचे कारण बनू शकते अथवा सामान्य विशेषाचे कारण बनू शकते. मम्मटाने दिलेल्या वरील उदाहरणातील पूर्व वाक्यात प्रतिपादन केलेले कार्य कारणभावाचे अवच्छेदक आहे. अर्थान्तरन्यास अलंकारामध्ये अशी स्थिती नसते. त्याने -

निजदोषावृतमनसामतिसुन्दरमेव भाति विपरीतम् ।
पश्यति पित्तोपहतः शशिशुभ्रं शङ्खमपि पीतम् ॥ [१५६]

स्वतःच्या दोषांनी ज्यांचे मन गढूळलेले आहे त्यांना अत्यंत सुंदर वस्तू विपरीत (विरूप ) भासते. कावीळ झालेल्याला चंद्रासारखा पांढरा शंख देखील पिवळा दिसतो.

प्रस्तुत श्लोकात पूर्वार्ध प्रतिपाद्य वाक्यात असलेले कार्यकारणभावाचे अवच्छेदक दोषत्व आहे आणि कार्यतावच्छेदक विपरीत ज्ञातत्व आहे. दुसऱ्या वाक्यात पीतत्वं कारणतावच्छेदक आहे आणि विपरीत चक्षुत्व कार्यतावच्छेदक आहे. म्हणून दोन्ही ठिकाणी कार्यतावच्छेदक व कारणतामावच्छेदक भिन्न असल्याने अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

( ३ ) अर्थान्तरन्यास आणि विकस्वर :

विकस्वर अलंकाराचा आधार समर्थ्य-समर्थक-भाव असल्यामुळे तो अर्थान्तरन्यास अलंकाराशी संबंधित आहे, म्हणून पंडितराज जगन्नाथ हे उपमाद्वारा समर्थित विकस्वर अलंकारास अर्थान्तरन्यास अलंकारात अन्तर्भूत करतात.[१५७] विकस्वर अलंकाराची कल्पना अर्थान्तरन्यास अलंकारातून निर्माण झाली आणि त्याची संकल्पना जयदेवाने प्रथम मांडली. त्यानंतर अप्पय दीक्षितानेही हा अलंकार मांडला आहे. या अलंकाराच्या स्वरूप ात नंतरच्या काळात काही बदल झालेला नाही. त्यामुळे याचा विकास झाला नाही. हा अलंकार सर्वस्वीकृत नाही. जयदेवाने विकस्वराचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे -

यस्मिन् विशेषसामान्यविशेषाः स विकस्वरः ।[१५८]

---

[१५५] कित्ता. १०.४३८ पृ. ६१७
[१५६] कित्ता. १०.४७८ पृ. ६६२
[१५७] अलं.मंज. पृ. ३६७
[१५८] चंद्रा. ५.६९ पृ.८६ ओळ क्र. ११

अर्थात जिथे विशेषाचे समर्थन सामान्याद्वारा केलेले असते आणि त्या सामान्याचे समर्थन पुन्हा विशेषद्वारा केलेले असते तिथे विकस्वर अलंकार होतो. त्याने त्याचे उदाहरण असे दिले आहे की,

स न जिग्ये महान्तो हि दुर्धर्षाः क्ष्माधरा इव । [१५९]

अप्पय दीक्षितांनी जयदेवाने सांगितलेले विकस्वर अलंकाराचे लक्षण व उदाहरण उद्धृत केलेले दिसते.[१६०] त्यानंतर ते असे लिहितात की,

'यत्र कस्यचिद्विशेषस्य समर्थनार्थं सामान्यं विन्यस्य तत्प्रसिद्धावप्यपरितुष्यता कविना तत्समर्थनाय पुनर्विशेषान्तरमुपमानरीत्यार्थान्तरन्यासविधया वा विन्यस्यते तत्र विकस्वरालङ्कारः ।' [१६१]

श्रीकृष्णब्रह्मतंत्र परकाल स्वामींनी विकस्वर अलंकाराचे लक्षण त्याच अर्थाचे दिले आहे. [१६२] ते पुढे म्हणतात की 'अयमलंकारश्चन्द्रालोकानुयायि दीक्षितानुरोधेन दर्शितः' ।[१६३] याप्रसंगी त्यांनी पंडितराज जगन्नाथाचे मत उद्धृत केले आहे. ते म्हणतात –

'जगन्नाथादयस्तु–प्रकृतविशेषस्यसामान्येन समर्थनादेकोऽर्थान्तरन्यासः । सामान्यस्य विशेषेण समर्थनादपर इति भेदद्वयात्मक तया स्फुटत्वात्संसृष्टयै च गतार्थत्वान्नलंकारान्तरस्वीकार उचित इत्याहुः ॥' [१६४]

( ऊ ) अर्थान्तरन्यास आणि व्यतिरेक :

अर्थान्तरन्यास आणि व्यतिरेक हे दोन अलंकार भिन्न–भिन्न प्रकारचे असल्याने या दोहोंत कोणत्याही प्रकारचे साम्य असण्याचे कारण नाही. त्यामुळे अर्थान्तरन्यास अलंकार आणि व्यतिरेक अलंकार यांची तुलना करण्याची आवश्यकता वाटत नाही. तरी देखील वामनाचार्य यांनी 'काव्यालंकारसूत्र' या ग्रंथात पूर्वाचार्यांचे मत म्हणून असे दिले आहे की,

अर्थान्तरन्यास अलंकार हेतुरूप असल्यामुळे आणि हेतू अन्वय–व्यतिरेकी असल्याने व्यतिरेक अलंकार अर्थान्तरन्यास अलंकाराहून वेगळा नाही असे काही लोकांचे मत आहे. पुढे वामनाचार्यांनी प्रस्तुत मताचे खंडन केले आहे.[१६५] पण आजवरच्या प्रकाशित वा अप्रकाशित कोणत्याही ग्रंथात असा निर्देश नाही की अर्थान्तरन्यास व व्यतिरेक एक अलंकार नाही आहे. त्याचे कारण अगदी स्पष्ट आहे की, सहेतुक व्यतिरेक अलंकार एका वाक्यात होतो आणि त्याचे मूळ कार्यकारणावर आधारित नसून उपमान व उपमेय यांच्यात

---

[१५९] कित्ता. ५.६९ पृ.८६, ओळ क्र. १२
[१६०] कुवल. श्लोक क्र. १२३ पृ. १३४
[१६१] कित्ता. पृ. १३४ ओळ क्र. ५–७
[१६२] सामान्येन विशेषस्य क्रियते सत्समर्थनम् । पुनस्तस्य विशेषेण स विकस्वर ईर्यते ॥
अलं. मणि. पृ. १३८
[१६३] कित्ता – पृ. १३६९ ओळ क्र. १६
[१६४] कित्ता. पृ. १३९ ओळ क्र. १७–२०

भेद स्थापित करणे हे आहे. या उलट अर्थान्तरन्यास अलंकार साम्यमूलक अलंकार आहे. अर्थान्तरन्यास अलंकारातील दोन वाक्यांत साम्य दाखविणे अभिप्रेत असते म्हणून या दोहोंमध्ये कोणताही संबंध नाही.

( ए ) अर्थान्तरन्यास आणि उदाहरण :

शोभाकरमित्र यांनी उदाहरण या अलंकाराचे लक्षण असे दिले आहे –

**सामान्योद्दिष्टानामेकस्य निदर्शनमुदाहरणम्** [१६६]

आणि त्याने उदाहरणासाठी कुमारसंभवातील एक प्रसिद्ध श्लोक उदाहरण म्हणून दिला आहे. तो असा –

**अनन्तरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ।**
**एको हि दोषो गुण सन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्क॥** [१६७]

यावर टीका लिहिताना त्याने असे मानले आहे की, इथे उपमा अलंकार नाही. कारण उपमेपासून उपमानाचे वस्त्वन्तरत्व दिसत नाही.[१६८]

पंडितराज जगन्नाथ ' उदाहरण ' या अलंकाराचे लक्षण असे देतात की,

**सामान्येन निरूपितस्यार्थस्य सुखप्रतिपत्तये तदेकदेशं**
**निरूप्य तयोरवयवावयविभाव उच्यमान उदाहरणम् ।**[१६९]

जिथे एक विशेष वाक्य सामान्य वाक्याच्या सहज बोधासाठी उद्‌धृत केले जाते आणि जिथे विशेष वाक्य व सामान्य वाक्य यांच्यात अवयव – अवयवी–भावसंबंध असतो तिथे उदाहरण अलंकार होतो.

'अलंकारसर्वस्वा' चा टीकाकार जयरथाने अर्थान्तरन्यास अलंकाराहून उदाहरण अलंकार वेगळा अलंकार मानला आहे. तरीही त्याचे मत शोभाकरमित्रापेक्षा भिन्न आहे. पंडितराज जगन्नाथाने उदाहरण अलंकाराचा इतर अलंकारात अंतर्भाव करण्याचे खंडन केले आहे.[१७०]

---

१६५ *अर्थान्तरन्यासस्य हेतुरूपत्वात् हेतोश्चान्वयव्यतिरेकात्मकत्वात् न पृथग्व्यतिरेक इति केचित् । तन्निरासार्थमाह-* उपयेयस्य गुणातिरेकत्वं व्यतिरेकः । का.सू. ( वृत्ती ) ४.3.२१–२२ पृ. ५५ ओळ क्र. २१–२३

१६६ अलं. रत्ना. सू.. १२ पृ.१२

१६७ कुमार. १.3 कित्ता पृ. 13

१६८ न चेययमुपमा उपमेयादुपमानस्य वस्त्वन्तरभूतत्वे तस्याभावात् । कित्ता. पृ. १3, ओळ क्र. ९-१०

१६९ रस. गंगा. सू.क्र. २१, पृ. १९७

१७० रस गंगा पृ. ६७४

नागेशभट्ट यांच्या मतानुसार उदाहरण अलंकार अर्थान्तरन्यास अलंकाराहून भिन्न अलंकार नाही.

नंतरच्या काळातील अलंकारशास्त्रज्ञांनी जगन्नाथ पंडितांचे मत स्वीकारले आहे असे दिसते. म्हणजेच उदाहरण अलंकाराचे स्वतंत्र अस्तित्व मानले.

या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा की, शोभाकर मित्र, पंडितराज जगन्नाथ आणि जयरथाने अर्थान्तरन्यास अलंकारापासून उदाहरण अलंकाराचे स्वतंत्र अस्तित्व स्वीकारले आहे आणि इतर अलंकारात त्याचा अंतर्भाव होऊ शकत नाही अशी उक्ति दिली आहे.

रसगंगाधरचा टीकाकार नागेशाच्या मते उदाहरण अलंकार अर्थान्तरन्यास अलंकारहून वेगळा आहे. जगन्नाथोत्तर कालीन आलंकारिकारांनी त्याच्या मताचे अनुकरण करून अर्थान्तरन्यास अलंकाराचे वेगळे स्वरूप मानले आहे.[१७१]

### ( ऐ ) अर्थान्तरन्यास आणि प्रत्यनीकन्यास

भोजाने प्रत्यनीकन्यास हा अलंकार अर्थान्तरन्यास अलंकाराचा एक प्रकार म्हणून सांगितला आहे.[१७२] भोजाव्यतिरिक्त मम्मट, पंडितराज जगन्नाथ, जयदेव आणि अप्पय दीक्षित यांनी या अलंकाराचे अस्तित्व मान्य केले आहे.[१७३] या अलंकारात बलवान शत्रूचा प्रतिकार करणे कठीण झाले असता त्यासंबंधीचा प्रतिकार केला जातो. यात कार्यकारणाचा निर्देश असून अशा प्रकारची परिस्थिती असते की, विरोधी सबल व्यक्तीकडून पराजित होऊन त्याचा काहीसा बदला घेतला आहे. अलंकारामध्ये प्रथमतः कार्य–कारणभावाला काव्यलिंगाचा विषय मानला आहे, अर्थान्तरन्यासाचा नाही. प्रत्यनीकन्यासात सामान्य–विशेष–भावाचा अंतर्भाव नसतो. दुसरी गोष्ट अशी की, भोजाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही साहित्यशास्त्रकाराने अर्थान्तरन्यासान्तर्गत मानला नाही. पंडितराज जगन्नाथाने या अलंकाराचा अंतर्भाव प्रतीयमान हेतूत्प्रेक्षेमध्ये केला आहे. परंतु विश्वेश्वर या मताशी सहमत नाहीत. त्यांचे असे म्हणणे आहे की,प्रत्यनीकन्यास अलंकारात दोन कारणे असतात आणि हेतूत्प्रेक्षा अलंकारात केवळ एक कारण असते. अशाप्रकारे या दोहोंत विशेष फरक दाखविणे शक्य नाही.प्रस्तुत अलंकार हा एक स्वतंत्र अलंकार आहे असे दिसून येते.

---

[१७१] ननु 'अर्थान्तरन्यासभेद एवोदाहरणालङ्कारः, पृथगलङ्कारकल्पनायाः काऽऽवश्यकता? समाधत्ते सामान्यविशेषयोरवयवावयविभावबोधकः
इवादिशब्दः प्रयुङ्क्ते सामान्यविशेषयोः द्वयोरपि पदार्थयोरेकस्मिन्नेवविधेये ( क्रियायाम् ) अन्वयः।
अर्थान्तरन्यासे तु अवयवावयविभावबोधक इवादिशब्दप्रयोगो न भवति तथा सामान्यविशेषयोर्द्वयोः
पदार्थयोरन्वयो भिन्न–भिन्न क्रियायां भवति। इति वैलक्षण्यान्नार्थान्तरन्यासस्य भेदो
भवितुमर्हत्युदाहरणालङ्कारः। रस.गंगा. द्वितीय भाग, त.टी. क्र. १ पृ. २०२, ओळ क्र. १३-१८

[१७२] प्रोक्तो यस्तूभयन्यासोऽर्थान्तरन्यासः एव सः।
स प्रत्यनीकन्यासश्च प्रतीकन्यास एव च॥ सर.कण्ठा. ४.७१, पृ. २१६

[१७३] प्रतिपक्षमशक्तेन प्रतिकर्तुं तिरस्क्रिया।
या तदीयस्य तत्स्तुत्यै प्रत्यनीकं तदुच्यते॥ का.प्र. दशम उल्लास सू. १९६, का. १२९ पृ.७२५

शिवाय भोजाने या अलंकारास अर्थान्तरन्यासाचा प्रकार म्हणून सांगितला आहे, ते प्रस्तुत प्रबंधकर्त्यास मान्य नाही.

( ओ ) अर्थान्तरन्यास आणि उभयन्यास

उभयन्यास अलंकार सर्वप्रथम रुद्रटाने सांगितला. ज्याप्रमाणे अर्थान्तरन्यास अलंकारात एक वाक्य सामान्य व दुसरे वाक्य विशेष असते आणि दृष्टांत अलंकारात दोन्ही वाक्ये विशेष असतात त्याप्रमाणे उभयन्यास अलंकारात दोन्ही वाक्ये सामान्य असतात. हाच या अलंकाराचा अर्थान्तरन्यासातून फरक आहे. काही साहित्यशास्त्रकारांनी दृष्टांत अलकारातच उभयन्यासाचा अन्तर्भाव केला आहे आणि असे मानले आहे की, जिथे विशेषाचे विशेषद्वारा अथवा सामान्याचे सामान्याद्वारा बिंबप्रतिबिंब रूपात वर्णन असेल तिथे दृष्टान्त अलंकार असतो. उभयन्यास अलंकार नंतरच्या काळात लोकप्रिय झाला नाही. तो केवळ साहित्यशास्त्रात राहिला आहे.[१७४]

## १.७ अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक आहे की तर्कन्यायमूलक आहे ?

साहित्यशास्त्रग्रंथामधील अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार पाहता असा प्रश्न निर्माण होतो की, अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यभूलक आहे की तर्कमूलक आहे ? याविषयी सविस्तर चर्चा उपलब्ध होत नाही. वास्तविक पाहता हा मुद्दा प्रकारविषयक नाहीच. अर्थान्तरन्यासाच्या प्रकारांचा विचार करता असे दिसून येते की, अर्थान्तरन्यासाचा मूलाधार असलेल्या समर्थ्य-समर्थक-भावाचा आधार घेऊन या अलंकाराचे २,४,८ अथवा अधिक प्रकार मानले आहेत.[१७५] या प्रकारांचा विचार करताना असे दिसून येते की, अलंकारांचे साधारण वर्गीकरण करताना वेगळी दृष्टी होती. याची चर्चा याच प्रकरणात यापूर्वी केली आहे.[१७६] प्रा. चांदोरकर यांनी काव्यप्रकाश ग्रंथांच्या प्रस्तावनेत अलंकारांचे जे वर्गीकरण दिले आहे ते त्यांनी डॉ. ए.बैन यांच्या Ancient Sanskrit Literature या ग्रंथात दिलेल्या मनोवैज्ञानिक प्रयोगावर आधारित केले आहे. त्या ग्रंथात त्याने आलंकारिक विधानाथाचा आश्रय घेऊन अर्थान्तरन्यास अलंकार, काव्यलिंग अलंकार आणि अनुमान अलंकार हे तर्कन्यायमूलक अलंकारात समाविष्ट केले आहेत.[१७७]

---

१७४ पहा. का..प्र. गजेंद्रगडकर आवृत्ती पृ. ३५३-५४

१७५ भामहाने दोन, रुद्रटाने चार, जीनसेनाचार्यांनी तीन, हेमचंद्राने दोन, रुय्यकाने आठ, अमृतानंदांनी अनेक प्रकार सांगितले आहेत. अधिक माहितीसाठी पहा- प्रस्तुत प्रबंध प्रकरण पहिले . १.५ - 'अर्थान्तरन्यासाचे प्रकार' पृ . २१-२९

१७६ पहा प्रस्तुत प्रबंध प्रकरण पहिले. १-3 - अर्थान्तराचे वर्गीकरण पृ.५-६

१७७ Shri. D.N. Chandorkar ( Ed.) The Kavyarakasha of Mammata – Ullasa X, Poona 1896. Introduction Page No.3 आणखी पहा. अथ तर्कन्यायमूलकालंकाराः निरुप्यन्ते । पृ. ३२२, ओळ क्र. ८

प्रा. पी.के. गोडे यांनी या मतावर टीका करताना प्रा. चांदोरकरांच्या मताचे खंडन केले आहे. त्यांचे म्हणणे असे की, अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक आहे तो तर्कमूलक नाही. ते लिहितात – " It would, therefore be more rational to say that the figure is ` Sādṛsya-mūla; than to style it is ' tarkanyāyamūla ` as Vidyānātha does. "[१७८]

प्रा. ए.एस . भांडारकर यांनी प्रा. पी.के. गोडे यांच्या मताची चर्चा करण्यासाठी ' Is Arthāntarnyāsa based on Tarka or not ? हा एक शोधपूर्ण लेख लिहून त्यामध्ये त्यांनी प्रा. पी.के.गोडे यांच्या मताचे खंडन केले आहे.[१७९] प्रा. भांडारकर यांनी प्रा. गोडे यांच्या मताचे परीक्षण करताना पुढील तीन प्रश्न उपस्थित केले आहेत :

१. अर्थान्तरन्यास अलंकारात नेहमी सादृश्य असते काय ?
२. आणि तसे असेल तर ते इतके आकर्षक असते का की त्यामुळे त्याला आपण सादृश्यमूलक म्हणू शकू ?
3. अनुमान अलंकारात आढळणारी मनोवैज्ञानिक प्रक्रिया आणि अर्थान्तरन्यासातील तर्काची प्रक्रिया एकसारखी असते का? की त्यामुळे अनुमानाचा अंतर्भाव अर्थान्तरन्यासात होईल.

प्रा. भांडारकर यांनी या प्रश्नांचा ऊहापोह करून असा निर्णय दिला आहे की, अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक नाही, तो तर्कमूलक आहे आणि अनुमानापासून तो भिन्न आहे.[१८०]

पहिल्या मुद्याची आलोचना करताना प्रा. भांडारकर यांनी मम्मटाचा एक श्लोक उद धृत केला आहे. त्यामध्ये मम्मटाने अर्थान्तरन्यास अलंकार आहे. तो श्लोक असा –

सुसितवसनालंकारायां कदाचन कौमुदी–
महसि सुदृशि स्वैरं यान्त्यां गतोऽस्तमभूद्विधुः ।
तदनु भवतः कीर्तिः केनाप्यगीयत येन सा
प्रियगृहमान्मुक्ताशङ्का क्व नासि शुभप्रदः ॥[१८१]

एकदा एक सुंदर ( अभिसारिका ) स्त्री अत्यंत शुभ्रवस्त्रालंकार लेऊन टिपूर चांदण्यात स्वच्छंदपणे जात असता ( एकदम ) चंद्र अस्ताला गेला. त्यानंतर कोणीतरी तुझ्या कीर्तीचे पवाडे गाण्यास सुरुवात केली; त्याबरोबर ती निर्भयपणे प्रियतमाच्या घरी गेली. (खरोखर) कुठे बरे तू शुभदायक नाहीस ?

---

१७८ पहा Gode P.K. The Problem of the Classification of Alamkaras, ॲ.भा. ओ.रि.इ. खंड २ भाग १. १९२० – २१ जुलै १९२० पृ. ७१ ओळ क्र. २५ – २७
१७९ ॲ.भा. ओ. रि.इ. खंड २ भाग २, १९२०–२१, जाने. १९२१ पृ. १९१ – १९६
१८० पहा. कित्ता पृ.१९१-१९६
१८१ का. प्र. १०-४७९ पृ. ६६२

या श्लोकात कोणतेही सादृश्य दिसत नाही. जर श्री. गोडे यांचे मत विचारात घेतले तर हा श्लोक अर्थान्तरन्यासाचे उदाहरण होऊ शकत नाही आणि तसे म्हटल्यास ते मम्मटाच्या मताविरोधी होईल की जे कोणासही मान्य होणार नाही. शिवाय सादृश्य नसताना अर्थान्तरन्यास अलंकार असल्यास तो सादृश्यमूलक आहे हे म्हणणे कितपत योग्य होईल ? प्रा. भांडारकर लिहितात की, " And if Arthāntaranyāsa can exist without even a semblance of Sadrsya this can by no means be called its basis. " [182]

यानंतर दुसऱ्या प्रश्नाची चर्चा केली आहे. ती करताना प्रा. भांडारकर यांनी मम्मटाने दिलेले आणखी एक उदाहरण दिले आहे. ते असे :

निजदोषावृतमनसा मति सुन्दरमेव भाति विपरीतम् ।
पश्यति पित्तोपहतः शशिशुभ्रं शङ्खमपि पीतम ॥ [१८३]

स्वतःच्या दोषांनी ज्यांचे मन गढूळलेले आहे, त्यांना अत्यंत सुंदर वस्तू विपरीत (विरूप ) भासते. कावीळ झालेल्यांना चंद्रासारखा पांढरा शंख देखील पिवळा दिसतो.

या श्लोकात सुंदर व शशिशुभ्र कमळ आणि विपरीत व पीत या दोन जोडयांत सादृश्य आहे. पण येथील सादृश्य आकर्षक नाही. जर पहिली ओळ एखाद्या व्यक्तीच्या अर्थाने घेतली तर इथे कसलेही सादृश्य दिसत नाही. पण इथे दुसऱ्या वाक्यातील विशेषद्वारा सामान्याचे समर्थन केलेले दिसते.

प्रा.भांडारकर यांनी कालिदासाच्या नाटकातील पुढील श्लोक उदधृत केले आहेत –

शमयति गजानन्यान् गन्धद्विपः कलभोऽपि सन्
भवति सुतरां वेगोदग्रं भुजङ्गशिशोर्विषम्
भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं
न खलु वयसा जात्यैवायं स्वकार्यसहो भरः ॥[१८४]

प्रस्तुत श्लोकात सादृश्य ( Poetic similarity ) इप्सित नसल्याचे त्यांनी सांगितले आहे.

सुतनु! हृदयात् प्रत्यादेशव्यलीकमपैतु ते
किमपि मनसः संमोहो मे तदा बलवानभूत् ।
प्रबलतमसामेवंप्राया: शुभेषु हि वृत्तयः
[illegible] क्षिप्तां धुनोत्यहिशङ्कया ॥ [१८५]

---

[१८२] ॲ.भां. ओ.रि.इ. खंड २ भाग २. जाने. १९२१ पृ.१९३, ओळ क्र. १४-१६
[१८३] का.प्र. १०.४७८ पृ.६६२
[१८४] माल. ५.१८ पृ ५२१
[१८५] अभि. शा. ७.२४ पृ. ६५०

दुसऱ्या श्लोकात राजाने शकुंतलेजवळ क्षमा याचना केली आहे. तो म्हणतो की. त्याने जे तिच्याशी दुर्वर्तन केले ते त्याच्या मानसिक अवस्थेमुळे आणि त्याच्या समर्थनासाठी त्याने एक सुंदर उदाहरण दिले आहे. आंधळा मनुष्य डोक्यावरील फुलांच्या हाराला सर्प समजून फेकून देतो. या उदाहरणात सादृश्यापेक्षा तर्कालाच अधिक महत्त्व आहे. आणि त्याची स्पष्टता आहे. म्हणून अर्थान्तरन्यासाचे मूळ सादृश्य नसून तर्कन्याय हेच आहे आणि विद्यानाथ मताप्रमाणे [१८६] या अलंकारचा समावेश तर्कन्यायमूलक वर्गीकरणात करणे योग्य आहे.

भांडारकरांनी अर्थान्तरन्यास व अनुमान अलंकाराची विशेषता आणि भिन्नता दाखवून शेवटी निष्कर्षात असे म्हणतात की, " It will be clear from this discussion, it is hoped, that the mental processes involved in the appreciation of the two figures are quite different and that each has its own characteristic charm distinctive enough to constitute a separate figure and deserve a different name. Arthāntaranyāsa is therefore, based on Tark and not on Sādṛsya, as Vidyānātha and Prof. Chandorkar take it to be ." [187]

आता असा प्रश्न उपस्थित होतो की, प्रा. गोडे व प्रा. भांडारकर यांपैकी कोण बरोबर आहे ? यावर प्रस्तुत प्रबंधकर्त्याचे असे म्हणणे आहे की, प्रस्तुत प्रबंधात कालिदासाच्या वाङ्मयातील सुमारे दोनशे अर्थान्तरन्यासांच्या उदाहरणांचे विश्लेषण केले आहे. त्यांतून असे दिसून येते की, अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक आहे की तर्कन्यायमूलक आहे, हा प्रश्न विचार करण्यायोग्य नाही. कारण भामह-दण्डीपासून पंडितराज जगन्नाथापर्यंतच्या आलंकारिकांनी कोणीही याचे विवेचन केलेले नाही. विद्यानाथही आपल्या मताच्या समर्थनार्थ कोणतीही युक्ती देत नाही. त्याने फक्त अर्थान्तरन्यास अलंकाराचा समावेश तर्कन्यायमूलक गटात केला आहे. दुसरी गोष्ट अशी की जिथे समर्थ्य-समर्थक भाव आहे तिथे अर्थान्तरन्यास अलंकार असतो. तेच अर्थान्तरन्यासाचे मूळ असते.

प्रा. गोडे यांच्या मताचे अनुसरण केले तर काही उदाहरणांच्या ठिकाणी सादृश्य आढळून येते. त्या ठिकाणी भांडारकर यांनी सादृश्य स्पष्ट दिसत नसल्याचे सांगितले आहे. तरीही असे दिसून येते की ज्या ठिकाणी सादृश्य आढळते ते काही उदाहरणात स्पष्ट केले आहे. आणि समर्थ्य–समर्थक असल्यामुळे तर्काचा भाग म्हणजे एकाद्वारा दुसऱ्याच्या बोधा ( Deductive Logic ) चा प्रश्न येतो. त्यामुळे तर्काला पूर्णतः टाळता येत नाही. अर्थात अर्थान्तरन्यास तर्कन्यामूलकही असू शकतो आणि सादृश्यमूलकही असतो. या विशेष मुद्दा असा की समर्थ्य–समर्थक भाव याच अर्थान्तरन्यासाचा आधार आहे.

---

[१८६] अथ तर्कन्यायमूलकालङ्कारा: निरूप्यन्ते । प्र.रु. पृ. ३२२, ओळ क्र. ८
[१८७] अॅ. भा. ओ.रि.इ. खंड २ भाग २ जाने.१९२१ पृ. १९६ ओळ क्र. ९ ते १५

## १.८ अर्थान्तरन्यास आणि सुभाषिते :

संस्कृत काव्यशास्त्रकारांनी काव्यप्रयोजनाचा विचार मांडलेला दिसून येतो. भरत मुनींनी आपल्या ' नाट्यशास्त्र ' या ग्रंथात असे सांगितले आहे की, नाट्य( काव्य ) हे धर्म, यश आणि आयुष्यवर्धक, हितकारक, बुद्धिवर्धक आणि लोकोपदेशक असते.[१८८] आचार्य भामहाच्या मतानुसार निर्माण झालेले सत्काव्य धर्म, अर्थ, काम, क्रोध तसेच कलांमध्ये निपुणता, आनंद आणि यश प्रदान करते.[१८९] अशाच प्रकारे आचार्य मम्मटांनी काव्याच्या प्रयोजनाचा निर्देश करताना काव्य हे व्यवहार-ज्ञानासाठी प्रयोज्य असून काव्यापासून कान्तासम्मिततया लोकांना उपदेश मिळतो असे सांगितले आहे.[१९०] अर्थात काव्याचे एक महत्त्वपूर्ण प्रयोजन लोकांना उपदेश करणे आणि त्यांना सत्प्रवृत्तीकडे प्रवृत्त करणे हे होते. मम्मटांनी पुढे असे सांगितले आहे की, 'रामादिवद्वर्तितव्यं न रावणादिवत् ।'[१९१] म्हणजे रामाप्रमाणे वर्तन करावे, रावणाप्रमाणे नव्हे. ही गोष्ट आपणांस काव्यातूनच कळते आणि कवी तथा काव्यकार काव्यरचना करताना या गोष्टीकडे लक्ष देऊन आपल्या काव्यात इतस्ततः उपदेशवचने वापरतो. कोणत्यातरी पात्राच्या माध्यमातून लोकांना काही तरी उपदेश , काहीतरी संदेश देण्याचा प्रयत्न करतो. काव्य करताना त्याचे लक्ष्य असे असते की, माझ्या काव्यातून लोकांना काय शिक्षण ( messege ) मिळेल ? लोकांना पटेल अशा प्रकारे भाषेचा उपयोग मी करीन. व्यापक अर्थाने अर्थात रूढ् अर्थाने हेच सुभाषित आहे.

### सुभाषित शब्दाचा अर्थ :

सुभाषित पदाची व्युत्पत्ती सु + भाषित अशी आहे. ( भाष् + क्त ) जे सुंदरपणे सुंदर अर्थाने (Charming,apealing) सांगितलेले ( presented, expressed) असते. हा व्युत्पत्त्यर्थ घेतल्यास समग्र संस्कृत वाङ्मय सुभाषित होऊ शकते. सुंदर शब्दांच्या द्वारा अर्थाचे प्रतिपादन करणे म्हणजे काव्य होय. पंडितराज जगन्नाथांनी काव्याचे लक्षण त्याप्रकारचे केले आहे.[१९२] परंतु समग्र काव्याला सुभाषित म्हणणे बरोबर नाही. ज्या अर्थाने ते योजिले जाते ते नव्हे. अर्थात ज्यातून काही संदेश अथवा उपदेश यांची उत्तम अभिव्यक्ती केली जाते ते सुभाषित असते. संस्कृत काव्य-वाङ्मयात अशी सुभाषित विपुल आहेत की केवळ सुभाषितावर अनेक ग्रंथ आपणांस उपलब्ध होतात हे पुढील सूचीवरून ध्यानात येते. नारायण रामचंद्र आचार्य संपादित 'सुभाषितरत्नभांडागारम्', महादेव पांडुरंग

---

[१८८] धर्म्यं यशस्यमायुष्यं हितं बुद्धिविवर्धनम् ।
लोकोपदेशजननं नाट्यमेतद् भविष्यति । नाटय. १.११५ पृ. १२

[१८९] धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासु च ।
प्रीतिं करोति कीर्तिं च साधुकाव्यनिबन्धनम् ॥ काव्यालं. १.२ पृ. ४५

[१९०] काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यः परनिर्वृतये कान्तासंमिततयोपदेशयुजे ॥ का.प्र. १.२ पृ. ६

१९१ कित्ता. पृ. १०, ओळ क्र. ४

१९२

[१९२] रमणीयतार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् । रस. गंगा.१.१

ओक यांची 'सुक्तिसुधातरङ्गिणी', ए.पी. करमरकर यांचा 'Puranic Anthology ( Purāṇa –kāvya- stotra sudhā ) ' हा ग्रंथ, विद्याकर मिश्र यांचे 'विद्याकरसहस्रक,' विद्याकरकृत 'सुभाषित-रत्न कोश', श्रीधरदास यांचे 'सूक्तिकर्णामृत,'सायणाचार्यांचा 'सुभाषित-सुधा-निधिः', कृष्णशर्मा भातवडेकर यांचा 'सुभाषित-रत्नाकर' ही ग्रंथांची यादी पाहिल्यावर आपणांस असे म्हणता येईल की सुभाषित हेच संस्कृत वाङ्मयाचे प्राणभूत तत्त्व आहे. सुभाषिताची प्रशंसा करताना कवी म्हणतो की,

पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ।
मूढैः पाषाणखण्डेषु रत्नसंज्ञां विधीयते ॥ [१९३]

बाणभट्टाने आपल्या कादम्बरी ग्रंथाच्या प्रस्तावनेत सुभाषित हे सज्जन लोकांच्या कण्ठाचे भूषण आहे, असे म्हटले आहे.[१९४] यावरून सुभाषिताचे महत्त्व ध्यानात येते.

## १.८.१ अर्थान्तरन्यास आणि सुभाषित अलंकार यांतील भेदः

काव्यकार काव्यसौंदर्य वाढविण्यासाठी अलंकाराचा प्रयोग करतात. या सर्व अलंकारांत अर्थान्तरन्यास अलंकार असा अलंकार आहे की, जिथे कवी सुभाषितांचा मुक्तपणे वापर करतो. अर्थान्तरन्यासाचे मूळ सुभाषित आहे असे म्हणणे कदाचित अतिशयोक्तिपूर्ण होणार नाही. तरीही सुभाषित आणि अर्थान्तरन्यास अलंकार या दोघांत पुष्कळ फरक आहे तो पुढीलप्रमाणे –

अर्थान्तरन्यास अलंकाराचे मूळ पूर्वी सांगितल्याप्रमाणे [१९५] समर्थ्य-समर्थक- भाव आहे की जिथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो. पण सुभाषितात असे काही अपेक्षित नसते. अधिकतर सुभाषितांचा वापर प्रसंगानुरूप होत असतो. मात्र अर्थान्तरन्यास अलंकारात काही वेळा प्रसंगाशिवाय वापर होऊ शकतो. काव्यात वापरलेले सुभाषित प्रसंगाशिवाय चालत नाही. अर्थान्तरन्यास अलंकारात विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन करताना प्रायशः त्रिकालाबाधित सत्य तसेच प्रसिद्ध विषयांचा उपयोग केलेला असतो आणि जास्त वेळा ते समर्थक वाक्य सुभाषित असते. सर्वच्या सर्व समर्थक वाक्ये सुभाषित असतातच. म्हणजेच अर्थान्तरन्यास अलंकाराचा सुभाषितात अन्तर्भाव होऊ शकतो. अर्थात जिथे जिथे अर्थान्तरन्यासाचा प्रयोग केला आहे तिथे तिथे आपणांस सुभाषित दृग्गोचर होते. परंतु जिथे जिथे सुभाषित आहे तिथे तिथे अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण नक्की लागू पडेल असे नाही. सारांश असा की, अर्थान्तरन्यासाशी तुलना करिता सुभाषित हे अत्यंत व्यापक आहे.

---

[१९३] सुभा. रत्न.भा. पृ. २९, श्लोक क्र. ६

[१९४] सुभाषितं हारि विशत्यधो गलान्न दुर्जनस्यार्करिपोरिवामृतम् ।
तदेव धत्ते हृदयेन सज्जनो हरिर्महारत्नमिवाति निर्मलम् ॥ काद. पूर्वभाग, पृ.२ श्लोक क्र. ७

[१९५] पहा – प्रस्तुत प्रबंध – १.४ पृ. ६ ओळ क्र. २

आणखी एक नोंद करण्याची गोष्ट अशी की, सुभाषिते गद्य-पद्यात भरपूर प्रमाणात आढळतात. उदा. कादम्बरी ग्रंथातील शुकनासोपदेश. तसेच नाटकातील गद्यांशामध्येही सुभाषिते आढळतात. प्रस्तुत प्रसंगी सुभाषितांचे निर्देश करणे योग्य नाही. कारण ती विपुल व सर्वांना ज्ञात आहेत. तरीही वानगीदाखल काही सुभाषितरत्ने पुढीलप्रमाणे :

न हि सर्वः सर्वं जानाति ।[१९६]

अत्यादरः शङ्कनीयः ॥[१९७]

राजा कालस्य कारणम् ।[१९८]

अन्योन्यकलहितयोर्मत्तहस्तिनोरेकस्मिन्ननिर्जिते कुत उपशमः ।[१९९]

न हि कमलिनीं दृष्ट्वा ग्राहमेवक्षते मतङ्गजः ।[२००]

गद्य वाक्यात अर्थान्तरन्यास होणार नाही असे नियमाने सूचित होत नाही.

भामह-दण्डीपासून सर्वच शास्त्रकारांनी अर्थान्तरन्यास अलंकाराची उदाहरणे देताना फक्त पद्यातीलच उद्धृत केली आहेत. त्यावरून असा संकेत मिळतो की, गद्यवाक्यांमध्ये अर्थान्तरन्यास अलंकाराचा वापर करणे सुलभ नाही. पद्यात पहिल्या भागात समर्थ्य वाक्य आलेले असते आणि दुसऱ्या भागात समर्थक वाक्य आलेले असते, त्यामुळे अशी उदाहरणे शोधणे वा वापर करणे कवीला सोईचे असते.

इथे असा निर्देश करणे योग्य वाटते की, कालिदासाच्या वाङ्मयावर टीका लिहिणाऱ्या समस्त टीकाकारांपैकी फक्त राघवभट्ट यांनी अभिज्ञान शाकुंतलाच्या टीकेत एकाच ठिकाणी गद्यात अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश केला आहे. तो गद्य खंड असा,-

काश्यप-(शकुंतलां विलोक्य) वत्स्ये! त्वमिदानीमनुशनीयासि । वनौकसोऽपिसन्तो लौकिकज्ञा वयम् ।

शार्ङ्गरव - न खलु धीमतां कश्चिदविषयो नाम ।[२०१]

या ठिकाणी असे सूचित करता येईल की, कवी सामान्य जनांना काहीतरी उपदेश देण्याचा प्रयत्न करतो. काव्यप्रकाशकार मम्मट या सुप्रसिद्ध साहित्यशास्त्रज्ञाने कवीचा उपदेश विशेष कान्तासम्मित आहे असे म्हटले आहे.[२०२] कारण तो मधाळलेला असतो. कवीच्या उपदेशाला मधाळ स्वरूप येते ते अर्थान्तरन्यासाने ! म्हणून अर्थान्तरन्यास अलंकाराचा कवी उपदेशाचे प्रभावी साधन म्हणून वापरतात आणि त्यासाठी अर्थान्तरन्यास अलंकार अत्यंत योग्य आहे. कालिदासाच्या वाङ्मयाचे अध्ययन करताना असे दिसून येते

---

१९६ मुद्रा. पृ. [illegible], ओळ क्र. [illegible]
१९७ कित्ता. पृ. ४०, ओळ क्र. २
१९८ विक्रमो. पृ. ४९१ ओळ क्र. २3
१९९ माल. पृ. 3४१, ओळ क्र. ४
२०० कित्ता. पृ. 3६५, ओळ क्र. ७
२०१ अभि..शा. पृ.५९१, ओळ क्र.८ - १०
आणखी पहा : न खलु धीमतामिति कण्ववाक्यं प्रत्यर्थान्तरन्यासः ।
सा त्वमित्यस्य श्लोकेनान्वयः । अर्थद्योतः पृ २७५, ओळ क्र. ९ - १०
२०२ का.प्र. १.२ पृ. ६

की, कालिदासाने अर्थान्तरन्यास अलंकाराच्या माध्यमातूनच पुष्कळ सुभाषितांचा वापर केला आहे. आणि मानवाच्या स्वभावासंबंधी, मानवी मूल्यांविषयी, उत्तम चारित्र्यासंबंधी, इष्टानिष्टतेविषयी, तसेच उत्तम व्यवहारासंबंधी जे काही कथन केले ते सर्व अर्थान्तरन्यास अलंकाराच्या द्वाराच केले आहे. हे सांगताना अतिशयोक्ती वाटणार नाही की, समग्र अलंकारांपैकी अर्थान्तरन्यास अलंकार हे एक असे माध्यम आहे की, त्याच्या द्वारा कवी स्वमनोगते सम्यक् रूपात प्रतिपादन करतात.

# -: प्रकरण दुसरे :-

# मेघदूतातील अर्थान्तरन्यास

## प्रस्तावना -

महाकवी कालिदासाचे मेघदूत हे संस्कृत साहित्यात एक सुंदर खंडकाव्य आहे. या काव्यात स्वकर्तव्यच्युत असा प्रियेपासून वियोग पावलेला शापित यक्ष पावसाळ्याच्या आरंभी नूतन मेघदर्शनाने उत्कंठित होऊन मेघाद्वारे प्रियेकडे संदेश पाठवितो, हा या काव्याचा प्रमुख विषय आहे. या काव्यात पूर्वमेघ व उत्तरमेघ मिळून १११ श्लोक सर्वमान्य आहेत. सुशील कुमार डे सम्पादित व साहित्य अकादमीने प्रसिद्ध केलेल्या मेघदूताच्या आवृत्तीमध्ये १११ श्लोक आहेत. त्याच आवृत्तीत १९ श्लोक प्रक्षिप्त म्हणून सांगितले आहेत. या सर्वातून २४ श्लोकांत अर्थान्तरन्यास अलंकाराचा प्रयोग आढळतो. मेघदूतातील या अलंकाराचे प्रयोग पाहून असे वाटते की, महाकवी कालिदासाचा हा अलंकार अत्यंत आवडता अलंकार होता आणि या अलंकाराच्या माध्यमातून त्याने त्रिकालाबाधित सत्याची स्थापना केली आहे.

काव्यरस स्वानंदाशिवाय काव्याचे प्रयोजन मम्मटाने 'कान्तासंमिततयोपदेशयुजे ।' [1] हे सांगितले आहे. त्याची परिपुष्टी कालिदासाने आपल्या मेघदूत या काव्यात अर्थान्तन्यास अलंकाराच्या माध्यमातून केली आहे.मेघदूतामध्ये त्या त्या ठिकाणी कवीने कोणता तरी उपदेश अथवा संदेश सांगितला आहे. बहुतेक ठिकाणी हा संदेश नैसर्गिक सत्य ( Universal truth ) स्वरूपातील आहे.

कालिदासाच्या मेघदूतात अर्थान्तरन्यासाचे प्रमुख दोन प्रकार योजलेले दिसून येतात. ते असे : १) कवीने श्लोकातील पहिल्या तीन पादांतील विशेषाचे चौथ्या पादातील सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने अगर वैधर्म्याने समर्थन केले आहे. २) कवीने श्लोकातील पहिल्या दोन पादांतील विशेषाचे तिसऱ्या व चौथ्या पादांतील सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने अगर वैधर्म्याने समर्थन केले आहे.

या दोन प्रकारांतील पहिल्या प्रकाराचे प्राचुर्य अधिक ठिकाणी आढळते. श्लोक क्र.3, ५, ६, ७, ८, १०, २०, २८, 3८, ४१, ५3, ५४, ८५, ९१, ९८, ९९, १०७, १११, १५ प्र., १७ प्र. याचा अर्थ असा की २४ श्लोकांमध्ये १८ ठिकाणी या प्रकारचा अर्थान्तरन्यास कवीने योजला आहे. म्हणजेच हे प्रमाण ७५% आहे. मेघदूतात ज्या ज्या ठिकाणी सामान्य उक्तिद्वारा विशेषाने समर्थन आहे. त्यांतील काही ठिकाणी कारणद्वारा कार्याचे समर्थन या प्रकारचा अर्थान्तरन्यास होऊ शकतो. परंतु कार्यकारणभावावर आधारित असलेला अर्थान्तरन्यास सर्वमान्य नसल्याने ज्या ठिकाणी कार्यकारणभाव आहे त्या ठिकाणी त्यांचा समावेश सामान्य विशेष भावाधारित प्रकारात होत

---

[1] का.प्र. १.२ पृ.६

असल्याने त्याचे भिन्न निर्देश केले नाहीत. तरीही त्या त्या उदाहारणाच्या वेळी तो कार्यकारणभावावर आधारित आहे असे सांगितले आहे.

आता मेघदूतातील अर्थान्तरन्यास अलंकार असलेल्या श्लोकांचे विशद विवेचन श्लोकाच्या उदाहरणासह क्रमशः केले आहे. ते करीत असताना पुढील उपलब्ध झालेल्या टीकांचा प्रसंगानुरूप आधार घेतला आहे.

स्थिरदेवाची पञ्जिका, वल्लभदेवाची पञ्जिका, चारित्र्यवर्धनाचार्याची चारित्र्यवर्धिनी, दक्षिणावर्तनाथाची प्रदीप टीका, पूर्णसरस्वतीची विद्युल्लता, मल्लिनाथाची संजीवनी, शाश्वतची कविप्रिया, मल्लिनाथसुत यांची पञ्जरिका,परमेश्वराची सुमनोरमणी, सनातन गोस्वामीची तात्पर्यदीपिका, सुमतिविजयाची सुगमान्वयावृत्ती, भरतमल्लिकाची सुबोधा, कृष्णपतीची मेघदूत टीका, नारायणशास्त्री खिस्ते यांची भावप्रबोधिनी, आणि चरणतीर्थमहाराजांची कात्यायनी.

तस्य स्थित्वा कथमपि पुरः कौतुकाधानहेतो-'
रन्तर्बाष्पश्चिरमनुचरो राजराजस्य दध्यौ ।
मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः
कण्ठाश्लेषप्रणयिनि जने किं पुनर्दूरसंस्थे ॥

(मेघ.3 )

विवेचन :

' मेघदूत्म ' हे खंडकाव्य असून त्यांतील हा तिसरा श्लोक आहे. रामगिरी पर्वतावर असताना पत्नीविरही यक्ष पावसाळ्यात नूतन मेघदर्शनाने व्याकूळ होऊन आपल्या प्रियेला मेघाला दूत म्हणून योजून त्याच्यामार्फत संदेश पाठविण्याचे त्याच्या मनात येते. जेव्हा तो उद्वेगाने मेघाकडे पाहतो आणि त्याचे मन विचलित होते. या श्लोकात मेघदर्शनाने निर्माण झालेल्या यक्षाच्या मनःस्थितीचे वर्णन केले आहे. त्याचे समर्थन करताना असे सांगितले आहे की, नूतन मेघदर्शन झाल्यानंतर स्वस्थ चित्त असलेल्या व नजीकच्या काळात मीलनाची शक्यता निश्चितपणे नसलेल्या व्यक्तीच्या चित्तात विकार उत्पन्न झाला तर त्यात काय आश्चर्य ? ते संयुक्तिकच आहे.

निरीक्षण .

इथे प्रस्तुत म्हणजे ' नूतन मेघाला पाहून यक्षाच्या मनात विकार उत्पन्न होणे या गोष्टीचे समर्थन तिसऱ्या व चौथ्या ओळींने केले आहे. इथे प्रस्तुत विशेष आहे. त्याचे समर्थन सामान्य उक्तीने वैधर्म्यपूर्वक केले आहे.

मल्लिनाथ, पूर्णसरस्वती, परमेश्वर, शाश्वत, बा(क कन्बे, भरतमल्लिक आणि स्थिरदेव या टीकाकारांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे. मल्लिनाथाने या अलंकाराचे लक्षण दण्डीच्या काव्यादर्शमधून उद्धृत केले आहे :

ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किंचन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योऽन्यस्य वस्तुनः ॥ [२]

साहित्यशास्त्रकारांनी सागितलेल्या ' सामान्याद्वारा विशेषाचे वैधर्म्याने समर्थन ' या प्रकारचे हे उदाहरण आहे. रुय्यकाने सांगितलेला कारणद्वारा कार्याचे समर्थन हा प्रकारही या श्लोकात दिसून येतो.

धूमज्योतिःसलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः
सन्देशार्थाः क्व पटुकरणैः प्राणिभिः प्रापणीयाः ।
इत्यौत्सुक्यादपरिगणयन् गुह्यकस्तं ययाचे
कामार्ता हि प्रणयकृपणाश्चेतनाचेतनेषु ॥

( मेघ. ५ )

विवेचन :

पूर्वी सुचविल्याप्रमाणे यक्षाने नूतन मेघाला पाहून आपल्या प्रियेकडे त्याच्या द्वारा संदेश पाठविण्याचा निर्णय घेतला आणि त्याची प्रार्थना केली. या श्लोकातील पहिल्या तीन ओळींमध्ये त्याचा निर्देश कवीने केला आहे. यक्षाने कामाने पीडित होऊन मेघ हा अचेतन आहे आणि धूम,तेज, पाणी आणि वायू या सर्वांपासून बनलेला मेघ आणि तो अचेतन असल्यामुळे संदेश घेऊन कसा जाणार ? अशा प्रकारचा विचार न करता त्याने मेघाकडे दूत होण्याची प्रार्थना केली. या गोष्टीचे समर्थन चौथ्या ओळीने केले आहे ते असे : - कामविह्वल व्यक्ती चेतन व अचेतन यांमधील भेद जाणू शकत नाही आणि यक्षाची अवस्था तशीच असल्यामुळे मेघ हा अचेतन आहे हे विचारात न घेता त्याने मेघाला आपल्या प्रियेकडे संदेश नेण्याची प्रार्थना केली आहे.

---

[२] संजी. पृ.४, ओळ क्र. २३ - २४.
काव्याद. २.१६९ पृ. १९९ - २००
तसेच परवर्ती टीकाकारांपैकी भरतमल्लिक, स्थिरदेव व शाश्वत यांनी देखील हेच लक्षण उद्धृत केले आहे

निरीक्षण :

मल्लिनाथ, चरित्रवर्धनाचार्य, पूर्णसरस्वती, स्थिरदेव, भरतमल्लिक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश केला आहे.

या अलंकाराचा आधार कामी व्यक्तीची मनःस्थिती दाखविणे हा आहे. अशा व्यक्तीची बुद्धी चेतन व अचेतन यांच्याबाबतीत विवेकरहित होते असे या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार योजून सांगितले आहे. कालिदासाने मनुष्याच्या भावविकारांचे सूक्ष्म अवलोकन केले आणि त्यांना शब्दबध्द केले या अर्थान्तरन्यासाने !

जातं वंशे भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपरुषं कामरुपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशाद् दूरबन्धुर्गतोऽहं
याच्ञा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥

(मेघ.६ )

विवेचन :

यक्षाने मेघाला संदेशवाहक म्हणून का निवडला? तसेच त्याचा संदेश तो प्रियेला नक्की देईल असा विश्वास यक्षास का आहे? हे या श्लोकात सांगितले आहे. श्लोकातील पहिल्या तीन ओळींत आपले काम मेघाला सांगण्यापूर्वी त्याला अनुकुल करुन घेण्यासाठी यक्ष त्याच्या घराण्याची, सामर्थ्याची प्रशंसा करतो. तो म्हणतो की, त्याचा जन्म सुप्रसिद्ध अशा पुष्करावर्तकांसारख्या मेघांच्या महान कुळात झाला आहे. मन मानेल तो आकार घेऊ शकणारा इंद्राचा अधिकारी आहे. त्यामुळेच यक्ष मेघाची प्रार्थना करतो. त्याची मेघविषयक प्रार्थना योग्य आहे. या गोष्टीचे समर्थन चौथ्या ओळींत पुढीलप्रमाणे केले आहे – गुणवंताजवळ केलेली याचना विफल झाली तरी हरकत नाही पण अधमाजवळ सफल होणार असली तरी नको. इथे पहिल्या तीन ओळींत आलेल्या विशेषाचे चौथ्या ओळीत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा समर्थन केले आहे. हे समर्थन साधर्म्यावर आधारित आहे. म्हणजेच या श्लोकाचा अन्तर्भाव सामान्याद्वारा विशेषाचे साधर्म्यपूर्वक समर्थन या प्रकारात

होते. कार्यकारणभावाने होणाऱ्या अर्थान्तरन्यास मानणाऱ्या आलंकारिकांच्या मतानुसार याचा अंतर्भाव कारणद्वारा कार्याचे साधर्म्याने समर्थन या प्रकारात होते.

निरीक्षण :

स्थिरदेव, मल्लिनाथ, भरतमल्लिक आणि पूर्णसरस्वती यांनी या श्लोकात हा अलंकार दाखविला आहे. मल्लिनाथाने या श्लोकात प्रेय नामक अलंकार सांगून दण्डीने दिलेले लक्षण उद ॒ केले आहे.[3]

या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा प्रयोग करताना कालिदासाने एका अत्यंत सुंदर सुभाषिताचा प्रयोग केला आहे. तो असा की, चांगल्या माणसाकडून नकार मिळाला तरी चालेल पण अधमाकडून ती पूर्ण होत असली तरी त्याच्याकडे याचना करू नये. या श्लोकामध्ये कालिदासाने मित्रत्वाने सल्ला दिला की, आपली इच्छा योग्य मार्गाने पूर्ण करावी. अधमाच्या मदतीने इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न कधी सफल होत नाही. हा सामान्य मनुष्याला अनुभव येतोच !

त्वामारूढं पवनपदवीमुद्गृहीतालकान्ताः
प्रेक्षिष्यन्ते पथिकवनिताः प्रत्ययादाश्वसन्त्यः ।
कः संनद्धे विरहविधुरां त्वय्युपेक्षेत जायां
न स्यादन्योऽप्यहमिव जनो यः पराधीनवृत्ति : ॥

( मेघ ८ )

विवेचन :

यक्ष मेघाला उद्देशून म्हणतो, " हे मेघा तू आकाशामध्ये वर गेलास की, धैर्य प्राप्त झालेल्या व पतीपासून दुरावलेल्या स्त्रिया मोठया आतुरतेने त्यांचा पती लवकरच परत येईल या भावनेने तुझ्याकडे पाहतील ". पहिल्या दोन ओळींतील या विशेषाचे समर्थन (कः सनद्धे विरहविधुरां.... जायां ) तिसऱ्या ओळींत आलेल्या ' असा कोणता मनुष्य असेल की जो तुला पाहून आपल्या विरहार्त पत्नीची उपेक्षा करील ? या सामान्योक्तिद्वारा समर्थन केले आहे.

इथे वर निर्देशिलेल्या विशेषाचे समर्थन सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. कारणद्वारा कार्याचे समर्थन या प्रकारामध्येही याचा समावेश होऊ शकतो. इथे कार्य म्हणजे ' प्रत्ययादाश्वसन्त्यः पथिकवनिता प्रेक्षिष्यन्ते ' हे असून त्याचे समर्थन ' कः संनद्धे

[3] अर्थान्तरन्यासानुप्राणितः प्रेयोऽलंकारः । तदुक्तं दण्डिना प्रेयः प्रियतराख्यानम् । संजी. पृ.७, ओळ १२ - १३

विरहविधुरा... 'म्हणजे तुला पाहून कोण बरे विरहाने व्याकूळ झालेल्या पत्नीची उपेक्षा करील ? अर्थात तो उपेक्षा करणार नाही या कारणाने केले आहे.

निरीक्षण :

मल्लिनाथ आणि बा्क कन्बे यांनी या श्लोकात या अलंकाराचा निर्देश केला आहे. मल्लिनाथाने इथे अर्थान्तरन्यास अलंकार सूचित करताना विद्यानाथाने दिलेले अर्थान्तरन्यासाचे लक्षण उद्धृत केले आहे.[४] मल्लिनाथ बहुधा दण्डीचे लक्षण उद्धृत करतो.

तां चावश्यं दिवसगणनातत्परामेकपत्नी
मव्यापन्नामविहतगतिर्द्रक्ष्यसि भ्रातृजायाम् ।
आशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानां
सद्यःपातप्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि ॥
( मेघ. १० )

विवेचन :

विरहार्त यक्ष मेघाला उद्देशून म्हणतो की, 'तू तिथे गेल्यानंतर शापाचे शिल्लक राहिलेले दिवस मोजण्यात गुंतलेली ती तुझी पतिव्रता वहिनी शापकालानंतर त्याची भेट होईल या आशेने कशीतरी जीव धरून राहिलेली तुझ्या दृष्टीस पडेल या विशेषाचे समर्थन तिसऱ्या व चौथ्या ओळींतील 'आशेच्या धाग्याने स्त्रियांचे प्रेमपूर्ण हृदय सावरले जाते ' या सामान्यउक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

या श्लोकातील तिसऱ्या व चौथ्या ओळींत आलेल्या ' आशाबन्धः . . . रुणद्धि । ' या कारणद्वारा पहिल्या व दुसऱ्या ओळींत सांगितलेले कार्य म्हणजे कशीतरी जीवन कंठित आहे ' याचे साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून या श्लोकात कार्यकारण भावाधारे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

निरीक्षण :

---

[४] कार्यकारणसामान्यविशेषाणां परस्परम् ।
समर्थनं यत्र सोऽर्थान्तरन्यास उदाहृतः ।। संजी. पृ. ८, ओळ क्र. २८ – ३०.
प्र.रु.पृ.303 श्लोक क्र. २२२

पूर्णसरस्वती, भरतमल्लिक, मल्लिनाथ या टीकाकारांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.

या श्लोकात कालिदासाने अर्थान्तरन्यास अलंकाराचा प्रयोग करताना पतीपासून दूर असलेल्या प्रेमविवश पत्नीच्या हृदयाचे हृदयंगम चित्रण केले आहे. इथे असे सांगितले आहे की, स्त्रियांचे हृदय विशेषतः पतिवियोगकाळी कुसुमसदृश आणि कोमल असते ते ताबडतोब तुटून जाऊ शकते पण पतीचे मीलन होईल या आशारूपी धाग्याने कसेतरी तगून राहिलेले असते.

त्वामासारप्रशमितवनोपप्लवं साधु मूर्ध्ना
वक्ष्यत्यध्वश्रमपरिगतं सानुमानाम्रकूटः ।
न क्षुद्रोऽपि प्रथमसुकृतापेक्षया संश्रयाय
प्राप्ते मित्रे भवति विमुखः किं पुनर्यस्तथोच्चैः ।

(मेघ. १७ )

विवेचन :

यक्ष मेघाला सांगतो, "हे मेघा, तू जात असताना वाटेत तुला आम्रकूट पर्वत लागेल, तो तुला अत्यंत आदराने स्वमस्तकावर धारण करील, कारण तू पूर्वी वृष्टिपात करून दावाग्नीने संतप्त झालेल्या त्याला शांत केले होतेस ". या विशेषाचे समर्थन यक्षाच्या उक्तिद्वारा शेवटच्या दोन ओळींत केले आहे. ते असे – पूर्वी उपकार केलेल्या मित्राला पाहून नीच व्यक्ती देखील विमुख होत नाही, अर्थात ती आदर करते. तर मग मोठया लोकांबाबत काय सांगावे ? याचे तात्पर्य असे की निश्चितच तो आम्रकूट पर्वत तुझा आदर करील.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन शेवटच्या दोन ओळींत आलेल्या सामान्योक्तीद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

स्थिरदेव, चारित्र्यवर्धनाचार्य, पूर्णसरस्वती, सुमतिविजय यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.

अध्वक्लान्तं प्रतिमुखगतं सानुमानाम्रकूट-

स्तुङ्गोत्र त्वां जलद शिरसा वक्ष्यति श्लाघ्यमानः ।
आसारेण त्वमपि शमयेस्तस्य नैदाघमग्निं
सद्भावार्द्रः फलति नचिरेणोपकारो महत्सु ॥

( मेघ १७ )*

विवेचन :

यक्ष मेघाला सांगतो, " तू प्रवास करीत असता जेव्हा थकशील तेव्हा आम्रकूट पर्वत तुला डोक्यावर घेईल. तू देखील पावसाच्या जलधारांनी वर्षाव करून ग्रीष्मद्वारा उत्पन्न झालेला दावाग्नी शान्त कर. कारण महापुरुषांकरिता केलेला सद्भावपूर्वक उपकार शीघ्रही फल देतो ."

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या सामान्योक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकातील अर्थामध्ये ' त्वामासार . . . ' या श्लोकातील अर्थाहून कोणतेही नावीन्य आढळत नाही, म्हणून यास प्रक्षिप्त श्लोक मानला पाहिजे.

तस्यास्तिक्तैर्वनगजमदैर्वासितं वान्तवृष्टि-
र्जम्बूकुञ्जप्रतिहतरयं तोयमादाय गच्छेः ।
अन्तःसारं घन ! तुलयितुं नानिलः शक्ष्यति त्वां
रिक्तः सर्वो भवति हि लघुः पूर्णता गौरवाय ॥

( मेघ. २० )

विवेचन :

यक्षाच्या सूचनेप्रमाणे मेघाने जर हिमालय व आम्रकूट पर्वतावर वृष्टी केली तर मेघातील पाणी खाली पडल्याने मेघ हलका होईल आणि मग वारा त्यास भलतीकडेच वाहून नेईल. म्हणून यक्ष मेघाला पहिल्या तीन ओळींत असे सांगतो, 'तू वृष्टी केल्यानंतर नर्मदेचे पाणी पिऊनच पुढे जावेस. त्यामुळे तू जाताना वारा तुला पेलू शकणार नाही '. या प्रस्तुत विशेषाचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या सामान्य विधानाद्वारा साधर्म्याने केले

* द्विवेदी रेवाप्रसाद – कालिदास ग्रन्थावली, मेघ. प्रक्षिप्त श्लोक क्र. ७, पृ. ४४

आहे. ते असे की,' पूर्ण असणे हे गौरवाचे प्रतीक आहे आणि रिक्त असणे हलकेपणाचे प्रतीक आहे.'

निरीक्षण :

या श्लोकात कार्य–कारणभावावर आधारित अर्थान्तरन्यासाचा प्रकारही संभवतो. चौथ्या ओळीतील मेघ जलाने रिकामा झाला की हलका होतो आणि जलाने पूर्ण असणे हे गौरवास कारणीभूत आहे. या कारणद्वारा वारा तुला पेलू शकणार नाही. या कार्याचे समर्थन केला आहे. याठिकाणी ' अनिलः त्वां तुलयितुं न शक्ष्यति ' आणि ' पूर्णता गौरवाय ' यांचे साधर्म्य आहे.

बा्क कन्बे, सुमतिविजय, भरतमल्लिक, स्थिरदेव, पूर्णसरस्वती व चारित्र्यवर्धन यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

वीचिक्षोभ–स्तनित–विहग–श्रेणिकाञ्चीगुणायाः
संसर्पन्त्याः स्खलितसुभगं दर्शितावर्तनाभेः ।
निर्विन्ध्यायाः पथि भव रसाभ्यन्तरः सन्निपत्य
स्त्रीणामाद्यं प्रणयवचनं विभ्रमो हि प्रियेषु ।। ( मेघ.२८ )

विवेचन :

उज्जयिनीला जाताना वाटेत मेघाला निर्विध्या नावाची नदी लागते. तिचा उपभोग घे हे सांगण्याकरिता यक्ष त्याला उद्देशून म्हणतो, "तू जात असता वाटेवर, लाटांच्या कल्लोळांमुळे किलबिलाट करणाऱ्या पक्षांच्या हारी हाच जिचा कमरपट्टा आहे, अडखळत्या चालींमुळे वेधकपणे जाणारी आणि भोवऱ्यांच्या रूपाने आपली नाभी प्रकट करणारी अशी असलेल्या निर्विध्या नदीच्या सहवासात येऊन तिच्या रसाची गोडी तू चाख. "या श्लोकातील हे प्रस्तुत विशेषाचे चौथ्या ओळींतील 'स्त्रीणामाद्यं... प्रियेषु' या सामान्य विधानाद्वारे साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे. ते असे की, प्रियकरांकरिता स्त्रियांचे विलास हेच त्यांचे पहिले प्रेमवचन होय. येथे निर्विध्या नदीने नाभी दाखविणे हे साधर्म्य आहे.

निरीक्षण :

कारणद्वारा कार्याचे साधर्म्याने समर्थन या प्रकारातही या श्लोकाचा समावेश होऊ शकतो. इथे कारण म्हणजे स्त्रियांचा विभ्रम असून कार्य म्हणजे निर्विध्या नदीने नाभी दाखविणे हे आहे.

स्थिरदेव, चारित्र्यवर्धनाचार्य आणि भरतमल्लिक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.

तां कस्यांचिद् भवनवलभौ सुप्तपारावतायां
नीत्वा रात्रिं चिरविलसनात् खिन्नविद्युत्कलत्रः ।
दृष्टे सूर्ये पुनरपि भवान् वाहयेदध्वशेषं
मन्दायन्ते न खलु सुहृदामभ्युपेतार्थकृत्याः ॥

(मेघ. ३८)

**विवेचन :**

यक्षाचा संदेश घेऊन जाणाऱ्या मेघाने प्रवास करीत वाटेत उज्जयिनी नगरीमध्ये रात्र पडल्यावर काय करावे हे सांगताना यक्ष त्यास सांगतो की, 'विलास केल्यामुळे दीर्घकाळ ज्याची विद्युत स्त्री स्त्री दमून गेली आहे असा ( प्रवासाने शिणलेला तू पारवे निजलेल्या कोणत्यातरी वाड्याच्या गच्चीवर एक रात्र घालवून ( विश्रांती घेऊन ) सूर्य उगवल्यावर पुन्हा राहिलेला मार्ग चालू लाग.

**निरीक्षण :**

या श्लोकाच्या पहिल्या तीन ओळींतील 'प्रस्तुताचे – विशेषाचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या 'मन्दायन्ते न खलु... कृत्याः ।' या वाक्याने सामान्य विधानाद्वारा केले आहे. मेघ थकलेला आहे. तो पुढे कसा जाणार? याची चिन्ता वाटल्याने यक्ष त्यास तसे सांगतो. याचे समर्थन असे की, एकदा मित्राचे काम अंगावर घेतले म्हणजे त्यात मग तो अंगचुकारपणा करीत नाही. या सामान्य वाक्याद्वारा पहिल्या तीन ओळींतील विशेषाचे साधर्म्याने समर्थन केले आहे.

बा्क कन्बे, भरत मल्लिक, स्थिरदेव आणि पूर्णसरस्वती यांनी या अलंकाराचा निर्देश केला आहे.

या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा प्रयोग करताना कवीने एका नैसर्गिक सत्याचा म्हणजे मित्र आपल्या मित्राच्या अंगीकृत कार्याने दिरंगाई करीत नाही. याचा आधार घेतला आहे आणि एका प्रामाणिक मित्राच्या स्वभावाचे वर्णन केले आहे.

तस्याः किंचित् करधृतमिव प्राप्तवानीरशाखं
नीत्वा नीलं सलिलवसनं मुक्तरोधोनितम्बम् ।

प्रस्थानं ते कथमपि सखे लम्बमानस्य भावि
ज्ञातास्वादो विवृतजघनां को विहातुं समर्थः ॥
( मेघ. ४१ )

विवेचन :

गंभीरा नदीजवळ गेल्यावर मेघाने कसे वागावे हे सांगताना यक्ष म्हणतो, " हे मित्रा, त्या गंभीरा नदीचे सौंदर्य पाहून तू तिचा उपभोग घे. " पहिल्या तीन ओळींत आलेल्या या विशेषाचे समर्थन चौथ्या ओळीतील ' ज्ञातास्वादः विवृतजघनां...' या सामान्य वाक्याद्वारा वैधर्म्याचे समर्थन केले आहे. याचा अर्थ असा की, नारी सौंदर्याचा उपभोग घेणारी व्यक्ती केव्हाही प्रसंगानुरूप उपभोग योग्य काळ व संधी मिळाल्यास तो ती संधी सोडीत नाही. म्हणून तू अवश्य तिचा उपभोग घे.

निरीक्षण :

मल्लिनाथसुत, बाक् कन्बे, भरतमल्लिक, स्थिरदेव, पूर्णसरस्वती आणि चारित्र्यवर्धनाचार्य यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.

तत्र स्कन्दं नियतवसतिं पुष्पमेघीकृतात्मा
पुष्पासारैः स्नपयतु भवान् व्योमगङ्गाजलार्द्रैः ।
रक्षाहेतोर्नवशशिभृता वासवीनां चमूना -
मत्यादित्यं हुतवहमुखे संभृतं तद्धि तेजः ।
( मेघ.४३ )

विवेचन :

यक्ष मेघाला उद्देशून असे म्हणतो की, " देवगिरी पर्वतावर कायमचे वास्तव्य करून राहिलेल्या कार्तिकेयाला तू स्वतः पुष्पवृष्टी करणारा मेघ बनून आकाशगंगेच्या जलाने ओलसर झालेल्या पुष्पांच्या वृष्टीने स्नान घाल ." या विशेष वाक्याचे समर्थन अथवा "तू त्याला स्नान घाल " या कार्याचे समर्थन अनुक्रमे सामान्याद्वारा वा कारणद्वारा केले आहे. ते असे की, कार्तिकेय पूज्य म्हणजेच अर्चना-योग्य आहे. या उक्तिंद्वारा समर्थन केले आहे.

निरीक्षण :

वास्तविक या श्लोकात अलंकार दृष्टीने पाहता इथे काही अलंकाराचे जी प्रयोजक चमत्कृती ती दिसत नाही आणि समर्थन वाक्य दुसऱ्या आणि तिसऱ्या ओळींत समजते. पण साक्षात म्हणजेच शब्दशः प्रतिपादन केलेले नाही म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार सुस्पष्ट होत नाही.

केवळ मल्लिनाथानेच या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे. पहा – *स्कन्दस्य पूज्यत्वं समर्थनेनार्थेनार्थान्तरं न्यस्यति रक्षेति ।* [५]

तं चेद् वायौ सरति सरलस्कन्धसंघट्टजन्मा
बाधेतोल्काक्षपितचमरीबालभारो दवाग्निः ।
अर्हस्येनं शमयितुमलं वारिधारासहस्रै-
रापन्नार्तिप्रशमनफलाः सम्पदो ह्युत्तमानाम् ॥

( मेघ.५३ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात यक्ष मेघाला सांगतो की, ' वारा वाहू लागला असता देवदार वृक्षांच्या फांद्यांच्या घर्षणाने उत्पन्न झालल्या वह्नीमुळे वनगायीं ( चमरी) चे केस जळून जातात. त्यामुळे पीडा होते आणि नंतर त्या वणव्याची हिमालय पर्वताला झळ पोहोचू लागली तर तू चांगली वृष्टी करून त्यांचा ताप नाहीसा कर. ( तू तो वणवा विझव ) या विशेष गोष्टीचे समर्थन चौथ्या ओळीने म्हणजे आपद्ग्रस्तांची दुःखे दूर करण्यासाठीच थोरांची संपत्ती असते या सामान्यउक्तीद्वारा केले आहे. हे समर्थन साधर्म्यपूर्वक आहे.

निरीक्षण :

या श्लोकात कार्यकारणभावावर आधारित अर्थान्तरन्यास अलंकारही होतो. तो असा - पहिल्या तीन ओळींत कार्य ( तू त्यांचा ताप वृष्टीने नाहीसा करणे ) दुःखिताचे दुःख हरण करणे हाच सज्जनांचा गुण आहे. याचे द्वारा साधर्म्याने केले आहे. एका सुंदर अर्थान्तरन्यासाचे हे उदाहरण आहे.

मल्लिनाथसुत, बाक कन्बे, स्थिरदेव, पूर्णसरस्वती, सुमतिविजय आणि चारित्र्यवर्धनाचार्य यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.

हा अर्थान्तरन्यास अलंकार योजताना कवीने त्यासाठी सज्जन व्यक्तीचा गुण अथवा स्वभाव याचा आधार घेतला आहे.

---

[५] संजी. पृ. ३६, ओळ क्र. ८

ये संरम्भोत्पतनरभसाः स्वाङ्गभङ्गाय तस्मिन्
मुक्तध्वानं सपदि शरभा लङ्घयेयुर्भवन्तम् ।
तान् कुर्वीथास्तुमुलकरकावृष्टिपातावकीर्णान्
के वा न स्युः परिभवपदं निष्फलारम्भयत्नाः ॥

( मेघ. ५४)

विवेचन :

श्लोकाच्या पहिल्या तीन ओळींत मेघाला यक्ष असे सांगतो, " त्या ( हिमालय ) पर्वतावर क्रोधाने जोरजोरात उडया मारणारे शरभ पशू तुझ्यावर हल्ला करतील. त्यांच्यावर तू गारांचा सटकून मारा करून त्यांचा धुव्वा उडवून टाक." या विशेषाचे वा कार्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या 'के वा न स्युः परिभवपदं निष्फलारम्भयत्नाः।' या सामान्य विधानाने वा कारणाने वैधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे. ते असे - ज्या कामात कधीही यश मिळावयाचे नाही अशा गोष्टींसाठी प्रयत्न करणारे कोण बरे फजित होणार नाहीत ?

निरीक्षण :

स्थिरदेव, चारित्र्यवर्धनाचार्य, मल्लिनाथसूत, बाक कन्बे, भरतमल्लिक आणि पूर्णसरस्वती यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

तत्र व्यक्तं दृषदि चरणन्यासमर्धेन्दुमौलेः
शश्वत् सिद्धैरुपचित - बलिं भक्तिनम्रः परीयाः ।
यस्मिन् दृष्टे करणविगमादूर्ध्वमुद्धूतपापाः
संकल्पन्ते स्थिरगणपदप्राप्तये श्रद्दधानाः ॥

( मेघ. ५५ )

विवेचन :

श्लोकातील पहिल्या दोन ओळींमध्ये यक्ष मेघाला उद्देशून असे म्हणतो की, ' हिमालयाच्या एका शिळेवर चंद्रमौळी शंकराच्या पावलांच्या उमटलेल्या ठशांना तू भक्तीने प्रणत होऊन प्रदक्षिणा कर', या विशेषाचे श्लोकातील तिसऱ्या व चौथ्या ओळींत आलेल्या उक्तीने, म्हणजेच योगी लोक सदैव त्याची पूजा करतात. तसेच त्याचे दर्शन झाले असता श्रध्दावान लोक सर्व पापांपासून मुक्त होतात. या सामान्यउक्तिद्वारा साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे. इथे कार्यकारणभावाने होणारा अर्थान्तरन्यास पुढीलप्रमाणे दिसून येतो.

पहिल्या दोन ओळींत सांगितलेल्या कार्याचे म्हणजे तू शंकराच्या पावलांच्या ठशांना प्रदक्षिणा कर. याच कारणाने म्हणजे योगी लोक सदैव त्याची पूजा करतात आणि त्यांच्या दर्शनाने श्रध्दावान लोक पापमुक्त होतात. याचे साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

निरीक्षण :

या श्लोकात कोणत्याही टीकाकारांनी अर्थान्तरन्यास अलंकार सांगितलेला नाही. मात्र येथे अर्थान्तरन्यास कार्यकारणभावाच्या आधारे स्पष्ट असल्याने तो मानणे जरुरीचे आहे.

एभिः साधो हृदयनिहितैर्लक्षणैर्लक्षयेथा
द्वारोपान्ते लिखितवपुषौ शङ्खपद्मौ च दृष्ट्वा।
क्षामच्छायं भवनमधुना मद्वियोगेन नूनं
सूर्यापाये न खलु कमलं पुष्यति स्वामभिख्याम् ॥

( मेघ. ७८ )

विवेचन :

अलका नगरीत गेल्यावर आपले घर ओळखण्यासाठी खूण सांगताना यक्ष मेघाला उद्देशून म्हणतो की, "सध्या माझ्या वियोगामुळे घराची कळा खरोखर अगदीच उतरून गेली आहे, असे तुला दिसेल. "या विशेषाचे चौथ्या ओळीतील सामान्य विधानाने सूर्य अस्ताला गेल्यावर कमळाची मूळची शोभा राहत नाही. या विधानाने, साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

निरीक्षण :

स्थिरदेव, बाक कन्बे, भरत मल्लिक आणि सुमतिविजय या टीकाकारांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

शेषान् मासान् विरहदिवसे स्थापितस्यावधेर्वा
विन्यस्यन्ती भुवि गणनया देहलीदत्तपुष्पैः ।
मत्सङ्गमं वा हृदयनिहितारम्भमास्वादयन्ती
प्रायेणैते रमणविरहेष्वङ्गनानां विनोदाः॥

(मेघ. ८५ )

विवेचन :

पत्नीविरही यक्ष मेघाला त्याचा निरोप घेऊन गेल्यावर ती कशी दिसेल याचे चित्र त्याच्यासमोर उभे करीत आहे. तो उरलेले महिने उंबरठयावर ठेवलेली फुले जमिनीवर मोजून ठेवीत असलेली ती तुझ्या दृष्टीस पडेल. किंवा माझ्या सहवासाच्या उपक्रमाचा मनातल्या मनात कल्पनेने आस्वाद घेत असलेली ती तुला दिसेल. भहुतकरून प्रियकरांच्या वियोगामध्ये स्त्रियांचे हेच विरंगुळे असतात.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन ओळींत दोन विशेषांचा उल्लेख असून त्याचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

निरीक्षण :

प्रियकरांपासून वियोग घडलेल्या स्त्रिया कशाप्रकारे आपला वियोगातील काळ कंठत असतात याचे सुरेख चित्र यात आहे. या श्लोकात उंबरठयावर ठेवलेली फुले जमिनीवर मोजून ठेवीत वियोगाचे महिने मोजणे आणि आपल्या प्रियकाराशी होणाऱ्या मीलनांची चित्रे आपल्या संकल्पानेच निर्माण करीत, अनुभवीत बसणे या दोन विशेषांचा निर्देश आहे. त्यांचे समर्थन 'प्रायेणैते रमणविरहेष्वङ्गनानां विनोदाः ।' या सामान्य उक्तिद्वारा केले आहे.

स्थिरदेव, मल्लिनाथ, सुमतिविजय आणि भरतमल्लिक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.

सा संन्यस्ताभरणमबला पेशलं धारयन्ती
शय्योत्सङ्गेनिहितमसकृद दुःखदुःखेनं गात्रम् ।
त्वामप्यस्रं नवजलमयं मोचयिष्यत्यवश्यं
प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ॥

( मेघ. ९१ )

विवेचन :

विरहाने व्याकुळ झालेला यक्ष आपल्या पत्नीकडे आपला संदेश घेऊन मेघाला पाठवितो. त्या मेघाने आपल्या पत्नीस कसे ओळखावे हे सांगताना तो आपल्या पत्नीची अवस्था कशी असेल याचे वर्णन करताना तो म्हणतो, " हे मेघा, अलंकार काढून टाकलेले, अतिशय दुःखामुळे वारंवार शय्येवर टाकलेले नाजूक शरीर धारण करणारी, अशक्त झालेली, ती माझी प्रिया तुला देखील हटकून नवजलरुपी अश्रू ढाळायला लावील. कारण

साधारणपणे अंतःकरणात दयेचा ओलावा असलेले सर्व दयाळू असतात. या श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेष आले असून त्याचे समर्थन , "प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ।" या चौथ्या ओळीतील सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

निरीक्षण :

यक्षाची पत्नी प्रोषितभर्तृका आहे, त्यामुळे तिने देहभूषा वर्ज्य केली आहे. या गोष्टीचे वर्णन कवी असे करतो की, ती इतकी कृश झाली आहे की तिला दागिन्यांचे ओझे सहन होत नव्हते. तिची ती करुण अवस्था पाहून मेघाच्या ह्रदयाला पाझर अवश्यमेव फुटेलच !

स्थिरदेव, मल्लिनाथ, सुमतिविजय आणि भरतमल्लिक या टीकाकारांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.

इत्याख्याते पवनतनयं मैथिलीवोन्मुखी सा
त्वामुत्कण्ठोच्छ्वसितहृदया वीक्ष्य संभाव्य चैवम् ।
श्रोष्यत्यस्मात् परमवहिता सौम्य ! सीमन्तिनीनां
कान्तोदन्त सुहृदुपनतः संगमात् किञ्चिदूनः ॥
(मेघ. ९८)

विवेचन :

पत्नीविरही यक्ष मेघाला मित्र म्हणून संबोधितो. ते तसे संबोधण्याचे कारण यक्ष सांगतो की, मी सांगितलेला निरोप कथन करताना ती तुझ्याशी कशी वागेल याच्यासाठी रामायणातील दृष्टांत देतो. तो म्हणतो, 'मारुतीकडे सीतेने ज्याप्रमाणे पाहिले त्याप्रमाणे ती माझी स्त्री मान वर करून, मोठया उत्सुकतेमुळे फुललेल्या अन्तःकरणाने तुझ्याकडे पाहून व सत्कार करून, तू सांगितलेले सर्व बोलणे नीटपणे ऐकून घेईल कारण मित्राने आणलेला पतीचा निरोप स्त्रियांना जवळ जवळ भेटीसारखाच असतो.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचे वर्णन असून त्याचे समर्थन चौथ्या ओळींतील 'कान्तोदन्तः सुहृदुपनतः संगमात् किञ्चिदूनः ।' या सामान्य उक्तीने साधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

निरीक्षण :

कवीने इथे रामायणातील दृष्टांत दिला आहे. मारुती सीतेला शोधून रामाचा निरोप सांगण्यासाठी तो तिच्या समोरच्या झाडावर बसला; पण आपणांस फसविण्यास रावणाने ही माया केली आहे असे समजून सीता वर पाहीना. शेवटी त्याने 'रामदूत' अशी खात्री पटवून दिली असता तिने त्याचा सत्कार केला व निरोप ऐकला. इथे मेघाची तुलना रामदूत मारुतीशी करुन आपल्या पत्नीची तुलना सीतेशी करुन आपली स्त्री सीतेइतकीच पतिव्रता असल्याचे सुचविले आहे.

स्थिरदेव, भरतमल्लिक आणि बाक्‌ कन्बे यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

तामायुष्मन्‌ मम च वचनादात्मनश्चोपकर्तुं
ब्रूया एवं तव सहचरो रामगिर्याश्रमस्थः ।
अव्यापन्नः कुशलमबले ! पृच्छति त्वां वियुक्तः!
पूर्वाभाष्यं सुलभविपदां प्राणिनामेतदेव ॥

( मेघ. ९९)

**विवेचन :**

यक्ष मेघाने त्याच्या पत्नीस कोणता निरोप सांगावयाचा हे सांगताना तो म्हणतो, 'हे आयुष्मन्‌ ! माझ्या सांगण्यावरून आणि स्वतःला परोपकाराने कृतार्थ करण्यासाठी तिला असे सांग की, 'हे अनाथ स्त्रिये ! रामगिरीवरील आश्रमात राहत असलेला, तुझा वियोग झालेला, तथापि मृत न झालेला, तुझा पती तुझे कुशल विचारीत आहे. कारण अकस्मात विपत्तीत सापडलेल्या लोकांना हेच काय ते प्रथम विचारण्यासारखे असते.'

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

**निरीक्षण :**

आपण कोणालाही केव्हाही भेटले असता पहिला प्रश्न ' कसे काय ? ठीक आहे ना ? 'असाच विचारतो. यक्षाने हीच गोष्ट करण्यास मेघाला सांगितले आहे.

स्थिरदेव, सुमतिविजय, पूर्णसरस्वती आणि बाक्‌ कन्बे यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

नन्वात्मानं बहु विगणयन्नात्मनैवावलम्बे
तत् कल्याणि ! त्वमपि नितरां मा गमः कातरत्वम् ।
कस्यात्यन्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा
नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥

( मेघ. १०७ )

विवेचन :

या श्लोकात यक्ष मेघामार्फत आपल्या प्रियेला निरोप देताना म्हणतो की, " हे लाडके ! पुष्कळ मनोरथ करीत मी स्वतःच स्वतःला सावरून धरतो. तेव्हा तू सुद्धा अगदीच धीर सोडू नकोस". येथे पहिल्या दोन ओळींतील या विशेषाचे तिसऱ्या व चौथ्या ओळींतील सामान्य विधानाने साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे. ते असे की, नुसतेच सुख कुणाला मिळाले आहे, अगर निव्वळ दुःखच कुणाला मिळाले आहे का? माणसाची अवस्था ही चाकाच्या आरांच्या क्रमाप्रमाणे एकदा खाली जातात आणि मग वर येतात.

निरीक्षण :

या श्लोकातील अर्थान्तरन्यास एका त्रिकालाबाधित सत्यावर आधारलेला आहे. टीकाकारांपैकी स्थिरदेव, पूर्णसरस्वती, सुमतिविजय, आणि मल्लिनाथसुत यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.

एतस्मान्मां कुशलिनमभिज्ञानदानाद् विदित्वा
मा कौलीनादसितनयने ! मय्यविश्वासिनी भूः ।
स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगा-
दिष्टे वस्तुन्युपचितरसाः प्रेमराशीभवन्ति ॥

( मेघ. ११० )

विवेचन :

निरोप घेऊन गेलेला मेघ मायावी आहे अशी यक्ष पत्नीला शंका येऊ नये म्हणून यक्षाने एक खुणेची अगदी गुप्त गोष्ट मेघाला सांगितली आणि तो पुढे आपल्या प्रियेस दिलेल्या संदेशात मेघाजवळ असे म्हणतो की, " खुणेच्या चिह्नावरून मी सुखरूप आहे असे तुला समजून येईल. वियोगामध्ये स्नेह आटून जातो या लोकापवादावरून माझ्याबद्दल

भलतीच शंका घेऊ नकोस. " पहिल्या तीन ओळींत आलेल्या या विशेषाचे समर्थन शेवटच्या ओळीत आलेल्या सामान्य वचनाने साधर्म्याने केले आहे. ते असे – इच्छित वस्तूच्या बाबतीत उपभोग न घेतल्यामुळे ते स्नेहबंध उत्कट होऊन त्यांची परिणती प्रेमराशी बनण्यात होते असे प्रसिद्ध आहे.

**निरीक्षण :**

पूर्णसरस्वती या एकाच टीकाकाराने प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.

कच्चित् सौम्य ! व्यवसितमिदं बन्धुकृत्यं त्वया मे
प्रत्यादेशान्न खलु भवतो धीरतां कल्पयामि ।
निःशब्दोऽपि प्रदिशसि जलं याचितश्चातकेभ्यः
प्रत्युक्तं हि प्रणयिषु सतामीप्सितार्थक्रियैव ।।

( मेघ.१११ )

**विवेचन :**

मेघ हा अचेतन आहे पण त्याचे भान यक्षाला नव्हते. त्यामुळे यक्षाने त्याच्यावर सोपविलेल्या जबाबदारीबाबत प्रत्युत्तर मिळाले नाही. तेव्हा मेघाने त्याच्या प्रार्थनेचा अंगीकार केला आहे असे समजून त्यास म्हणतो, "हे बंधू, तू माझे बन्धुकार्य करावयाचे ठरविले आहेस ना ? खरोखरच तुझे मौन माझ्या विनंतीच्या नकारामुळे आहे असे मी समजत नाही. कारण चातकाने याचना केली असता, एकही शब्द न उच्चारता तू त्यास जलदान करतोस." श्लोकातील पहिल्या तीन ओळींतील विशेषाचे समर्थन चौथ्या ओळीतील सामान्य उक्तीने केले आहे. ते असे - 'हवी असलेली गोष्ट पूर्ण करणे हेच मुळी सज्जनांचे याचकांना दिलेले खरे उत्तर होय.

**निरीक्षण :**

या श्लोकात कवीने सज्जनाच्या आचाराचा आधार घेऊन अर्थान्तरन्यास अलंकाराचा प्रयोग केला आहे. ' नीचो वदति न कुरुते न वदति सुजनः करोत्येव । ' हेच खरे. या ठिकाणी सुंदर सुभाषित आहे.

मल्लिनाथसुत, बाक कन्बे, भरतमल्लिक, स्थिरदेव पूर्णसरस्वती यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.

तं संदेशं जलधरवरो दिव्यवाचाचचक्षे
प्राणांस्तस्या जनहितरतो रक्षितुं यक्षवध्वाः ।
प्राप्योदन्तं प्रमुदितमनाः सापि तस्थौ स्वभर्तुः
केषां न स्यादभिमलफला प्रार्थना ह्युत्तमेषु ॥

( मेघ. १४ प्र ) •

## विवेचन :

तो मेघ यक्षाचा संदेश घेऊन यक्षपत्नीकडे गेला आणि तिला त्याने तो संदेश दिव्यवाणीने सांगितला. ती प्रसन्न झाली. या प्रसंगी कवी म्हणतो की, अशी कोण व्यक्ती आहे की ज्याने उत्तम उत्तम व्यक्तीकडे केलेली प्रार्थना सफल झाली.

## निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन पादांत विशेष असून चौथ्या पादांतील सामान्योक्तिद्वारा वैधर्म्याने त्याचे समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

---

• पहा डॉ. एस्. के. संपादित - मेघ. प्रक्षिप्त श्लोक क्र. १५, पृ. ७७

## -: प्रकरण तिसरे : -

# कुमारसंभवातील अर्थान्तरन्यास

महाकवी कालिदासाने लिहिलेल्या महाकाव्यांत कुमारसंभव हे पहिले महाकाव्य असून त्यामध्ये शिवपार्वतीचा विवाह, कुमार-जन्म आणि तारकासुर पराभव हे विषय आले आहेत. यामध्ये एकूण १७ सर्ग असून १०९६ इतकी श्लोकसंख्या आहे. प्रस्तुत महाकाव्य एक सुंदर महाकाव्य असून त्यातील चौथ्या सर्गात शिवकोपामुळे मदनदाह होतो. यानंतर त्याची पत्नी रती हिने विलाप केला आहे. रतिविलाप हा एक अत्यंत हृदयस्पर्शी विषय आहे. पाचव्या सर्गातील शंकरांनी ब्रह्मचाऱ्याच्या वेषात येऊन पार्वतीसमोर शिवनिंदा करणे व तिचा दृढसंकल्प पाहून प्रसन्न होणे हा प्रसंगही अत्यंत रोचक व हृदयग्राही आहे.

इथे एक गोष्ट नमूद करणे आवश्यक आहे की, कालिदासाचे कुमारसंभव ८ सर्गाचे की १७ सर्गाचे या विषयीची चर्चा करणे प्रस्तुत प्रबंधात अभिप्रेत नाही आणि याविषयी शंका असल्याने संपूर्ण १७ सर्गात जिथे जिथे अर्थान्तरन्यासाचा वापर आढळतो त्याचे विवेचन केले आहे. हे करताना पुढील टीकाचा यथोचित वापर केला आहे.

मल्लिनाथाची संजीवनी टीका ( सर्ग १-८ ), नारायण पण्डितांची विवरण टीका (सर्ग १-८ ), अरुणगिरी नाथांची प्रकाशिका टीका (सर्ग १-८), वल्लभदेवाची पञ्जिका टीका ( सर्ग १-८ ), चारित्र्यवर्धनाचार्यांची चारित्र्यवर्धिनी टीका (सर्ग१-७ ), सीताराम कवींची संस्कृत टीका ( सर्ग ८ -२७), आणि कनकलाल ठक्कुर यांची शिशुहितैषिनी टीका ( सर्ग ९-१७ ).

या सर्व सर्गातील अर्थान्तरन्यासांच्या अध्ययनातून असे दिसून येते की कालिदासाने या महाकाव्यात सामान्याद्वारा विशेषाचे समर्थन या प्रकाराची प्रामुख्याने योजना केली आहे. त्यांमध्ये साधर्म्यपर समर्थनाची ४० उदाहरणे व वैधर्म्यपर समर्थनाची २४ उदाहरणे आढळतात. या काव्यात एकूण ६९ श्लोकांत अर्थान्तरन्यासाचा प्रयोग आढळतो. या सर्व श्लोकांचा क्रमशः विचार आता करण्यात येत आहे.

अनन्तरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ।
एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥
(कुमार.१.3)

विवेचन :

प्रस्तुत श्लोक कविकुलगुरु कालिदासाच्या रघुवंशातील हिमालयाचे गुणवर्णन करताना आला आहे. हिमालय हा अनेक रत्नांचा उत्पादक आहे. त्याचे सौंदर्य नष्ट करण्यास कोणी समर्थ ठरले नाही. लोक त्या गोष्टीकडे (हिमाकडे) दुर्लक्ष करतात. कारण चंद्राच्या किरणांमध्ये त्याचा कलंक लपून जातो. त्याप्रमाणे अनेक गुणांमध्ये एक दोषसुद्धा लपून जातो.

या श्लोकात पहिल्या ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

निरीक्षण :

कालिदासाने प्रस्तुत श्लोकात गुणांचे माहात्म्य सांगितलेले आहे. गुणांच्या गौरवामुळे व्यक्तीमधील एखादा दोष देखील निष्प्रभ ठरतो. शिवाय गुणांचे कौतुक जगात सर्वत्र होते. व्यक्तीच्या ठिकाणी असलेल्या दोषाचा प्रभाव त्याच्या विकासात अडसर ठरत नाही. गुणी व्यक्तीच्या दोषांकडे दुर्लक्ष्य केले जाते.

या श्लोकावर टीका लिहिताना मल्लिनाथ असे लिहितो की,

'अत्रोपमानुप्राणितोऽर्थान्तरन्यासालंकारः ।
तल्लक्षणं तु 'ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किंचन ।
तत्साधनसमर्थस्य न्यासो योन्यस्य वस्तुनः ॥ '

इति दण्डी ।[१]

याच श्लोकावर नारायण पण्डित असे लिहितात की,

अत्र एको हि दोष इत्यत्र विशेषस्य सामान्येन समर्थनादर्थान्तरन्यासः ।[२]

असे म्हणून त्यांनी विद्याभूषणाने दिलेले अर्थान्तरन्यासाचे लक्षण उद्धृत केले आहे. ते असे,

सामान्यं वा विशेषो वा तदन्येन समर्थ्यते ।

यत्र सोऽर्थान्तरन्यासः साधर्म्येणेतरेण वा ॥ [3]

अरुणगिरीनाथाने ही या श्लोकात अर्थान्तरन्यास असल्याचा निर्देश केला आहे. [४]

दिवाकराद् रक्षति यो गुहासु लीनं दिवा भीतमिवान्धकारम् ।

क्षुद्रेऽपि नूनं शरणं प्रपन्ने ममत्वमुच्चैः शिरसां सतीव ॥

( कुमार. १.१२ )

## विवेचन :

हिमालयाचे गुणवर्णन करताना प्रस्तुत श्लोक आला आहे. हिमालय स्वतःच्या मोठेपणामुळे दिवाभीत ( घुबड ) पक्ष्याप्रमाणे गुहेमध्ये लपलेल्या अंधकाराचे रक्षण करतो. कारण मोठया लोकांना शरण आलेल्या नीच लोकांबाबत ही सज्जनोचित ममता उत्पन्न होते. याचे तात्पर्य असे की, हिमालयात अनेक गुहा अशा आहेत की जिथे सूर्यकिरणे केव्हाही पोहोचू शकत नाहीत. यावर कवीने कल्पना केली आहे की, हिमालय मोठा सज्जन आहे . त्यामुळेच तो अंधकाराला आश्रय देतो. शरण आलेल्या नीचांना देखील तो सज्जनांप्रमाणे त्याच्या ठिकाणी ममत्व भाव राखतो.

## निरीक्षण :

हिमालयाने गुहेतील अंधाराला आश्रय देणे हे सांगण्यासाठी कालिदासाने सज्जनाच्या वर्तनाचा दाखला दिला आहे. सज्जन ज्याप्रमाणे चांगले वाईट न पाहता सर्वांशी समानतेने वागतो. अधम व्यक्तीच्या बाबत देखील त्याच्या मनात आदर असतो. हे सर्व लक्षात घेऊन हिमालयाला सज्जनाची उपमा दिली आहे. इथे आपणांस अचेतनाला चेतन करण्याचे सामर्थ्य आणि चेतनाचे उदात्तीकरण करण्याची वृत्ती दिसून येते.

---

[१] संजी. पृ. ४, ओळ क्र. २० - २२

[२] विव. पृ. ११, ओळ क्र. १० - ११

3 कित्ता. पृ. ११, ओळ क्र. १२ - 13, सा. कौ.१०-२४ पृ.१५७

[४] प्रका. पृ. ९, ओळ क्र. १६

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

मल्लिनाथ, अरुणगिरीनाथ आणि नारायण पण्डित या टीकाकारांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास असल्याचा निर्देश केला आहे.

महीभृतः पुत्रवतोऽपि दृष्टिस्तस्मिन्नपत्ये न जगाम तृप्तिम् ।
अनन्तपुष्पस्य मधोर्हि चूते द्विरेफमाला सविशेषसङ्गा॥

(कुमार.१.२७)

विवेचन :

वसंतऋतूमध्ये अनेक प्रकारच्या फुलांचे सौंदर्य असतानाही ज्याप्रमाणे भ्रमरपंक्ती आम्रमंजरीमध्ये विशेष आवड ठेवतात त्याप्रमाणे अनेक अपत्ये असूनही हिमालयाची दृष्टी नेहमी पार्वतीवरच होती.

निरीक्षण :

सर्वच अपत्ये मातापित्यांची आवडती असतात. तरीसुद्धा निर्व्याजपणे त्यांचे लक्ष एकाद्या अपत्याच्या ठिकाणी विशेष दिसून येते. या मानवी स्वभावाचा आधार घेऊन कवीने हिमालयाच्या ठिकाणी चेतन धर्म आरोपित केला आहे. मनुष्याचा अपत्यविषयक हा सामान्य धर्म हिमालयाच्या ठिकाणी विशेष रूपात सांगून त्याद्वारे त्याचे उदात्तीकरण केले आहे. या ठिकाणी हिमालय हा अचेतन आहे हे लक्षात न घेता ती एक चेतन व्यक्ती आहे असे समजून त्याचे वर्णन या अर्थान्तरन्यासाच्या द्वारे केले आहे.

या श्लोकात हिमालयाचे त्याची कन्या पार्वती हिच्यावरील प्रेम सूचित केले आहे. अनेक अपत्यांमध्ये ती त्याची अत्यंत लाडकी होती.

या श्लोकातील पहिल्या ओळींत विशेषाचा निर्देश केला असून दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा त्याचे वैधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार श्लोकात केवळ टिप्पणीकाराने या श्लोकत अर्थान्तरन्यासत दर्शविला आहे. [५]

गुरुः प्रगल्भेऽपि वयस्यतोऽस्यास्तस्थौ निवृत्तान्यवराभिलाषः ।
ऋते कृशानोर्न मन्त्रपूतमर्हन्ति तेजांस्यपराणि हव्यम् ॥

( कुमार. १.५१ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात पार्वती युवती होऊनही हिमालयाने तिच्यासाठी वरसंशोधन का केले नाही हे सांगितले आहे. एकदा आपल्या पित्याजवळ बसलेल्या पार्वतीला पाहून नारद मुनींनी ' ही शंकराची एकमेव पत्नी होईल ' असे भविष्य कथन केले. त्यावर विश्वास ठेवून हिमालयाने पार्वती युवती होऊनही तिच्यासाठी दुसऱ्या वराचा शोध घेतला नाही; कारण, ज्याप्रमाणे मन्त्रपूर्वक दिलेल्या आहुतीचे ग्रहण अग्नीशिवाय कोणतेही तेज ग्रहण करु शकत नाही, त्याप्राणे पार्वतीचे पाणिग्रहण शंकराशिवाय दुसरा करु शकणार नाही.

निरीक्षण :

हिमालयाच्या व्यक्तिमत्त्वाचा एक विशेष पैलू इथे दिसून येतो. हिमालय हा पार्वतीसारख्या विशेष लाडक्या कन्येचा पिता आहे. आपली कन्या उपवर झाली तरी त्याने वरसंशोधनाचा काहीच प्रयत्न केला नाही. कारण ब्रह्मर्षी नारदांनी ' पार्वती शंकराची अर्धांगिनी होईल ' असे भविष्य सांगितले होते. त्यामुळे तो निश्चिंत होता. हे स्पष्ट करण्यासाठी कालिदासाने यज्ञविषयक अनुभव सांगितला आहे. तो म्हणतो की, मन्त्रपूर्वक दिलेली आहुती अग्नीशिवाय कोणीही स्वीकारीत नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन हिमालयाचा पिता म्हणून स्वभाव विशेष वर्णिला आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीत ' पार्वती युवती होऊनही हिमालयाने दुसऱ्या वराचा शोध घेतला नाही '. हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या ' मंत्रपूर्वक दिलेल्या आहुतीचे ग्रहण अग्नीशिवाय दुसरे तेज करु शकत नाही'.या सामान्यउक्तिद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे.[६]

अयाचितारं नहि देवदेवमद्रिः सुतां ग्राहयितुं शशाक ।

---

[५] वैधर्म्येणार्थान्तरन्यासालंकारः । टिप्पणी पृ.१८ ओळ क्र २3

[६] अत्र वैधर्म्येणार्थान्तरन्यासालंकारः । टिप्पणी पृ. 3२, ओळ क्र. १२

अभ्यर्थनाभङ्गभयेन साधुर्माध्यस्थ्यमिष्टेऽप्यवलम्बतेऽर्थे ॥
( कुमार.१.५२)

विवेचन :

पार्वतीचा विवाह शंकराबरोबर होईल असे माहीत असूनही स्वतः होऊन हिमालयाने पार्वती शंकराला का दिली नाही ? याचे कारण प्रस्तुत श्लोकात दिले आहे.

स्वतः विवाहाच्या इच्छेने कन्येसाठी याचना न करणाऱ्या शंकरांना आपल्या मुलीचे पाणिग्रहण करण्यासाठी निवेदन करण्यामध्ये हिमालयाने कोणताही उत्साह दाखविला नाही. ( आपल्या मुलीच्या लग्नाचा प्रस्ताव शिवापुढे ठेवला नाही. ) कारण आपण केलेली प्रार्थना निष्फळ होईल या भीतीने सज्जन लोक आपले मनोरथ प्रकट करीत नाहीत.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात हिमालयाने पिता म्हणून आपल्या कन्येचा स्वीकार करा असा भगवान शंकराकडे प्रस्ताव दिला नाही, याचा खुलासा कालिदासाने सज्जनांचा स्वभाव-विशेष लक्षात घेऊन केला आहे. हा त्याचा मानीपणा आहे. त्यामुळे तो आपले मनोरथ पूर्ण करण्यासाठी याचना करीत नाही. हा विशेष हिमालयाच्या ठिकाणी सांगून त्याच्यावर मानवीधर्माचे पैलू आरोपित केले आहेत.

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे. आणि त्याचे समर्थन एका सुंदर सुभाषिताने सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे. ते असे, ' प्रार्थनाभंग- भयाने सज्जन ह्याबाबत माध्यस्थ्य वृत्तीचा अवलंब करतात '. नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे. [७]

प्रत्यर्थि-भूतामपि तां समाधेः शुश्रूषमाणां गिरिशोऽनुमेने ।
विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः ॥
( कुमार. १.५९ )

विवरण :

भगवान शंकराला पती म्हणून मिळवू इच्छिणाऱ्या पार्वतीने पित्याच्या अनुज्ञेने भगवान शंकारांच्या सेवेस प्रारंभ केला. पार्वती तरुण व सुंदर असल्याने ती सेवा

---

[७] अत्रार्थान्तरन्यासमाह – मानी इष्टे अर्थे अभ्यर्थनाभङ्गभयेन माध्यस्थ्यमवलम्बत । विव. पृ.९३, ओळ क्र. ११ – १२

एकाग्रचित्तास बाधा आणणारी आहे हे माहीत असूनही सेवा-शुश्रूषा परायण पार्वतीला शंकारांनी अनुमती दिली. विकाराचे कारण जवळ असतानाही ज्यांचे चित्त विकार पावत नाही तेच खरे महापुरूष होत.

निरीक्षण :

कालिदासाने या श्लोकात महान व्यक्तीचा मोठेपणा वर्णन केला आहे. त्यांचा एक विशेष म्हणजे विकाराचे कारण जवळ असतानाही त्यांच्या ठिकाणी विकार उत्पन्न होत नाहीत. या विशेषाच्या द्वारा भगवान शंकराचे एक योगी म्हणून त्याचे माहात्म्य प्रतिपादन केले आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या 'विकाराचे कारण असतानाही चित्तात विकार उत्पन्न न होणे हा महापुरुषांचा स्वभाव आहे ' या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आलंकार आहे. [८]

इत्थमाराध्यमानोऽपि क्लिश्नाति भुवनत्रयम् ।
शाम्येत् प्रत्यपकारेण नोपकारेण दुर्जनः ॥
( कुमार. २.४० )

विवेचन :

ब्रह्मदेवाकडून मिळालेल्या वरामुळे उन्मत्त झालेल्या तारकासुराने तीन लोकांना त्रास द्यावयास सुरुवात केली होती.

इंद्रादी देवतांनी त्याची सेवा कितीही केली तरी त्याचे समाधान होत नसे. त्याच्या जाचाला कंटाळून सर्व देवता मिळून ब्रह्मदेवाकडे गेल्या आणि त्याच्याविषयी आपले गाऱ्हाणे सांगितले की, ' अनेक प्रकारे देवतांकडून सेवा करूनही तो त्रैलोक्याला पीडा देत आहे. कारण हे खरे आहे की दुष्ट अपकारानेच शांत होतो, उपकार करण्याने नाही.'

निरीक्षण :

सज्जनांचा आचार वर्णन करीत असताना व त्यांचे आदर्श समोर ठेवीत असताना कवीने त्याची तुलना विरोधतत्त्वाने दुष्टाच्या आचरणांशी करून सज्जनांचे व्यक्तिमत्त्व अधिक आकर्षक करण्याचा प्रयत्न केला आहे. जगामध्ये सज्जनांप्रमाणे दुर्जनही असतात

[८] अत्रार्थान्तरन्यासाऽलङ्कारः । टिप्पणी - पृ. ३६, ओळ क्र. ११

आणि त्या दुर्जनांचा स्वभाव विशेष कालिदासाने नेमका हेरला आहे. दुर्जनावर कितीही उपकार केले तरी त्याने उपकारकर्त्यास व दुष्टासही समाधान मिळत नाही.

पयःपानं भुजङ्गानां केवलं विषवर्धनम् ।

हा न्यायच खरा ठरतो. तारकासुराच्या स्वभावातही हा विशेष वर्णन करून त्याचे दुष्टत्त्व कवीने अधिक गडद केले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[९]

या श्लोकाचे विवेचन करताना नारायण पण्डिताने या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सूचित केला आहे.[१०]

प्रस्तुत श्लोकात कवीने दुष्ट माणसाचे वर्णन केले असून यात एका सुभाषिताचा वापर केला आहे. अपकारनेच शत्रू काबूत येतो. या सारख्या अर्थाचे वर्णन शिशुपालवध या महाकाव्यातही आढळते. ते असे,

चतुर्थोपायसाध्ये तु रिपौ सान्त्वमपक्रिया ।
स्वेद्यमामज्वरं प्राज्ञः कोऽम्भसा परिषिञ्चति ॥ [११]

इतः स दैत्यः प्राप्तश्रीर्नेत एवार्हति क्षयम् ।
विषवृक्षोऽपि संवर्ध्य स्वयं छेत्तुमसांप्रतम् ॥

( कुमार २.५५ )

**विवेचन :**

ब्रह्मदेवाच्या वरामुळे तारकासुर त्रैलोक्याला पीडा देत होता. देवतांनाही त्याने बरीच पीडा दिली. देवतांनी त्यांना होणारा त्रास व त्याच्या बंदोबस्तासाठी योजलेले उपाय कसे निष्प्रभ होतात हे सांगून तारकासुराच्या त्रासापासून सोडविण्यासाठी त्यांनी ब्रह्मदेवाकडे विनवणी केली असता ब्रह्मदेव त्यांना म्हणाले , ' त्याचा नाश व्हावा ही तुमची कामना

---

[९] अत्र सामान्यार्थेनोत्तरार्धगतेन विशेषार्थस्य पूर्वार्धगतस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽळङ्कारः। टिप्पणी - पृ.५६, ओळ क्र. 31 - 3२.

[१०] दुर्जनस्यायं स्वभाव इत्यर्थान्तरन्यास्येन परिहरति - दुर्जनः प्रत्यपकारेण शाम्ये्त उपकारेण नेति । विव. पृ. १५४, ओळ क्र. ७ - ९

[११] शिशु. २.५४ पृ. ४६

आवश्य पूर्ण होईल. परंतु त्यासाठी काही काळ प्रतीक्षा करावी लागेल. कार्यसिद्धीसाठी मी स्वतः अवतार घेऊ शकत नाही. त्याचे कारण असे की हा दैत्य माझ्या ( वरा-) मुळे उत्कर्ष पावला आहे. म्हणून माझ्याकडून त्याचा विनाश होणे उचित नाही, कारण आपल्या हाताने लावलेल्या विषवृक्षाला आपल्या हातांनी तोडणे बरोबर नाही.

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत ' हा दैत्य माझ्यामुळे उत्कर्ष पावला असल्याने माझ्याकडून त्याचा विनाश होणे उचित नाही ', हे विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील 'विषवृक्षोऽपि संवर्ध्य स्वयं छेत्तुमसांप्रतम् I' या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[१२]

प्रस्तुत श्लोकात कालिदासाने अर्थान्तरन्यासाचा प्रयोग करताना एका चांगल्या आणि पटणाऱ्या सुभाषिताचा वापर केला आहे. मातापित्यांना आपले अपत्य कितीही वाईट असले तरी ते त्याचे अहित चिंतित नाहीत.

ब्रह्मदेव जरी झाला तरी तो अपत्यप्रेमाने तारकासुराचा वध करण्यास दुर्बळ ठरतो. मनुष्यस्वभावाच्या आधारे ह्याचे कालिदासाने समर्थन केले आहे.

हीच गोष्ट इतर सुभाषितातूनही आपणांस पाहावयास मिळते.- जसे,
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति I [१३]

तस्मिन् मघोनस्त्रिदशान् विहाय सहस्रमक्ष्णां युगपत् पपात I
प्रयोजनापेक्षितया प्रभूणा प्रायश्चलं गौरवमाश्रितेषु II

( कुमार. 3.१ )

**विवेचन :**

पार्वतीने भगवान शंकाराची सेवा करुनही त्यांच्यावर काही परिणाम झाला नाही. ते पाहून शिवपार्वतीचे मीलन व्हावे यासाठी इंद्राचे हजार नेत्र, तिथे उपस्थित असलेल्या सर्व देवतांना सोडून मदनावर एकाच वेळी पडले. स्वामींचा सेवकांबाबतीतला आदरभाव प्रायः प्रयोजनानुसार कमीजास्त होत असतो, तो स्थिर नसतो.

**निरीक्षण :**

---

[१२] उत्तरार्धगतेन सामान्यार्थेन पूर्वार्धतः विशेषार्थस्य समर्थनादर्थान्तरन्यासालंकारः I टिप्पणी - पृ. ६3, ओळ क्र. २१ - २२.
[१३] स्तोत्र रत्नावली.

राजाचे आपल्या सेवकांकडून केवळ इशाऱ्याने काम करून घेण्याचे सामर्थ्य इंद्रासारख्या राजामध्ये असते. ही गोष्ट कालिदासाने जाणून इंद्राचे राजेपण वर्णन केले आहे. राजा प्रत्येक सेवकाच्या पात्रतेनुसार कामावर योजना करतो. हेही इथे सांगितले आहे. इंद्र हा देवांचा राजा आहे. त्यास मदन हाच शिव-पार्वतींचा विवाह जुळण्यास योग्य वाटल्याने त्याने त्याच्याकडे आपल्या नजरा वळवल्या. — — -

— —- प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत विशेषाचा उल्लेख आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत झालेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

मल्लिनाथ आणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सूचित केला आहे. [१४]

वर्णप्रकर्षे सति कर्णिकारं दुनोति निर्गन्धतया स्म चेतः ।
प्रायेण सामग्र्यविधौ गुणानां पराङ्मुखी विश्वसृजः प्रवृत्तिः ॥
( कुमार. ३.२८ )

विवेचन :

तिसऱ्या सर्गात वसंताच्या साम्राज्याचे वर्णन करताना कवी म्हणतो की, अत्यंत सुंदर रंगाचे असूनही कर्णिकार फूल गंधहीन असल्यामुळे चित्ताला खिन्न करीत होते. बहुधा असे दिसून येते की, विधात्याची प्रवृत्ती सर्व गुणांना एकत्र करण्यापासून विमुख असते.

निरीक्षण :

कालिदासाचे इथे वसंतऋतूत बहरलेल्या निसर्गाचे सूक्ष्म निरीक्षण दिसून येते. या ऋतूत सर्वत्र रंगांची व गंधांची उधळण होत असते. परंतु कर्णिकारसारखे एखादेच देखणे फूल मात्र गंधापासून वंचित असते. हा अपवाद त्याचे नेमके लक्ष वेधून घेतो. कोणतीही व्यक्ती सर्वगुणसंपन्न असत नाही. हा विधिलिखित नियम कालिदासाने या फुलाच्या निमित्ताने मांडला आहे.

---

[१४] ननु सुचिरपरित्यागेन . .. इत्याशङ्क्यार्थान्तरंन्यस्यति - प्रायो भूम्ना प्रभूणामाश्रितेषु सेवकेषु विषये गौरवमादरः प्रयोजनापेक्षितया कार्यार्थित्वेन हेतुना चलं चञ्चलम् । संजी. पृ.६९, ओळ क्र. ८ - ११.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[१५]

चारित्र्यवर्धनाचार्य, अरुणगिरीनाथ, नारायण पण्डित आणि वल्लभदेव यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.

या सारखीच कल्पना कालिदासाच्या दुसऱ्या ग्रंथामध्ये पुढीलप्रमाणे आढळते.

उपहितं शिशिरापगमश्रिया
मुकुलजालमशोभत किंशुके ।
प्रणयिनीव नखक्षतमण्डनं
प्रमदया मदयापितलज्जया ॥ [१६]

श्रुताप्सरोगीतिरपि क्षणेऽस्मिन् हरः प्रसंख्यानपरो बभूव ।
आत्मेश्वराणां नहि जातु विघ्नाः समाधिभेदप्रभवो भवन्ति ॥
( कुमार. ३.४० )

**विवेचन :**

भगवान शंकराच्या तपामध्ये विघ्न उत्पन्न करण्याच्या हेतूने वसंताने येऊन परिसर अतिरमणीय बनवला. अत्यंत मोहक अशा वसंतोद्भवाचे वेळी अप्सरांचे गाणे ऐकूनही भगवान शंकर आपल्या समाधीमध्ये अविचल भावाने लीन राहिले. कारण चित्तामध्ये क्षोभ उत्पन्न करणाऱ्या वस्तू आत्मसंयमी पुरुषांची समाधी भंग करण्यास समर्थ होत नाहीत.

**निरीक्षण :**

कालिदासाने योगी मनुष्य समाधीत मग्न झाले की तो कोणत्याही गाष्टीने विचलित होत नाही. हे लक्षात घेऊन भगवान शंकरांचे योगिराज म्हणून जे स्वरुप आहे, ते इथे वर्णिले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे. आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[१७]

---

अत्रार्थान्तरन्यासः । विव. पृ. 3, ओळ क्र. ६.
[१५] सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । संजी. पृ.८२, ओळ क्र.२६-२७
[१६] रघु. ९.31 (प्र) पृ.२१९
[१७] उत्तरार्धगतसामान्यार्थेन पूर्वार्धगत विशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासाऽलङ्कारः । टिप्पणी. पृ. ८८, ओळ क्र.१४ - १५

नारायण पण्डिताने या श्लोकात अर्थान्तन्यास सूचित केला आहे.[१८]

अनन्यभाजं पतिमाप्नुहीति सा तथ्यमेवाभिहिता भवेन ।
न हीश्वरव्याहृतयः कदाचित् पुष्णन्ति लोके विपरीतमर्थम् ॥
( कुमार. 3.६3 )

**विवेचन :**

पार्वतीने भगवान शंकरांना मस्तक लववून प्रणाम केला. प्रणामानंतर 'एकपत्नी व्रती' (सपत्नीरहित ) पती मिळो. अशाप्रकारे शंकरांनी तिला आशीर्वाद दिला. तो बिलकूल खरा होता. कारण महापुरुषांची वाणी जगतामध्ये केव्हाही विपरीत अर्थाचे पोषण करीत नाही. ( त्यांचे म्हणणे मिथ्या ठरत नाही )

**निरीक्षण :**

कालिदासाने महापुरुषांचा विशेष सांगताना या श्लोकात त्यांचा सत्यवचनीपणा प्रतिपादन केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[१९]

या श्लोकासारखा भाव भवभूतीच्या पुढील श्लोकात आहे.

ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ॥ [२०]

उपमानमभूद् विलासिनां करणं यत् तव कान्तिमत्तया ।
तदिदं गतमीदृशीं दशां न विदीर्ये कठिनाः खलु स्त्रियः ॥
( कुमार. ४.५ )

---

[१८] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते – विघ्नाः जातु आत्मेश्वराणां समाधिभेदप्रभवो न भवन्ति हि इति । विव. पृ. ५५, ओळ क्र. १२ – १3.

[१९] अत्र पूर्वार्धोपात्तविशेषार्थस्योत्तरार्धगतसामान्यार्थेन समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासालङ्कारः । टिप्पणी. पृ. ९८, ओळ क्र. 3२ – 33

[२०] उत्तर. १.१०. पृ. ९

## विवेचन :

भगवान शंकाराच्या तृतीय नेत्रातील अग्नीमुळे मदन भस्मसात झाल्याचे पाहून त्याची पत्नी रती अत्यंत विलाप करू लागली. ती म्हणाली की, ' हे प्रिय ! अनुपम सौंदर्यामुळे तुमचे शरीर विलासी पुरुषांचे उपमान बनले होते. त्याची आज अशी दयनीय दशा पाहून माझी छाती फाटली नाही. हाय ! हाय ! म्हणून लोक म्हणतात की, स्त्रिया अत्यंत कठोर असतात. ' यातून तिला असे सांगावयाचे आहे की, मदनाचे दहन झाल्यानंतर त्याची ती अवस्था पहावयास ती जिवंत आहे. तिलाही पती निधनानंतर मृत्यू आला असता. पण तसे न झाल्याने ती असे म्हणते,'स्त्रियांचे हृदय अत्यंत कठोर असते हेच खरे '

## निरीक्षण :

स्त्रिया या कठोर अन्तःकरणाच्या असतात असे अनेकांनी मानले आहे. पण कालिदासाचा विशेष म्हणजे हा अनुभव त्याने एका स्त्रीच्या मुखातून वदविला आहे. म्हणजे पुरुषच नव्हे तर स्त्रिया देखील मान्य करतात की स्त्रियांचे अन्तःकरण कठोर असते.

या श्लोकात पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या पादातील 'कठिनाः खलु स्त्रियः। 'या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

टीकाकार मल्लिनाथ याने या श्लोकात कारणद्वारा कार्याचे समर्थनरूप अलंकार आहे असे सांगितले आहे. [२१]

या श्लोकातील कल्पनेशी समान कल्पना कालिदासाच्या रघुवंशात आढळते.

नृत्तं मयुराः कुसुमानि वृक्षा दर्भानुपात्तान् विजहुर्हरिण्यः।
तस्याः प्रपन्ने समदुःखभावमत्यन्तमासीद् रूदितं वनेऽपि ।।[२२]

**तमवेक्ष्य रुरोद सा भृशं स्तनसंबाधमुरो जघान च ।**
**स्वजनस्य हि दुःखमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते ।।**

( कुमार. ४.२६ )

## विवेचन :

---

[२१] कारणात्कार्यसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । संजी. पृ. १०७, ओळ क्र. १3 - १४

[२२] रघु. १४- १९. पृ.. २७3

भगवान शिवाने मदनाला भस्मसात केले. ते पाहून त्याची पत्नी रती विलाप करू लागली असता मदनाचा मित्र वसंत ऋतू तिचे सांत्वन करण्यासाठी तिच्याकडे आला. त्याला पाहून तिची झालेली अवस्था प्रस्तुत श्लोकात वर्णन केली आहे. वसंताला समोर पाहून रती ऊर बडवून जोर-जोरात रुदन करू लागली, कारण आपल्या समोर आलेल्या स्वजनाला पाहून हृदयस्थित दुःखाचे द्वार एकदम उघडे होते.

**निरीक्षण :**

या श्लोकात कवीने नुकत्याच पतिवियुक्त झालेल्या एका पतिव्रता स्त्रीच्या हृदयाचे मार्मिक चित्रण केले आहे. आपल्या समक्ष पतीचा मृत्यू पाहिल्यास त्या स्त्रीची काय अवस्था होते हे इथे समजून येते. त्याबरोबरच स्वजनाजवळ माणूस खुलेपणाने त्याचे दुःख निःसंकोचपणे सांगतो हे नैसर्गिक सत्यही कवीने इथे सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळींत ' वसंताला पाहून तिने ऊर बडवले आणि ती खूप रडली, हे विशेष असून त्याचे दुसऱ्या ओळींत आलेल्या ' आपल्या स्वजनांपुढे दुःखाचे द्वार एकदम उगडते.' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[२३]

नारायण पण्डिताने आपल्या टीकेत या श्लोकामध्ये अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशित केला आहे.[२४]

स्वजनांना पाहून दुःख जास्त होते. या कल्पनेशी समान कल्पना भवभूतीने आपल्या उत्तररामचरितम् नाटकात मांडलेली दिसते. ती अशी,

संतानवाहीन्यपि मानुषाणां दुःखानि सम्बन्धिवियोगजानि ।
दृष्टे जने प्रेयसि दुःसहानि स्रोतः सहस्रैरिव संप्लवन्ते।। [२५]

**अयि संप्रति देहि दर्शनं स्मर पर्युत्सुक एष माधवः ।**
**दयितास्वनवस्थितं नृणां न खलु प्रेम चलं सुहृज्जने ।।**

( कुमार. ४.२८ )

**विवेचन :**

मदनदाहानंतर रतीने पुष्कळ विलाप केला. पण मदन परत आला नाही. जेव्हा वसंत ऋतू तिच्या सांत्वनासाठी आला तेव्हा तिला असे वाटते की, आता त्याचा मित्र आला आहे म्हणून कमीत कमी त्याच्या भेटीसाठी तो अवश्य येईल म्हणून ती म्हणते की, ' हे

---

[२३] उत्तरार्धगतेन सामान्यार्थेन पूर्वार्धगतस्य विशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्यासाऽलंङ्कारः । टिप्पणी पृ.११६, ओळ क्र. 3 - ४

[२४] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते – दुःखं स्वजनस्य अग्रतः विवृतद्वारमिव उपजायते हीति । विव. पृ. १३१, ओळ क्र. १६ – १७

[२५] उत्तर. ४.८ पृ. ९० – ९१

कामदेव ! आता तरी दर्शन द्या. हे वसंत तुम्हाला भेटण्यासाठी उत्कंठित आहेत. म्हणून आता तरी दर्शन द्या. पुरुषांचे प्रेम आपल्या प्रियेवर कदाचित सुदृढ नसेल परंतु मित्राच्या बाबतीत त्यांचे ते प्रेम अढळ असते.

अभिप्राय असा की, प्रेमी आणि प्रेमिका अथवा पती व पत्नी यांचे प्रेम नेहमी स्थिर राहू शकते.

**निरीक्षण :**

कालिदासाने रतिविलापातून पत्नीप्रेमाचे व मित्रप्रेमाचे विशेष उलगडले आहे. प्रेम जरी एक असले तरी मित्रप्रेम त्याने जास्त मानले आहे. दृढमैत्री ही मित्राची असते. इथे कवीने मित्रमैत्रीचा गौरव केला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे चौथ्या पादातील, 'खलु प्रेम चलं सुहृज्जने ।' [२६] या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

विधिना कृत-मर्द्धवैशसं ननु मां कामवधे विमुञ्चता
अनघाऽपि हि संश्रयद्रुमे गजभग्ने पतनाय वल्लरी ॥
(कुमार ४.३१ )

**विवेचन :**

मदन भगवान शिवाकडून भस्म झाल्यावर त्याची पत्नी रती दारुण विलाप करते. तेव्हा मदनाचा मित्र वसंत तिथे आल्यावर ती त्याला म्हणते की, ' देवाने मदनाचा मृत्यू होणे आणि मी जिवंत राहणे म्हणजे अर्धी हत्या केली आहे. म्हणजेच पत्नी पतीचे अर्धांग आहे. तेव्हा मदनाचे शरीर भस्म होणे आणि माझे जिवंत राहणे हे मदनाच्या शरीराचा अर्धा भाग ( रती ) जिवंत आहे. जेव्हा आश्रयी वृक्षाचा नाश हत्तीकडून जंगलात होतो तेव्हा त्याच्यावर आश्रित असलेली लताही नष्ट होते.

**निरीक्षण :**

---

[२६] उत्तरार्धगतसामान्यार्थेन पूर्वार्धगतविशेषार्थस्य समर्थनादर्थान्तरन्यासाऽलङ्कारश्च । टिप्पणी पृ. ११६, ओळ क्र. २७-२८

निसर्गामध्ये वृक्ष पडल्यावर त्यावर चढलेली वेली देखील उन्मळून पडते, परंतु रतीच्या बाबतीत मात्र तिचे अर्धे शरीर असलेल्या मदनाचा मृत्यू झाला तरी त्याचे अर्धे शरीर असणारी रती मात्र जिवंत राहिली. मदनाच्या मृत्यूनंतर तिने केलेल्या शोकामध्ये कालिदासाने इथे कारुण्य निर्माण केले आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीमध्ये विशेष आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रस्तुत श्लोकास स्पष्टपणे दृष्टांत अलंकाराचे लक्षण लागू पडते पण इथे समर्थन असल्याने हा अलंकार दाखविला आहे.[२७]

शशिना सह याति कौमुदी सह मेघेन तडित् प्रलीयते।
प्रमदाः पतिवर्त्मगा इति प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ।।

( कुमार. ४.33 )

**विवेचन :**

मदनाच्या विनाशामुळे अत्यंत दुःखविह्वल झालेली रती वसंताला म्हणते की, ' चंद्राचा अस्त झाला की चांदणी त्याच्याबरोबर अस्ताला जाते आणि मेघाबरोबर वीजही लीन होते. जेव्हा अचेतन पदार्थ हे समजतात की, स्त्रियांनी पतीच्या मागोमाग गेले पाहिजे. म्हणून मलाही तसे केले पाहिजे.'

**निरीक्षण :**

अचेतनाचा व्यवहारदेखील चेतनापेक्षा अधिक सरस असतो की, त्याचे अनुकरण चेतन मनुष्याने केले पाहिजे असे कवीने इथे सूचित केले आहे. अचेतन निसर्ग अनुकरणीय आहे ही गोष्ट कालिदासाला सांगावयाची आहे.

पहिल्या ओळीत दोन भिन्न विशेषांचा निर्देश केला असून त्याचे समर्थन शेवटच्या ओळीत निर्देश केलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. [२८]

प्रस्तुत श्लोकात कवीने एक अत्यंत सुंदर नैसर्गिक चिरंतन सत्यावर आधारित सुभाषित सांगितले आहे की, पत्नी सर्व अवस्थांत पतीला अनुसरते. संस्कृत साहित्यात या गोष्टीचा निर्देश अनेक ठिकाणी आढळतो. कालिदासाचा पूर्ववर्ती कवी भास याने असे लिहिले आहे -

---

[२७] पूर्वार्धोपात्तविशेषार्धस्योत्तरार्धगतसामान्यार्थेन समर्थनादर्थान्तरन्यासाऽलङ्कारः ॥ टिप्पणी – पृ. ११८, ओळ क्र. १० – ११
[२८] पूर्वार्धोपात्तविशेषार्थस्योत्तरार्धगतसामान्यार्थतः समर्थनादर्थान्तरन्यासाऽङ्कारः । टिप्पणी पृ.११९, ओळ क्र. ११ – १२

' अनुचरति शशाङ्कं राहुदोषेऽपि तारा
पतति च वनवृक्षे याति भूमिं लता च ।
त्यजति न च करेणुः पङ्कलग्नं गजेन्द्रं
व्रजतु चरतु धर्मं भर्तृनाथा हि नार्यः ॥[२९]

महाकवी कालिदासाने अशाच प्रकारची कल्पना पुढील श्लोकात दिली आहे.

शशिनं पुनरेति शर्वरी दयिता द्वन्द्वचरं पतत्रिणम् ।
इति तौ विरहान्तरक्षमौ कथमत्यन्तगता न मां दहे ॥[३०]

इति चाह स धर्मयाचितः स्मरशापावधिदां सरस्वतीम् ।
अशनेरमृतस्य चोभये वशिनश्चाम्बुधराश्च योनयः ॥

( कुमार.४.४३ )

**विवेचन :**

शंकराकडून मदनाचे दहन झाले. त्याची पत्नी रती देहत्यागास प्रवृत्त झाली असता आकाशवाणी होऊन तिला देहत्यागापासून परावृत्त केले आणि ब्रह्मदेवाने मदनाला दिलेल्या शापाची माहिती देऊन तिला असे सांगितले की, ' जेव्हा पार्वतीच्या तपश्चर्येने भगवान शिव प्रसन्न होऊन तिच्याशी विवाहबद्ध होतील तेव्हा ते आनंदित होऊन मदनाला शरीर प्रदान करतील. ज्याप्रमाणे मेघामध्ये वज्र आणि पाणी असतात त्याप्रमाणे संयमी महापुरूषांच्या ठिकाणी क्रोध आणि दया राहत असतात. ' याचा अभिप्राय असा की शिवाच्या प्रसादाने मदन जिवंत होईल.

**निरीक्षण :**

कालिदास हा भगवान शंकराचा भक्त असला पाहिजे. त्यामुळे त्याने भगवान शंकराच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू म्हणून योग्याचे कठोर अन्तःकरण आणि ईश्वराचे भक्तांबद्दलचे दयार्द्र हृदय इथे वर्णन केले आहे. या श्लोकात अर्थान्तरन्यासाच्या आधारे शिव या देवतेचे विशेष स्वरूप वर्णन केले आहे.

---

[२९] प्रतिमा - १.२५ पृ. २६२
[३०] रघु. ८.५६. पृ. क्र. २१०

मेघाच्या अन्तःकरणात जल व वज्र ज्याप्रमाणे असतात त्याप्रमाणे शिवाच्या ठिकाणी दया व क्रोध राहतात असे म्हटले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या दोन पादांत विशेष असून त्याचे समर्थन तिसऱ्या व चौथ्या पादांतील सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

टीकाकारांपैकी अरुणगिरीनाथ, नारायण पण्डित आणि वल्लभदेव यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दर्शविला आहे.[३१]

याच सारखी कल्पना संस्कृत साहित्यात इतरत्रही आढळते –

स चानुनीतः प्रणतेन पश्चान्मया महर्षिर्मृदुतामगच्छत् ।
उष्णत्वमग्न्यातपसंप्रयोगाच्छैत्यं हि यत् सा प्रकृतिर्जलस्य ॥[३२]

वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
लोकोत्तराणां चेतांसि को नु विज्ञातुमर्हति ॥[33]

तदिदं परिरक्ष शोभने भवितव्यप्रियसंगमं वपुः ।
रविपीतजला तपात्यये पुनरोधेन हि युज्यते नदी ॥
( कुमार ४.४४ )

**विवेचन :**

मदनाच्या दहनानंतर जेव्हा रती देहत्यागास प्रवृत्त झाली तेव्हा आकाशवाणी होऊन तिला देहत्यागापासून परावृत्त करताना असे सांगितले की,' हे सुंदरी ! तुझे प्रियकराशी निश्चित मीलन होईल तेव्हा तू या शरीराचे रक्षण कर. कारण ग्रीष्म ऋतूमध्ये सूर्यकिरणांनी समस्त जल शोषल्यामुळे जलशून्य झालेली नदी ग्रीष्म ऋतू संपल्यावर ती पुन्हा पावसाने भरून जाते '.

---

[३१] तथाकुपितस्य प्रसादमर्थान्तरन्यासेनोपपादयति – अशनेरिति । प्रका. पृ. १५०, ओळ क्र. 3-४
नन्वेवं कुपितस्य . . इतीमाङ्कामर्थान्तरन्यासेन परिहरति– अशनेः अमृतस्य चोभयोः वशितः अम्बुधराश्च योनयः इति । विव. पृ. १५१, ओळ क्र. १५-१६.
आणखी पहा – पञ्जिका पृ. १३२, ओळ क्र. ८.
[३२] रघु. ५.५४. पृ. १८४
[33] उत्तर. २.६ पृ. ३९

**निरीक्षण :**

ग्रीष्म ऋतूत आटलेली नदी पावसाळ्यात दुथडी भरुन वाहते. या निसर्गातील नियमाचा आधार घेऊन दुःखी अन्तःकरण असलेल्या रतीचे तिच्या प्रियकराशी लवकरच मीलन होईल, अशी आशा आकाशवाणीने पल्लवित केली. ग्रीष्म ऋतूत नदीचे आटणे हे रतीने मदनदाहाने दुःखी होण्यासमान आहे आणि पावसाळ्यात नदी भरुन वाहणे हे आकाशवाणीमुळे रतीच्या आशा पल्लवित होण्याशी समान आहे. कालिदासाने या श्लोकातून रतीच्या दुःखाला लवकरच कलाटणी मिळून तिला सुखप्राप्ती होईल हे सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. सदरचा अलंकार ' हि ' शब्द सहित या प्रकारचा आहे.

अरुणगिरीनाथ आणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[३४]

**तथा समक्षं दहता मनोभवं पिनाकिना भग्नमनोरथा सती ।**
**निनिन्द रूपं हृदयेन पार्वती प्रियेषु सौभाग्यफला हि चारुता ॥**

( कुमार .५.१ )

**विवेचन :**

पार्वतीच्या समोर भगवान शंकराचे कोपाने मदनाचे दहन झाले. ते पाहून तिच्या अभिलाषेचा चक्काचूर झाल्याने ती खिन्न झाली. ती आपल्या सौंदर्याची निंदा करू लागली कारण प्रियतमाचे प्रेम प्राप्त करणे हेच सौंदर्याचे फल आहे.

**निरीक्षण :**

सौंदर्याचे साफल्य प्रिय व्यक्तीच्या प्रेमप्राप्तीमध्ये असते. तसे नसेल तर ते सौंदर्य विफल होते. हे वैधर्म्यपूर्वक अर्थान्तरन्यासद्वारा कालिदासाने सांगितले आहे.

---

[३४] तस्मात् कैश्चिदभ्युपगतः सादृश्येनार्थान्तरन्यासोऽयम् । प्रका. पृ. १५२, ओळ क्र. ८.
तस्मात् सादृश्येनार्थान्तरन्यास एवायम् । विव. पृ. १५३, ओळ क्र. ५-६

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला आहे. त्याचे समर्थन चतुर्थ पादातील सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[३५]. याच श्लोकात कारणद्वारा कार्याचे समर्थन हा प्रकारही संभवतो. ' समक्ष शंकराने मदनाचे दहन केल्याचे पाहून पार्वती भग्न मनोरथ झाल्याने खिन्न झाली व ती आपल्या सौंदर्याला दोष देऊ लागली ' हे विशेष अथवा कार्य असून, ' प्रियतम सौंदर्याने आकर्षित करणे ' हे सामान्य अथवा कारण आहे.

या श्लोकात कवीने अत्यंत सुंदर सुभाषित सांगितले आहे.

मनीषिताः सन्ति गुहेऽपि देवतास्तपः क्व वत्से क्व च तावकं वपुः।
पदं सहेत भ्रमरस्य पेलवं शिरीष पुष्पं न पुनः पतत्रिणः ॥

( कुमार. ५.४)

विवेचन :

पार्वतीच्या समोर मदनाचा नाश झाल्याचे पाहून तिने असा विचार केला की, जे रूपाने साध्य झाले नाही, ते तपाने साध्य करीन. म्हणून तिने शिवप्राप्तीसाठी तपश्चर्या करण्याचे ठरविले. जेव्हा ही गोष्ट तिची माता मेना हिला समजली तेव्हा तिला तपस्यारूपी कठोर मुनिव्रतापासून परावृत्त करण्यासाठी पार्वतीला म्हणाली, ' हे बाळे ! आपल्या घरात अनेक देवता विराजमान आहेत. अर्थात त्यांच्या प्रतिमा घरात आहेत. तू इथेच राहून त्यांची पूजा करू शकतेस. कुठे ते तपाचे कठोर व्रत आणि कुठे तुझे हे कोमल शरीर ? म्हणजेच लाडात वाढलेले तुझे हे नाजूक शरीर तपाचे कठोर श्रम सहन करू शकणार नाहीत. शिरीषाचे कोमल फूल भुंग्याचा चरणाघात सहन करू शकते. पण पक्षांचे कठोर चरणघात सहन करू शकत नाही. अर्थात मुनींप्रमाणे तपस्या करणे तुझ्या शक्तीच्या बाहेर आहे.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीतील सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने त्याचे समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

नारायण पण्डित यांच्या मते या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[३६]

---

३५ तुर्यपादप्रतिपाद्यसामान्यार्थेन पादत्रयप्रतिपाद्यस्य पार्वती कर्तृकात्मरूपगर्हणस्यविशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽङ्कारः। टिप्पणी - पृ.१२५, ओळ क्र. २१ - २२

९८

इति ध्रुवेच्छामनुशासती सुतां शशाक मेना न नियन्तुमुद्यमात् ।
क ईप्सितार्थस्थिरनिश्चयं मनः पयश्च निम्नाभिमुखं प्रतीपयेत् ॥

( कुमार. ५.५ )

**विवेचन :**

मेनाद्वारा आपली कन्या पार्वतीला तपश्चर्येच्या कठोर व्रतापासून परावृत्त करण्याच्या केलेल्या प्रयत्नाचे वर्णन करताना कवी इथे सांगतात की, ' आपली कन्या पार्वतीला मुनिव्रतरूपी दृढ संकल्पापासून बाजूला वळवू शकली नाही. कारण इच्छित गोष्ट प्राप्त करण्याची दृढ संकल्प करणाऱ्या मनाला आणि उताराकडे जाणाऱ्या जलाला कोण बरे अडवू शकेल ? अर्थात कोणीही नाही. '

**निरीक्षण :**

उताराकडे वाहणारे पाणी कोणीही अडवू शकत नाही. हा निसर्गातील सामान्य अनुभव पाहून पार्वतीचा दृढ निश्चय कोणीही बदलू शकले नाही. असे कवीने इथे वर्णन केले आहे. यातून त्याने दृढनिश्चयी माणसाचा स्वभाव सूचित केला आहे. हे प्रस्तुत श्लोकातील अर्थान्तरन्यासाने दाखविले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत 'मेना पार्वतीला तपश्चर्येपासून आडवू शकली नाही' या विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या भिन्न भिन्न दोन सामान्यांद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकात वरील अर्थान्तरन्यासाचा प्रयोग करताना दोन अत्यंत सुंदर सुभाषितांचा आधार घेतला आहे.

मल्लिनाथ, अरुणगिरीनाथ व नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचे सूचन केले आहे.[३७]

---

[३६] उत्तरार्धे तु सादृश्यनिमित्तोऽर्थान्तरन्यासः ॥ विव. १६३, ओळ क्र. ५

[३७] अत्र दीपकानुप्राणितोऽर्थान्तरन्यासालङ्कारः । संजी.पृ. १२७, ओळ क्र. २३-२४
अत्र दीपकार्थान्तरन्यासयोः सङ्करः। प्रका. १६३ ओळ क्र. १४-१५. आणखी पहा विव. पृ. १६४, ओळ क्र. ४

यथा प्रसिद्धैर्मधुरं शिरोरुहैर्जटाभिरप्येवमभूत तदाननम् ।
न षट्पदश्रेणिभिरेव पङ्कजं सशैवलासङ्गमपि प्रकाशते ॥
( कुमार ५.९ )

विवेचन :

मदन दहनानंतर पार्वती भगवान शंकराची प्राप्ती करून घेण्यासाठी तपश्चर्या करण्याचा निश्चय करून ती वनात गेली. तिथे तपश्चर्या करीत असता पुष्कळ काळ गेला असता तिच्या केसांच्या जटा झाल्या. जटा धारण करूनही पार्वती सुंदरच दिसत होती हे सांगताना कवी म्हणतो की,

'पार्वतीचे मुख फुलांनी सजवलेल्या केसांनी जसे सुंदर दिसत असे त्याप्रमाणेच तपश्चर्येच्या वेळी जटांनी सुंदर दिसत होते. कारण, कमळाचे फूल केवळ भ्रमरसमूहांनी सुशोभित होत नाही तर शेवाळ्यांनी वेढलेले असूनही जितके सुंदर दिसते जितके भ्रमरसमूहांनी दिसते.

निरीक्षण :

पार्वतीची तपश्चर्या तिच्या सौंदर्यास पोषक ठरली हे कवीने प्रस्तुत अर्थान्तरन्यासद्वारा वर्णन केले आहे. कालिदासाने या ठिकाणी एक दाखला दिला आहे. भ्रमर समूहांनी केवळ कमळाचे फूल सुशोभित होत नाही, तर शेवाळ्यांनी वेढूनही ते सुंदर दिसते. त्याप्रमाणे पार्वतीचे मुखकमळ जटांनी सुद्धा सुशोभित झाले. या अर्थान्तरन्यासाने पार्वतीचे सौंदर्य अधिक खुलून कसे दिसते ते सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील भाव असा की, पार्वती निसर्गतःच सुंदर असलेली ती सुसज्जित केसांनी जितकी सुंदर दिसत होती तितकीच जटांनी सुंदर दिसत होती. ' जातीच्या सुंदरा काहीही शोभते ' हेच खरे. कमळाच्या बाबतीत असेच म्हणता येईल. कमळ निसर्गतः सुंदर असते आणि ते सर्वावस्थेत सुंदर दिसते. याच प्रकारचे विचार कालिदासाच्या इतर वाङ्मयातही आढळतात.उदा.

'सर्वास्ववस्थासु रमणीयत्वमाकृतिविशेषाणाम् ।'[३८]

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याने साधर्म्यपूर्वक केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[३९]

---

[३८] अभि. शा. पृ.६१९, अंक ६, ओळ क्र. ४

[३९] पूर्वार्धप्रतिपाद्यविशेषार्थस्योत्तरार्धप्रतिपाद्यसामान्यार्थेन समर्थनादर्थान्तरन्यासः । टिप्पणी – पृ. १२९, ओळ क्र. २७-२८.

कृताभिषेकां हुतजातवेदसं त्वगुत्तरासङ्गवतीमधीतिनीम् ।
दिदृक्षवस्तामृषयोऽभ्युपागमन् न धर्मवृद्धेषु वयः समीक्ष्यते ॥

( कुमार. ५.१६ )

विवेचन :

भगवान शिवाची पती म्हणून प्राप्ती व्हावी यासाठी ती वनामध्ये जाऊन तपश्चर्या करू लागली. तपोवनातील निवासकालात पार्वतीच्या वाढत असलेल्या प्रभावाचे वर्णन करताना कवी लिहितो की, ' स्नान झाल्यानंतर पार्वती नूतन वल्कले धारण करुन अग्नीला हवन करुन स्तुती करण्यासाठी बसत असे. तिला त्या रुपात पाहण्यासाठी ऋषिगणसुद्धा येत असत. कारण धर्मपरायण व्यक्तीचे वय विचारात घेतले जात नाही.

निरीक्षण :

धर्मपरायण व्यक्तीचे माहात्म्य या श्लोकात कालिदासाने वर्णन केले आहे. तो धर्माचरणाला विशेष मानीत असे. श्रद्धाळू सामान्यलोक धर्मपरायण व्यक्तीचा आदर करतातच. पण कालिदासाने इथे धर्मपरायण व्यक्तीही अन्य ऋषीसमान धर्मपरायण व्यक्तीचा आदर करीत असतात. कवीच्या मते धर्मपरायणता ही वयावर अवलंबून नसते.

या श्लोकात कवीने असे निर्देशित केले आहे की, लहान वयातील पार्वतीचे तपाचरण इतके उग्र व निष्ठापूर्ण होते की, तिला पहावयास ऋषिगण येत, हे या गोष्टीचे सूचक आहे की, धर्माचरण हे वयावर अवलंबून नसते, तिथे कमी वयाच्या व्यक्तीचाही अधिक वय असणारे लोक आदर करतात. अशाच प्रकारचा विचार धर्मशास्त्रामध्ये देखील आलेला दिसतो, तो असा,

न तेन वृद्धो भवति येनाऽस्य पलितं शिरः ।
यो वै युवाऽप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥ [४०]

प्रस्तुत श्लोकातील तीन पादांत विशेष आले असून त्याचे समर्थन चौथ्या पादातील सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[४१]

---

[४०] मनु. २, १५६.

[४१] तुर्यपादगतसामान्यार्थेन पादत्रयगतविशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासाऽलङ्कारः । टिप्पणी. पृ. 133, ओळ क्र. १६-१७

क्लमं ययौ कन्दुक लीलयापि या तया मुनीनां चरितं व्यगाह्यत।
ध्रुवं वपुः काञ्चन-पद्मनिर्मितं मृदु प्रकृत्या च ससारमेव च ॥

( कुमार. ५.१९ )

**विवेचन :**

जेव्हा पार्वतीला असे वाटले की, सामान्य तपाचरणाने तिला अभीष्ट फल, अर्थात शंकर प्राप्तीरूपी फल मिळत नाही तेव्हा तिने आपल्या शरीराच्या कोमलतेकडे लक्ष न देता कठोर तपस्येला आरंभ केला. पार्वतीच्या या तपस्येचे वर्णन करताना कवी सांगतात की, वयाने लहान असताना व लाडात वाढलेल्या पार्वतीचे शरीर अत्यंत नाजूक होते. अन्य मुलींबरोबर चेंडू खेळताना ती पार्वती थकत असे, ती आज मुनींप्रमाणे कठोर तपामध्ये मग्न झाली. यावरून हेच प्रतीत होते की, तिचे शरीर निश्चितच सुवर्णकमळापासून बनले आहे. कारण त्याच्या ठिकाणी कमळासारखी कोमलता आणि सुवर्णासारखी कठीणता आहे.

**निरीक्षण :**

कालिदासाने या श्लोकात पार्वतीच्या कठोर तपश्चर्येचा गौरव केला आहे. पार्वतीचे कोमल शरीर हे तपाचरणाला सुद्धा दृढनिश्चयाने समर्थ आहे. हे सामर्थ्य कालिदासाने सुवर्णाने तोलले आहे आणि या कोमलता व अर्थान्तरन्यास द्वारा कवीने पार्वतीचा दृढनिश्चय यांचे परिपोषक वर्णन केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत कार्याचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या कारणद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

अरुणगिरीनाथ आणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे. [४२]

---

[४२] अर्थान्तरन्यासप्रकारश्चायम् । प्रका. पृ.१८१, ओळ क्र. १४ - १५.
अत्र काञ्चनपद्मधर्मित्वस्य हेतोः ससारत्वेन साध्येन व्याप्तिः प्रदर्शितेत्यर्थान्तरन्यासप्रकारभेद एवायम् । विव. पृ. १८२ ओळ क्र. ६ - ७

तमातिथेयी बहुमानपूर्वया सपर्यया प्रत्युदियाय पार्वती ।
भवन्ति साम्येऽपि निविष्टचेतसां वपुर्विशेषेष्वधिगौरवाः क्रियाः ॥
(कुमार. ५.३१ )

विवेचन :

कठोर तप करणाऱ्या पार्वतीची परीक्षा घेण्याच्या हेतूने भगवान शंकर एका ब्रह्मचाऱ्याच्या वेषात तिच्याजवळ आले. तेव्हा पार्वनीने शंकराच्या केलेल्या आदरातिथ्याचे वर्णन करताना कवी लिहितात की, अतिथीचा सत्कार करण्यामध्ये प्रवीण असलेल्या पार्वतीने त्या ब्रह्मचाऱ्याचे अत्यंत आदराने आणि श्रद्धेने उठून स्वागत केले. जी व्यक्ती आपल्या मनाला उत्तम प्रकारे संयमित करते तिची सर्वत्र समबुद्धी असूनही विशेष व्यक्तींच्या बाबतीत त्यांची क्रिया अर्थात सत्कार इ.क्रिया अधिक गौरवपूर्ण असतात. जरी ते सर्वांच्या बाबतीत समत्वाची भावना ठेवतात. तरीही तेजस्वी व्यक्तींच्या बाबतीत त्यांची सत्कारभावना विशेष गौरवपूर्ग असते.

Th 11146

निरीक्षण :

पार्वतीच्या स्वभावाचा एक वेगळा पैलू इथे सांगितला आहे. पार्वतीला तपश्चर्येमुळे संयम आणि समबुद्धी प्राप्त झाली. तरीसुद्धा विशेष व्यक्तीच्या बाबतीत आदरसत्कार करण्याची वृत्ती सामान्य मनुष्याच्या ठिकाणी दिसून येते. त्याचा उपयोग करून या अर्थान्तरन्यासाच्या साहाय्याने पार्वतीने शंकराचा जो आदरसत्कार केला, त्याचे विशेष औचित्य इथे कवीने साधले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[४३]

---

[४३] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते - साम्ये अभिनिविष्टचेतसां वपुर्विशेषेषु अतिगौरवाः क्रिया भवन्तीति । विव. पृ.१९८ ओळ क्र. २ - ३

यदुच्यते पार्वति पापवृत्तये न रूपमित्यव्यभिचारि तद् वचः ।
तथाहि ते शीलमुदारदर्शने तपस्विनामप्युपदेशतां गतम् ॥
(कुमार. ५.३६)

विवेचन :

ब्रह्मचाऱ्याच्या वेषात आलेले भगवान शंकर पार्वतीला म्हणतात की, 'हे पार्वती ! सौंदर्य पापाचरणासाठी नसते असे जे जुन्या लोकांनी सांगितले आहे ते तुझ्याबाबतीत खरे आहे. कारण हे सुंदरी ! तुझे सुंदर आचरण तपस्विनांही उपदेश देणारे झाले आहे.'

कवीने या श्लोकात आपला विश्वास प्रकट केला आहे की, सुंदर रूप असलेली व्यक्ती पापी नसते.

निरीक्षण :

कालिदासाने इथे सौंदर्याचे प्रयोजन सांगितले आहे. सौंदर्याची फलद्रूपता भोगामध्ये नसून त्यागामध्ये आहे हे शंकराच्या मुखाने सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळींत ' सौदर्य पापाचरणासाठी नसते हे म्हणणे खरी आहे, 'हे सामान्य असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींतील' तुझे सुंदर आचरण तपस्विंनाही उपदेश देणारे आहे'. या विशेषद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

अरुणगिरीनाथ अणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश केला आहे.[४४]

प्रयुक्त-सत्कारविशेषमात्मना न मा परं संप्रतिपत्तुमर्हसि ।
यतः सतां सन्नतगात्रि संगतं मनीषिभिः साप्तपदीनमुच्यते ॥
( कुमार. ५.३९ )

विवेचन :

---

[४४] अत्र श्रु त्योपपादकत्वं प्रकृतगतमर्थादप्रकृते पर्ववस्यतीत्यर्थान्तरन्यासप्रकार एवायम् । प्रका. पृ. २०४ ओळ क्र. १६-१७.अत्र श्रु श्रु त्या प्रकृतगतमप्युपपादनमर्थादप्रकृते पर्यवस्यतीत्यर्थान्तरन्यासस्यैवायं प्रकारभेदः । विव. पृ. २०५, ओळ क्र. १७-१८.

ब्रह्मचाऱ्याच्या वेषात आलेले भगवान शंकर पार्वतीचे मनोरथ जाणण्याच्या इच्छेने तिला विचारतात की, ' विशेष रूपाने सत्कार केलेल्या मला दुसरा ( परका ) समजणे तुला उचित नाही. कारण विद्वान पुरुषांचे असे म्हणणे आहे की, सात पदांच्या (पाऊलांच्या/शब्दांच्या ) व्यवहाराने सज्जनांची मैत्री होत असते.

ब्रह्मचाऱ्याने मैत्रीची गोष्ट बोलून तिला पुढे विचारले जाणारे प्रश्न ऐकण्यासाठी तयार केले आहे.

**निरीक्षण :**

शुद्ध मैत्रीचा निकष कालिदासाने इथे वर्णन केला आहे. मैत्रीपूर्ण शब्दव्यवहार हा शुध्द मैत्रीचा निकष आहे. कालिदासाला प्रेमाइतकीच मैत्रीदेखील प्रिय आहे. पार्वतीने ब्रह्मचाऱ्याचा केलेला आदरसत्कार हा या प्रकारचे आचरण आहे असे त्याने मानले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत ' तुझ्याकडून सत्कारित झालेल्या मला परका मानू नकोस ' हे विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील ' विद्वानांचे म्हणणे असे आहे की, सात पदांच्या व्यवहाराने सज्जनांची मैत्री होते'. या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

**अलभ्यशोकाभिभवेयमाकृतिर्विमानना सुभ्रु कुतः पितुर्गृहे ।**

**पराभिमर्शो न तवास्ति कः करं प्रसारयेत् पन्नगरत्नसूचये ॥**

( कुमार ५.४३ )

**विवेचन :**

पार्वतीच्या समक्ष शंकाराकडून कामदेवाचे दहन झाले तेव्हा ती अत्यंत खिन्न झाली. जे रूपाने साध्य झाले नाही ते तपाने साध्य करावयाचे असा निश्चय करून तिने हिमालयाच्या एका शिखरावर कठोर तपश्चर्येस आरंभ केला. त्यानंतर एकदा भगवान शंकर तिची परीक्षा घेण्याच्या उद्देशाने एका ब्रह्मचाऱ्याच्या वेषात तिथे आले आणि तिला तिच्या तपाचे कारण विचारताना असे म्हटले की, ' हे सुंदर भुवया असलेल्या सुंदरी, तुझे सौंदर्य पाहून त्याचा कोण आदर करणार नाही ? आणि वडिलांच्या घरात तर तुझा अपमान होईलच कसा ? याशिवाय तुला त्रास देण्याचा ( छेडछाड करण्याचा ) प्रयत्न कोण करील ? कारण असा कोण मनुष्य आहे की जो नागाच्या फण्यावरील मणी काढण्याचा प्रयत्न करील ?

## निरीक्षण :

नागाच्या फण्याचे सौंदर्यस्थान म्हणजे मणी हे असते. परंतु त्या मण्याचे हरण कोणी करू शकत नाही, कारण त्यामध्ये जीविताला धोका संभवतो. या अनुभवाच्या आधारे कालिदासाने या अर्थान्तरन्यासात पार्वतीच्या सौदर्याचा अपमान कोणी करू शकणार नाही हे तिच्या सुंदर भुवयांच्या द्वारे सांगितले आहे. खरे सौंदर्य हे स्वसंरक्षणासाठी समर्थ असते, असे कवीला यातून सुचवावयाचे आहे.

प्रस्तुत श्लोकातील तीन पादांमध्ये भिन्न भिन्न तीन विशेषे सांगितली असून त्यांचे समर्थन श्लोकातील चौथ्या पादांतील ' नागाच्या फणावरील मणी घेण्यासाठी कोण हात घालील ' या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे.

दिवं यदि प्रार्थयसे वृथा श्रमः पितुः प्रदेशास्तव देवभूमयः ।
अथोपयन्तारमलं समाधिना न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ॥
( कुमार. ५.४५)

## विवेचन :

पार्वतीने शंकराच्या प्राप्तीसाठी कठोर तपश्चर्या सुरू केली. तेव्हा तिची परीक्षा घेण्याच्या हेतूने वेषांतर करून (ब्रह्मचाऱ्याच्या वेषात) आलेले शंकर तिला तपश्चर्येचे कारण विचारतात. तेव्हा ते म्हणाले की, ' तुला काय हवे की जे मिळविण्यासाठी तप करतेस ? जर तुला स्वर्गाची इच्छा असेल तर त्याच्यासाठी तुझा हा, तपाचा प्रयत्न व्यर्थ आहे. कारण तुझ्या पित्याचा हा सारा प्रदेश देवतांचे निवासस्थान ( स्वर्ग ) आहे. आणि जर योग्य पती मिळावा ही कामना मनात धरून तप करीत असशीत तर तेही व्यर्थ आहे कारण रत्न स्वतः स्वतःचे ग्रहण करावे म्हणून कुणाला शोधीत नसते. परंतु लोकच रत्नाला शोधतात.

## निरीक्षण :

या श्लोकात कालिदासाने पार्वतीची स्तुती केली आहे आणि तिच्या गुणांचे चीज करणारा स्वतः होऊन तिला भेटेल असे त्याला यातून सुचवावयाचे आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांमध्ये विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन शेवटच्या पादात 'न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ।' या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे.

अरूणगिरीनाथ आणि नारायण पण्डित यांनी यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.[४५]

**यथा श्रुतं वेदविदां वर त्वया जनोऽयमुच्चैःपदलङ्घनोत्सुकः ।**
**तपः किलेदं तदवाप्तिसाधनं मनोरथानामगतिर्न विद्यते ।।**

**(कुमार . ५.६४ )**

**विवेचन :**

पार्वतीच्या तपाचे कारण तिच्या मैत्रिणीकडून ऐकल्यावर ब्रह्मचाऱ्याचा वेष धारण केलेले भगवान शंकर पार्वतीला विचारतात की,' ही सांगते ते खरे आहे की ही थट्टा आहे? हे ऐकल्यावर पार्वतीने ब्रह्मचाऱ्यास जे उत्तर दिले ते या श्लोकात सांगितले आहे. पार्वती म्हणते की,' हे वेदज्ञांमध्ये श्रेष्ठ ! माझी मैत्रीण सांगते ते अगदी खरे आहे. मी त्या (शिवप्राप्तीरूपी) उच्चस्थानाची अभिलाषिणी आहे. माझी ही तपश्चर्या ते स्थान मिळविण्यासाठीच आहे. आता तुम्हा ( अधिक ) काय सांगू ? मनुष्याच्या मनोरथांना सीमा नसतात.' म्हणजेच मनुष्य इच्छा करताना हे पाहत नाही की अभिलषित वस्तू त्याच्या शक्तीच्या सीमेत आहे अथवा नाही. म्हणून मी सुद्धा आपली शक्ती आणि साधन यांना न पाहता ते उच्चपद मिळविण्याची इच्छा करीत आहे.

**निरीक्षण :**

मनोरथांना शेवट नसतो हा मनाचा धर्म कालिदासाने या श्लोकात सांगितले आहे. मनोरथ करणारी व्यक्ती आपण त्यास पात्र आहे की नाही याचा विचार न करता साधनाचा स्वीकार करतात, हे कवीने शिवपार्वती संवादातून सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला असून चैाथ्या पादात सामान्याद्वारा वैधर्म्याने त्याचे समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार निर्देश केला आहे.[४६]

---

[४५] अत्र रत्नशब्दस्य स्वजातिश्रेष्ठवाचित्वेऽर्थान्तरन्यासोऽयम . . .। प्रका. पृ. २२० ओळ क्र. ६ - ७
रत्नशब्दस्य स्वजातिश्रेष्ठवाचित्वे पुनरर्थान्तरन्यासः ।
विव. पृ. २२१, ओळ क्र. १३ -- १४
[४६] ननु कथमत्यन्तदुःसाधेऽर्थे तव तादृशो मनोरथ इतीमामाशङ्कामर्थान्तरन्यासेन परिहरति - मनोरथानां अगतिः न विद्यते इति ।
विव. पृ. २५१, ओळ क्र. ८

निवर्तयास्मादसदीप्सितान्मनः क्व तद्‌विधस्त्वं क्व च पुण्यलक्षणा ।
अपेक्ष्यते साधुजनेन वैदिकी श्मशानशूलस्य न यूपसत्क्रिया ।। ७३
( कुमार. ५.७३ )

विवेचन :

पार्वतीकडून तपश्चर्येचे कारण ऐकल्यावर तिची परीक्षा घेण्यासाठी ब्रह्मचाऱ्याने भगवान शंकाराची खूप निंदा करुन असे म्हटले की, 'हे तपस्वीनी ! (शंकराच्या चिताभस्मलेपन आदी अनेक कुलक्षणांकडे पाहता) तू या अशुभ इच्छेपासून, अर्थात शंकराला प्राप्त करण्याच्या अपवित्र इच्छेपासून, आपल्या मनाला हटव. अनेक दोषांनी युक्त शंकर कुठे आणि एक सुलक्षणा स्त्रीच्या रुपातील तू कुठे ? कारण सज्जन मनुष्य स्मशानातील लाकडाचा यज्ञीय स्तंभ बनविण्याची इच्छा करीत नाही.

निरीक्षण :

कालिदासाने या अर्थान्तरन्यासात स्मशानशूल हे विशेषण भगवान शंकरास उद्देशून वापरले आहे. स्मशानशूलाला धार्मिक महत्त्व दिले जात नाही. स्मशान हे धर्माचरणास अपवित्र मानले जाते. त्याप्रमाणे स्मशानात राहणारा शंकर पार्वतीसारख्या सुंदर धर्मशील स्त्रीला अनुरुप कसा असेल ? हे या श्लोकातून कालिदासाने ब्रह्मचाऱ्याच्या मुखाने सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

उवाच चैनं परमार्थतो हरं न वेत्सि नूनं यत एवमात्थ माम्‌ ।
अलोकसामान्यमचिन्त्यहेतुकं द्विषन्ति मन्दाश्चरितं महात्मिनाम्‌ ।।
(कुमार. ५.७५ )

विवेचन :

पार्वती भगवान शंकराच्या प्राप्तीसाठी तपश्चर्या करीत असलेल्या ठिकाणी तिची परीक्षा घेण्यासाथी ते ब्रह्मचाऱ्याच्या वेषात आले आणि तिने शंकरास पती म्हणून का वरु नये ? हे सांगत असता भगतान शंकराची खूप निंदा केली. ती ऐकून ती रागाने त्या ब्रह्मचाऱ्यास म्हणाली,' वास्तविक तुम्ही त्या शंकराला चांगल्या प्रकारे जाणत नाही

म्हणूनच मला असे सांगत आहात. मूर्ख लोक महापुरुषांच्या चरित्राशी अकारण शत्रुता बाळगतात.

**निरीक्षण :**

या श्लोकात मूर्ख लोक मोठया लोकांचा विनाकारण द्वेष करतात हे लक्षात घेऊन कालिदासाने अर्थान्तरन्यास द्वारा पार्वतीने केलेला ब्रह्मचाऱ्याच्या विधानाबद्दलचा तिरस्कार व्यक्त केला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत आलेल्या विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

अलं विवादेन यथा श्रुतस्त्वया तथाविधस्तावदशेषमस्तु सः।
ममात्र भावैकरसं मनः स्थितं न कामवृत्तिर्वचनीयमीक्षते ॥
( कुमार. ५.८२ )

**विवेचन :**

ब्रह्मचाऱ्याच्या वेषातील भगवान शंकराने पार्वतीची भगवान शंकरावरील निष्ठा पाहण्यासाठी तिच्या समोर शंकरांची भरपूर निंदा केली. ती तिला सहन न झाल्याने त्याला म्हणाली, ' आता जाऊ द्या, तुमच्यासारख्यांशी वाद घालून काय उपयोग ? तु जे काही भगवान शंकरांविषयी माहीत आहे ते जर खरेही असेल तरी माझे मन भगवान शिवांचे ठिकाणी दृढासक्त आहे. स्वतःच्या इच्छेने वागणारी ( प्रेम करणारी ) व्यक्ती निंदेला कधी भीत नाही. ( प्रेमाची निंदा ऐकू शकत नाही.)

**निरीक्षण :**

कालिदासाने या श्लोकात प्रेमाचे स्वरूप स्पष्ट केले आहे, ते असे की, कोणताही प्रेमी मनुष्य त्याच्या प्रिय व्यक्तीची कोणीही केलेली निंदा ऐकून घेत नाही. पार्वतीही या गोष्टीस अपवाद नाही.

या श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेष आले असून त्याचे समर्थन शेवटच्या पादात सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

निवार्यतामालि किमप्ययं बटुः पुनर्विवक्षुः स्फुरितोत्तराधरः ।
न केवलं यो महतोपभाषते शृणोति तस्मादपि यः स पापभाक् ॥
( कुमार. ५.८३ )

विवेचन :

ब्रह्मचाऱ्याच्या वेषातील आलेला भगवान शंकर आणखी शिवाविषयी काही सांगण्याचा प्रयत्न करीत आहे हे पाहून पार्वती आपल्या सखीला म्हणते की, ' हे सखी पहा, यांचे ओठ आता हालत ( थरथरत ) आहेत. म्हणजे हे आणखी काही सांगू इच्छितात, म्हणून तू त्यांना अडव की आता काही बोलणार नाही. कारण सज्जनांची निंदा करणारे केवळ पापाचे भागीदार होत नाहीत तर त्यांच्याबरोबर जे ती ऐकतात तेही त्या पापाचे भागीदार होतात.

निरीक्षण :

या श्लोकात सज्जनांचा गौरव केला आहे. सज्जनांची निंदा करणे व ती ऐकणे हा दुराचार आहे. या अर्थाने पार्वतीचा सद् भाव कवीने इथे वर्णन केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

कार्यकारणभावाधिष्ठित अर्थान्तरन्यासाचा प्रकार या श्लोकात संभवतो, इथे कारणद्वारा कार्याचे साधर्म्याने समर्थन केले आहे.

या श्लोकातील कल्पनेसमान कल्पना पुढील श्लोकात आढळते –

न वाच्यः परदाषो वै न श्रोतव्यः कदाचन ।
कर्णाविव पिधातव्यौ प्रस्थेयं वा ततोऽन्यतः ॥ [४७]

---

[४७] महा. १२. १३०.१२

अद्यभृत्यवनताङ्गि तवास्मि दासः
क्रीतस्तपोभिरिति वादिनि चन्द्रमौलौ ।
अह्नाय सा नियमजं क्लममुत्ससर्ज
क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ।।
( कुमार. ५.८६ )

**विवेचन :**

कुमारसंभवाच्या ५ व्या सर्गाच्या शेवटी भगवान शंकर पार्वतीच्या तपश्चर्येने अत्यंत संतुष्ट होऊन ब्रह्मचाऱ्याचा वेष सोडला आणि स्वतः मूळ रूपात प्रकट झाले. त्यानंतर ते पार्वतीस म्हणाले, ' हे पार्वती, आपल्या कठोर तपश्चर्येने तू मला खरेदी केलेस. आजपासून मी ( शिव ) तुझ्याकडून खरेदी केलेला तुझा सेवक आहे. ' भगवान शंकरांच्या या वचनाला ऐकून पार्वतीचे मन अत्यंत प्रसन्न झाले. तसेच तपापसून झालेले सारे कष्ट ती विसरली. कारण अनेक तप व कष्ट सहन केल्यानंतर जर व्यक्तीला सफलता प्राप्त झाली अर्थात आपले लक्ष्य पूर्ण झाले तर ती आपल्या सफलतेच्या प्राप्तीमुळे, लक्ष्याच्या प्राप्तीमुळे पूर्वी सहन केलेले सारे कष्ट विसरून जाते हे स्वाभाविक तथ्य आहे.

**निरीक्षण :**

क्लेश अथवा तपश्चरण हे इष्ट फलात परिणत होते. तेव्हा ते दुःखदायक असल्याचे व्यक्ती विसरून जाते हे सांगताना कवीने प्रस्तुत श्लोकात पार्वतीच्या तपाने शंकरांनी प्रसन्न होणे हे उदाहरण दिले आहे.

या श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या 'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते । ' या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

या श्लोकात नारायण पंडित आणि वल्लभदेव यांनी अर्थान्तरन्यास सूचित केला आहे. [48]

---

४८ उक्तमर्थमर्थान्तरन्यासेनोपपादयति – क्लेशः पुनः फलेन नवतां विधत्ते हि इति । विव. पृ.२८५ ओळ क्र ७ – ९.
आणखी पहा – पञ्जिका पृ. १७३ ओळ क्र. १०

तामगौरवभेदेन मुनींश्चापश्यदीश्वरः ।
स्त्रीपुमानित्यनास्थैषा वृत्तं हि महितं सताम् ॥
( कुमार.६.१२)

विवेचन :

पार्वतीच्या तपश्चर्येने प्रसन्न झालेल्या शंकरांना एकान्तामध्ये आपल्या मैत्रिणीद्वारे पार्वतीने असे सांगितले की, 'माझे पिता हिमालयच मला तुम्हाला देऊ शकतील, तेव्हा आपण तसा त्यांना निरोप द्या '. त्यानंतर ' तसेच करीन ' असे म्हणून त्यांनी सप्तर्षींचे स्मरण केले. तेव्हा अरुंधतीसह ते सर्व शंकरांसमोर प्रकट झाले. त्यावेळी शंकरांनी त्या सप्तर्षींमध्ये असलेल्या अरुंधती आणि अन्य ऋषींना समान गौरवाच्या दृष्टीने पाहिले कारण महान लोक स्त्री आणि पुरुष असा भेद करीत नाहीत, ते केवळ त्यांच्या चारित्र्याकडे पाहतात.

निरीक्षण :

शंकर हे महादेव असले तरी मनुष्य-स्वभावानुसार कालिदासाने शंकरांचा एक आदरणीय व आचरणीय गुणविशेष या अर्थान्तरन्यासद्वारा वर्णन केला आहे. श्रेष्ठ लोक आपल्याहून भिन्न अशा आदरणीय व्यक्तींचा सत्कार करताना लिंग भेदाचा विचार करीत नाहीत, हाच तो विशेष होय. शंकरांनी अरुंधतीसह सप्तर्षींचे स्वागत करताना कोणताच भेदभाव केला नाही. यातून त्यांचा मोठेपणा दाखविला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने त्याचे समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. [४९]

नारायण पंडितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सूचित केला आहे.[५०]

---

[४९] सामान्येनार्थेनोत्तरार्धगतेन पूर्वाधोपात्तस्य विशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः। टिप्पणी पृ ११, ओळ क्र. २४ - २५

[५०] अत्रार्थान्तरन्यासमाह-सतां स्त्री पुमान् इति एषा अनास्था इति । विव.पृ.13, ओळ क्र.२४

त्वत्संभावितमात्मानं बहु मन्यामहे वयम् ।
प्रायः प्रत्ययमाधत्ते स्वगुणेषूत्तमादरः ॥
( कुमार. ६.२० )

विवेचन :

पार्वतीच्या तपश्चर्येने प्रसन्न झालेल्या शंकारांनी हिमालयाकडे पार्वतीची मागणी घालण्यासाठी सप्तर्षींचे स्मरण केले. ते स्मरण करताच उपस्थित झाले. तेव्हा भगवानांनी त्यांचा उचित असा सत्कार केला. त्यावेळेस ते भगवान शंकरांना म्हणाले की, ' तुम्ही आमचा जो आदर केलात, त्यांनी आम्ही स्वतःला फार धन्य समजतो. कारण मोठया लोकांकडून सन्मान मिळाल्यानेच आपल्या गुणांच्यावर आपला विश्वास बसतो '.

निरीक्षण :

गुणांची प्रतिष्ठा गुणांच्या मान्यतेने होते, या सामान्य नियमाचा आधार घेऊन अरुंधतीसह सप्तर्षींचा सन्मान झाल्याने त्यांची प्रतिष्ठा वाढली आहे. अरुंधतीद्व.रा शंकरासाठी पार्वतीची मागणी केली जाणार आहे, यास एक वेगळा आशय प्राप्त झाला हे या अर्थान्तरन्यासाने सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. [५१]

नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[५२]

---

[५१] उत्तरार्धप्रतिपाद्यसामान्येनार्थेन विशेषार्थस्य पूर्वार्धोपात्तस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । टिप्पणी पृ १७४, ओळ क्र. २४ – २५

[५२] अत्रार्थान्तरन्यासमाहुः – उत्तमादरः स्वगुणेषु प्रायः प्रत्ययं आधत्ते । विव. पृ. २१ – २२

तामस्मदर्थे युष्माभिर्याचितव्यो हिमालयः ।
विक्रियायै न कल्पन्ते संबन्धाः सदनुष्ठिताः ।।
(कुमार.६.२९)

विवेचन :

पार्वतीच्या तपाने प्रसन्न झालेल्या शंकरांना एकांतामध्ये आपल्या मैत्रिणीद्वारा पार्वतीने असे सांगितले की, ' माझे पिता हिमालयच मला तुम्हाला देऊ शकतील. तेव्हा आपण तसा त्यांना निरोप द्या. त्यानंतर ' तसेच करीन ' असे म्हणून त्यांनी सप्तर्षींचे स्मरण केले. तेव्हा अरुंधतीसहच ते सर्व शंकरासमोर प्रकट झाले. भगवान शंकारांनी त्यांचा आदर सत्कार केल्यानंतर त्यांना पार्वतीशी विवाह करण्याचे कारण सांगून त्यांना म्हणाले की, ' आपण माझ्या वतीने हिमालयाकडे जाऊन पार्वतीसीठी मागणी घाला. कारण सज्जनांनी जुळवून आणलेल्या संबंधात कोणत्याही प्रकारचे विकार उत्पन्न होत नाहीत.'

निरीक्षण :

शंकराने अरुंधतीसह सप्तर्षींना हिमालयाकडे पार्वतीची मागणी करण्यासाठी पाठविले याचे कारण कालिदासाने अर्थान्तरन्यासद्वारा या श्लोकात स्पष्ट केले आहे. म्हणजेच त्यांनी घातलेल्या मागणीला वेगळी प्रतिष्ठा प्राप्त होते. त्यामुळे पार्वती व शंकर यांचा संबंध जुळून येणार होता.त्यात कोणत्याही प्रकारच्या विघ्नांचा अवकाश राहणार नाही, हीच गोष्ट या ठिकाणी अर्थान्तरन्यासातून सुचविली आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्यउक्तिद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

नारायण पण्डितांनी प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे [५३]

आर्याप्यरुन्धती तत्र व्यापारं कर्तुमर्हति ।
प्रायेणैवंविधे कार्ये पुरन्ध्रीणां प्रगल्भता ।।
( कुमार. ६.३२ )

विवेचन :

हिमालय पर्वताकडे पार्वतीसाठी मागणी घालण्यासाठी भगवान शंकरांनी सप्तर्षींचे स्मरण केले. ते तत्काळ उपस्थित झाले. त्यांचा उचित आदरातिथ्य केल्यावर भगवान शंकरांनी त्यांना बोलावण्याचे कारण स्पष्ट करून असे सांगितले की, ' या कार्यामध्ये आर्या

अरुंधतीनेच मदत करावी. कारण बहुधा अशा प्रकारच्या विवाह आदी कार्यांमध्ये कुटुम्बिनी स्त्रिया अधिक कुशल असतात.'

**निरीक्षण :**

विवाहासारख्या कौटुंबिक घटनांमध्ये स्त्रियांना विशेष महत्त्व असते. शिव-पार्वतीचा विवाह जुळवून आणण्यात अरुंधतीने महत्त्वाची भूमिका पार पाडली आहे. तिच्या व्यक्तिमत्त्वाद्वारा कालिदासाने स्त्रीने विवाह जुळविण्याचे महत्त्व इथे नमूद केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन 'प्रायेणैवंविधे कार्ये पुरन्ध्रीणां प्रगल्भता ।' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केलेले असल्याने इथे अर्थान्तरन्यास आहे.[५४]

> **शैलः संपूर्णकामोऽपि मेनामुखमुदैक्षत ।**
> **प्रायेण गृहिणीनेत्राः कन्यार्थे हि कुटुम्बिनः ।**
>
> ( कुमार. ६.८५ )

**विवेचन :**

पर्वतराज हिमालयाकडे भगवान शंकराच्या इच्छेनुसार सप्तर्षींनी जाऊन त्यास असे सांगितले की, भगवान शंकर हे पार्वतीसाठी योग्य वर असून त्यांना तुम्ही पार्वतीस द्यावे. तेव्हा जरी हिमालयाने पार्वतीला भगवान शंकर यांना देण्याचा निश्चय केला होता तरीही अंगिरा ऋषींचे म्हणणे ऐकल्यावर त्याने आपली पत्नी मेना हिच्याकडे ( साभिप्राय ) पाहिले. त्यांना तिची इच्छा काय हे जाणून घ्यावयाचे होते. कारण बहुतेक वेळा गृहस्थ लोक कन्यादानाच्या बाबतीत आपल्या स्त्रीला मुख्य मानतात. म्हणजे तिचे मत विचारात घेतात.

**निरीक्षण :**

कालिदासाने विवाह जुळविण्यातील स्त्रियांचे कौशल्य आणि त्यांचा मान यांची महत्त्वाची भूमिका या अर्थान्तरन्यासद्वारा स्पष्ट केली आहे.

प्रस्तुत श्लोकात ' जरी पूर्वीपासून हिमालयास शंकर हिचा पती होईल हे ठाऊक होते तरी देखील त्यांनी पत्नीकडे पाहणे ' या विशेषाचा निर्देश आहे. त्याचे समर्थन दुसऱ्या

---

[५3] अर्थान्तरन्यासाश्चायम् । विव. पृ. 33, ओळ क्र. ११ - १२

ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[५५]

मेने मेनापि तत्सर्वं पत्युः कार्यमभीप्सितम् ।
भवन्त्यव्यभिचारिण्यो भर्तुरिष्टे पतिव्रताः ।

( कुमार. ६.८६ )*

**विवेचन :**

अंगिरा ऋषींनी हिमालयाजवळ भगवान शंकरांसाठी पार्वतीची मागणी घालताच हिमालयाने आपली पत्नी मेना हिच्याकडे पाहिले. तेव्हा मेना हिनेही आपल्या पतीच्या इच्छेस अनुकूल अशी शंकराबरोबर होणाऱ्या पार्वतीच्या विवाहास संमती दिली. कारण सती स्त्रिया आपल्या पतीच्या (इच्छे-) विरुद्ध कोणतेही कार्य करीत नाहीत.

**निरीक्षण :**

कालिदासाने इथे पतिव्रता स्त्रियांचा धर्म प्रतिपादन केला आहे. पतिव्रता स्त्री नेहमीच पतीचे मनोगत जाणून आचरण करते. इष्टसिद्धीसाठी पतिपत्नींचे एकमत आवश्यक असते. मेनेने हिमालयाचे मनोगत जाणून पार्वती व शिव यांच्या विवाहास अनुकूलता दर्शविली. कवीने इथे एक प्रेमळ दाम्पत्य वर्णिले असून दाम्पत्यधर्मही सांगितला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[५६]

---

[५४] एवंविधे कार्ये ( विवाहादौ ) प्राचुर्येण स्त्रीणां चातुर्यं भवतीति सामान्यार्थेन पूर्वार्धगतविशेषार्थसमर्थनादर्थान्तरन्यासोऽलङ्कारः ।
टिप्पणी-पृ.१७९, ओळ क्र. ५ -६

[५५] अत्रोत्तरार्धगतसामान्यार्थः पूर्वार्धगतविशेषार्थस्य समर्थक इति सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः ।
टिप्पणी - पृ. १९७, ओळ क्र.२३ - २४

* हा श्लोक काही हस्तलिखितात आढळत नाही.

[५६] अत्रापि पूर्ववदर्थान्तरन्यासः । टिप्पणी पृ. १९७, ओळ क्र. ३२

आत्मानमालोक्य च शोभमानमादर्शबिम्बे स्तिमितायताक्षी।
हरोपयाने त्वरिता बभूव स्त्रीणां प्रियालोकफलो हि वेषः ॥

( कुमार. ७.२२ )

**विवेचन :**

पार्वतीचा विवाह भगवान शंकरांबरोबर निश्चित झाल्यावर शुभ तिथीवर विवाह करण्याचे ठरले. तेव्हा तिच्या सुंदर शरीरावर विविध प्रसाधने लावून तिला सजविले. तेव्हा प्रसाधनांनी आलंकृत सजलेले रूप आरशात पाहून विशाल नेत्रांची पार्वती, अशा तोऱ्यात उभी राहिली की मी किती सुंदर आहे !. ' आणि तिचे मन शंकरांना भेटण्यासाठी विह्वल झाले. कारण स्त्रियांच्या शृंगाराची सफलता त्यास प्रियकराने पाहण्यात असते.

**निरीक्षण :**

स्त्रियांच्या शृंगाराची परिपूर्णता पतिप्राप्तीमध्ये असते. ही गोष्ट प्रस्तुत अर्थान्तरन्यासाने पार्वतीच्या सौंदर्याला वाढविणाऱ्या शृंगाराची फलद्रूपता शंकरप्राप्तीत सामावली आहे, हे कालिदासाने वर्णन केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन पादांत विशेष असून त्याचे समर्थन चौथ्या पादात आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[५७]

नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[५८]

अशाच प्रकारची कल्पना कालिदासाने पुढील ठिकाणी मांडली आहेः-प्रियेषु सौभाग्यफला हि चारुता । [५९]

तस्यानुमेने भगवान् विमन्युर्व्यापारमात्मन्यपि सायकानाम् ।
काले प्रयुक्ता खलु कार्यविद्‌भिर्विज्ञापनाभर्तुषु सिद्धिमेति ॥

( कुमार. ७.९३ )

**विवेचन :**

शिवपार्वतीच्या विवाहानंतर इंद्रादी देवतांनी भगवान शंकरांना प्रार्थना केली की, ' आता मदनाच्या शापाची मुदत संपली आहे.' म्हणून पुन्हा शरीर दान देऊन त्यास आपली सेवा करण्याची संधी द्या, पार्वतीशी विवाह झाल्याने प्रसन्न चित्त झालेल्या शंकरांनी

---

[५७] अत्र तुर्यपादगतसामान्येन पादत्रयगतविशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः। टिप्पणी - पृ. २१५, ओळ क्र. ४ - ५

[५८] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते - स्त्रीणां वेषः प्रियालोकफलः हि इति.। विव. पृ १२3 ओळ क्र. ९

[५९] कुमार. ५.१ पृ. ९८

देवतांच्या प्रार्थनेचा स्वीकार करून मदनाला आपल्यावर बाण सोडण्याची अनुमती दिली. बरोबरच आहे. जो चतुर सेवक समय पाहून स्वामीला प्रार्थना करतो तो आवश्य सफल होतो.

**निरीक्षण :**

सेवकाची सेवा आणि त्याच्या सेवेचे फल हे त्याच्या चतुराईवर अवलंबून असते. ही चतुराई म्हणजेच त्याचे समयोचित आचरण. सेवकाने नेहमी स्वामीची अनुकूलता – प्रतिकूलता पाहून आचरण करावे हा सेवाधर्म या अर्थान्तरन्यासद्वारा कालिदासाने सांगितला आहे. या सेवाधर्माप्रमाणे मदनाने भगवान शंकरांची उचित काळ पाहून सेवा करण्याची वेळ आली आहे हे सूचित केले आहे.

इथे पूर्वार्धात आलेल्या विशेषार्थाचे उत्तरार्धातील सामान्यार्थाद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[६०]

नारायण पण्डित नामक टीकाकाराने या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[६१]

नीलकण्ठपरिभुक्तयौवनां तां विलोक्य जननी समाश्वसन् ।
भर्तृवल्लभतया हि मानसी मातुरस्यति शुचं वधूजनः ॥

( कुमार. ८.१२ )

**विवेचन :**

शिव–पार्वतीच्या विवाहानंतर दोघांनी एकांतात क्रीडा केली. पार्वतीमाता मेना शंकराद्वारा यौवनाचा उपभोग घेतलेल्या कन्या पार्वतीला पाहून अत्यंत समाधानी झाली. कारण कन्या नववधू झाल्यानंतर पतीचे प्रेम मिळाल्यावरच मातेच्या मनात उत्पन्न झालेली शंका दूर होते.

**निरीक्षण :**

---

६० अत्रोत्तरार्धगतसामान्यार्थेन पूर्वार्धगतविशेषार्थस्य समर्थनादर्थान्तरन्यासः । टिप्पणी – पृ.२४१, ओळ . ६ – ७

या श्लोकात कालिदासाने मेनेच्या अन्तःकरणाचा स्वभाव वर्णन केला आहे. आपली मुलगी सासरी गेल्यावर देखील आईचे मन चिंताग्रस्त असते परंतु तिला पतिप्रेम मिळाल्याचे पाहून तिचे मन चिन्तामुक्त होते. हा भाव लक्षात घेऊन कालिदासाने मेना पार्वतीस पतिप्रेम मिळल्याचे पाहून चिन्तामुक्त झाली याचे वर्णन इथे केले आहे. याठिकाणी मेनेचे अन्तःकरण कन्यावत्सल असल्याचे दिसून येते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[६२]

प्रस्तुत श्लोकात नारायण पण्डिताने अर्थान्तन्यासाचा निर्देश केला आहे. [६३]

खं प्रसुप्तमिव संस्थिते रवौ तेजसो महत ईदृशी गतिः ।
तत् प्रकाशयति यावद् गंमीलनाय खलु तावत् श्च्युतम् ॥
(कुमार. ८.४३)

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात कवीने भगवान सूर्याचे वर्णन केले आहे. सूर्य अस्ताला गेल्यावर सारे आकाश प्रकाशहीन झाले की जणू ते झोपले आहे. तेजस्वी लोकांची गती अशी असते की, ते जिथे जातात तेथे प्रकाशित करतात आणि जिथून जातात तिथे अंधकार निर्माण करतात.

निरीक्षण :

महान व्यक्ती जिथे जातात तिथे चैतन्य प्रकाश देतात आणि ते जिथून जातात व जिथे नसतात तिथे जग अचेतनवत अथवा अंधारात बुडते ही गोष्ट या अर्थान्तरन्यासद्वारा कवीने सांगितली आहे.

---

[६१] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते - कालविद् भिः काले भर्तृषु प्रयुक्ता विज्ञापना सिद्धिं एति खलु इति । विव. पृ. २०७, ओळ क्र. ८ - ९

[६२] सामान्यैकविशेषण समर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । संजी. पृ.२४९, ओळ क्र. २०-२१

[६३] उक्तमर्थनर्थान्तरन्यासेन समर्थयते - वधूजनः भर्तृवल्लभतया हि मातुः मानसीं शुच्म अस्यति इति । विव. पृ. २२८, ओळ क्र. १७-१८

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रस्तुत श्लोकात नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यासाचा उल्लेख केला आहे. [६४]

संध्यायाप्यनुगतं रवेर्वपुर्वन्धमस्तशिखरे समर्पितम् ।
येन पूर्वमुदये पुरस्कृता नानुयास्यति कथं तमापदि ।।

( कुमार ८.४४ )

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोकात संध्येचे वर्णन करताना कवी लिहितो, ज्या संध्येने प्रातःकाली सूर्योदयापूर्वी येऊन सूर्याचे स्वागत केले होते. अर्थात सुखाचे वेळी साथ दिली होती. तेव्हा आता विपत्तीच्या ( पतनाच्या ) वेळी ती त्याला कसे सोडू शकत होती. म्हणून तीसुद्धा त्याच्या पाठोपाठ चालू लागली. (त्याचे अनुकरण केले )

**निरीक्षण :**

पतीच्या सुखदुःखात त्याची स्त्री सामील होते. हा मनुष्य जीवनातील अनुभवाचा आधार घेऊन अर्थान्तरन्यासद्वारा निसर्ग जीवनातील विशेष व्यक्त केला आहे. मात्र या श्लोकात मनुष्य जीवनातील गुण हा विशेष घेऊन निसर्गातील घटनांचा अर्थ मानवी दृष्टिकोनातून लावला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे.

या कल्पनेसारखी कल्पना संस्कृत साहित्यात इतरत्रही आढळते. जसे, –

अनुचरति शशाङ्कं राहुदोषेऽपि तारा
पतति च वनवृक्षे याति भूमिं लता च ।
त्यजति न च करेणुः पङ्कलग्नं गजेन्द्रं
व्रजतु चरतु धर्मं भर्तृनाथा हि नार्यः ।। [६५]

---

[६४] उक्तमर्थमर्थान्तरन्यासेन समर्थयते – महतः तेजसः गतिः ईदृशी इति । विव. पृ. २६७, ओळ क्र. ६ – ७

[६५] प्रतिमा १.२५ पृ.२६२

शुद्धमाविलमवस्थितं चलं वक्रमार्जवगुणान्वितं च यत् ।
सर्वमेव तमसा समीकृतं धिङ् महत्त्वमसतां हृतान्तरम् ॥
( कुमार.८.५७ )

विवेचन :

या श्लोकात अंधकाराचे वर्णन आले आहे. भगवान शंकर पार्वतीला सांगतात, ' हे सुंदरी, पहा की या अंधकाराने स्वच्छ-मलिन, चल-अचल, सरळ-वाकडया इ. अनेक गुणांनी युक्त असलेल्या सर्व वस्तूंना एकसारखे केले आहे. ' म्हणजे अंधकार वस्तूच्या स्वरूपाचे भान होऊ देत नाही. ते पुढे असे म्हणतात, ' जे चांगल्या - वाईट गुणांमध्ये फरक करीत नाही अशा दुष्टांच्या महानतेचा धिक्कार असो'.

निरीक्षण :

कवीने इथे दुष्टाच्या स्वभावाचा एक पैलू लक्षात घेतला आहे. तो असा की, दुष्ट लोकांना चांगला-वाईट याचा विवेक नसतो. ही गोष्ट या अर्थान्तरन्यासाने स्पष्ट केली आहे. निसर्गामध्ये अंधकाराचे साम्राज्य पसरले असता कोणत्याच वस्तूत फरक कळून येत नाही. सर्व वस्तू अंधकाराने दिसेनाशा होतात. इथे अंधकारास दुष्टाची उपमा दिली आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[६६]

अरुणगिरीनाथ आणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[६७]

रक्तभावमपहाय चन्द्रमा जात एष परिशुद्धमण्डलः।
विक्रिया न खलु कालदोषजा निर्मलप्रकृतिषु स्थिरोदया ॥
( कुमार. ८.६५ )

विवेचन :

भगवान शंकर पार्वतीला सृष्टिसौंदर्य दाखवीत असता ते तिला चन्द्रमाचे वर्णन करून सांगतात. ते असे - हा चंद्र हळूहळू स्वतःची लालिमा सोडून उज्ज्वल होत आहे. त्याचे कारण असे की, निर्मळ अन्तःकरणाच्या लोकांना काही कारणाने जरी विपत्ती आली तरी ती

---

[६६] अत्र सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । सीताः पृ. २६९ ओळ क्र. १४-१५

फार काळ टिकत नाही. अर्थात चंद्र हा स्वभावतः उज्ज्वल आहे पण संध्याकाळी त्याच्यावर दिसणारी लालिमा फार काळ न टिकता ती हळूहळू नाहीशी होऊन तो उज्ज्वल दिसू लागतो.

**निरीक्षण :**

निसर्गाचे वर्णन करताना कालिदास मनुष्य स्वभावाचा त्याच्यावर आरोप करतो. कोणत्याही कारणाने विपत्ती आली तरी स्थिर अंतःकरण असलेल्या व्यक्तीच्या मनात विकार उत्पन्न होत नाहीत. ही गोष्ट चंद्राच्या उदाहरणाने स्पष्ट केली आहे. चंद्राला प्राप्त झालेली लालिमा फार काळ टिकत नाही. ती थोडयावेळाने नाहीशी होऊन तो उजळ दिसू लागतो.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील, 'निर्मळ अन्तःकरणाच्या व्यक्तीला फार काळ विपत्ती सहन करावी लागत नाही' या सामान्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

टीकाकारांपैकी मल्लिनाथ आणि सीताराम यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दर्शविला आहे. [६८]

उन्नतेषु शशिनः प्रभा स्थिता निम्नसंश्रयपरं निशातमः ।
नूनमात्मसदृशी प्रकल्पिता वेधसेह गुणदोषयोर्गतिः ॥

( कुमार ८.६६ )

**विवेचन :**

भगवान शंकर व पार्वती विहार करीत असता शंकर रात्रीचे वर्णन करताना म्हणतात, ' हे पार्वती! पहा. चंद्रोदय झाल्यानंतर रात्रीच्या वेळी उंच ठिकाणी चांदणीचा प्रकाश जमा झाला आहे. परंतु पृथ्वीच्या खालच्या भागात अजूनही रात्रीचा अंधार जशाचा तसाच आहे. वस्तुतः ब्रह्मदेवाने गुण व दोषांची स्थिती अशी निर्माण केली आहे की, गुण उच्चस्थान ग्रहण करतात आणि दोष खाली जातात.'

---

[६७] अतः श्लेषाविद्धोऽयमर्थान्तरन्यासः । प्रका. पृ.२८३ ओळ क्र. ५ -६ अत्र श्लेषानुविद्धमर्थान्तरन्यासमाह - असतां महत्त्वं हन्तान्तरं धिग् इति । विव. पृ. २८३, ओळ क्र. १७-१८

६८ तत्र प्रथमार्थे समासोक्तिरलङ्कारस्तस्यार्थान्तरन्यासेनाङ्गाङ्गिभावेन सङ्करः । संजी. पृ. २७१, ओळ क्र. २१ - २२ सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासः । सीता. पृ.२७१, ओळ क्र. २६

निरीक्षण :

कालिदासाने निसर्गवर्णनाच्या दाखल्याने अर्थान्तरन्यासद्वारा ब्रह्मदेवाच्या सृष्टीतील एक विशेष इथे नमुद केला आहे. तो असा की, गुणांना नेहमी उच्च स्थान असते व दोषांना नेहमी नीच स्थन असते.

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत विशेषाचे निर्देशन आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

नारायण पंण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास आहे असे म्हटले आहे. [६९]

स शंकरस्तामिति जातवेदोविज्ञापनामर्थकरीं निशम्य।
अभूत् प्रसन्नः परितोषयन्ति गीर्भिर्गिरीशा रुधिराभिरीशन् ॥
( कुमार. ९.१२ )

विवेचन :

भगवान शंकर व पार्वती एकांतात असताना त्या ठिकाणी पक्ष्याचे रूप घेऊन अग्निदेवाने तिथे प्रवेश केला. ही गोष्ट भगवान शंकरांच्या ध्यानात येताच त्यांनी रागाने त्याच्यावर भुवया चढविल्या. तेव्हा आपल्या मूळ रुपात प्रकट होऊन अग्निदेव शंकरांची स्तुती करून म्हणाला की, ' तारकासुराकडून पराभूत झालेले देवतागण आपल्या भेटीची प्रतीक्षा करीत आहेत. त्यांच्या इच्छेनुसार मी आपणाकडे आलो आहे. तेव्हा मला आपण क्षमा करावी. भगवान शंकरही अग्निदेवाने केलेली यथार्थ प्रार्थना ऐकून प्रसन्न झाले. कारण बोलण्यात चतुर असलेला सेवक आपल्या गोड बोलण्याने स्वामीला प्रसन्न करून घेतो.'

निरीक्षण :

या श्लोकात कालिदासाने सेवकाचा सेवाधर्म सांगितला आहे. त्याने नेहमी गोड व चतुर बोलून स्वामीची प्रसन्नता संपादन करीत कार्य सिद्ध करावयाचे असते, हे साधर्म्य अग्निदेवाचे ठिकाणी असल्याचे वर्णन करून कवीने कथानकाची गती वाढविली आहे.

---
[६९] अर्थान्तरन्यासप्रकारश्चायम् । विव. पृ. २९४ ओळ क्र. ४

प्रस्तुत श्लोकात ' अग्निदेवाच्या प्रार्थनेने शिवाने प्रसन्न होणे हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन ' चतुर सेवकाने गोड बोलून स्वामीची मर्जी संपादन करणे ' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्तान्तरन्यास अलंकार आहे.

कनकलाल ठक्कर यांनी प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास असल्याचे सांगितले आहे.[७०]

वचोभिर्मधुरैः सान्त्वैर्विनम्रेण मया स्तुतः।
प्रीतिमानभवद्देवः स्तोत्रं कस्य न तुष्टये ॥
(कुमार. १०.९ )

विवेचन :

अग्निदेवाने देवराज इंद्राला असे सांगितले की, 'शिवपार्वती एकांतात क्रीडा करीत असलेल्या ठिकाणी मी कबुतराच्या वेषात गेलो असता भगवान शंकारांनी मला ओळखले आणि त्यांच्या कपाळावरील अग्नीने माझे दहन करण्याचा निश्चय केला. तेव्हा मी विनम्रभावाने अभिप्राययुक्त मधुर- वाणीने स्तुती केली, त्यामुळे ते संतुष्ट झाले. कारण स्वतःची प्रशंसा कुणाला आवडत नाही ? म्हणजे प्राणिमात्राचा स्वभाव असा आहे की, त्याला स्वतःची स्तुती खरी वा खोटी असो ती त्यास आनंदित करते.

निरीक्षण :

कोणतीही व्यक्ती स्तुतीप्रिय असते. मनुष्य स्वभावाच्या विशेषाला देव देखील अपवाद नाहीत. हे या श्लोकात कालिदासाने सांगितले आहे. मनुष्य व देव यांच्यातील हे साधर्म्य लक्षात घेऊन कवीने अग्निदेवाच्या स्तुतीने शंकर संतुष्ट झाले असे वर्णन केले आहे

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळींत ' भगवान शंकरांनी अग्नीने केलेली स्तुती ऐकून प्रसन्न होणे ' हे विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या ' सगळ्यांना आत्मस्तुती आवडते ' या सामान्य उक्तिद्वारा वैधर्म्याने केले आहे, त्यामुळे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[७१]

या श्लोकात कवीने मानवी स्वभाव ( Human Psychology ) चांगल्या प्रकारे सांगितला आहे.

त्वयि जुह्वति होतारो हवींषि ध्वस्तकल्मषाः ।

---

[७०] उत्तरार्थगतसामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. २८९, ओळ क्र. २ – 3

भुञ्जन्ति स्वर्गमेकस्त्वं स्वर्गप्राप्तौ हि कारणम् ॥

(कुमार. १०.१८)

विवेचन :

देवराज इंद्र अग्निदेवास म्हणाले की, ' तुझ्या ठिकाणी हवन करणारे होतृगण सर्व पापांपासून सुटका मिळवून स्वर्गलोकाला जातात, कारण स्वर्गप्राप्तीला सहाय्यक केवळ तू आहेस '.

निरीक्षण :

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे. त्यांच्या मताप्रमाणे इथे पहिल्या तीन पादांतील सामान्यार्थाचे चौथ्या चरणामध्ये आलेल्या विशेषाने समर्थन केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[७२] वास्तवतः इथे कोणत्याही प्रकारची अलंकारगत रमणीयता नसल्याने प्रस्तुत श्लोक अलंकारपदास योग्य नाही असे म्हणता येईल.

हवींषि मन्त्रपूतानि हुताश त्वयि जुह्वतः ।
तपस्विनस्तपःसिद्धिं यान्ति त्वं तपसां प्रभुः ॥

( कुमार.१०.१९ )

विवेचन :

देवराज इंद्र अग्निदेवाला असे म्हणाले की, ' हे अग्निदेव, तुझ्या ठिकाणी मंत्रद्वारा पवित्र केलेली हवन सामग्रीची आहुती देणारे तपस्वी आपल्या तपाचे संपूर्ण फळ मिलवितात, कारण तूच तपाची एकमेव देवता आहेस '.

निरीक्षण :

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[७3]त्यांच्या मते पहिल्या तीन पादांतील सामान्यार्थाचे चौथ्या चरणामध्ये आलेल्या विशेषद्वारा समर्थज केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. वास्तविक या श्लोकातही कोणत्याही

---

[७१] अत्र सामान्येन विशेषसमर्थन रूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । सीता. पृ. ३०८, ओळ क्र. २६

[७२] पादत्रयगतसामान्यार्थस्य तुर्यपादगतविशेषार्थेन समर्थनादर्थान्तरन्यासः शिशु. पृ. ३११, ओळ क्र. ३१-३२

[७3] अत्रापि पूर्ववदार्थान्तरन्यासः । शिशु. पृ.३१२, ओळ क्र. १०

प्रकारची अलंकारगत रमणीयता नसल्याने प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार मानण्याची गरज नाही असे वाटते.

गङ्गां तद् गच्छ मा कार्षीर्विलम्बं हव्यवाहन ।
कार्येष्ववश्यकार्येषु सिद्धये क्षिप्रकारिता ॥
( कुमार. १०.२५)

विवेचन :

अग्निदेवाने भगवान शंकाराकडून प्राप्त झालेले वीर्य त्यास धारण करताना त्रास होऊ लागला. त्याचे शरीर संतप्त झाले. त्यापासून सुटका फक्त गंगेकडूनच होऊ शकेल म्हणून इंद्रदेवाने त्यास असे सांगितले की, ' आता उशीर न लावता गंगेकडे जा आणि तिथे पाण्यात बुडी मार. कारण जे कार्य पूर्ण करण्याचा निश्चय केला असेल त्याच्या सफलतेसाठी घाई करणे अत्यंत आवश्यक असते '.

निरीक्षण :

कोणतेही कार्य सफल व्हावे अशी इच्छा असेल तर दिरंगाई चालत नाही. हा नेहमीचा अनुभव लक्षात घेऊन कालिदासाने अर्थान्तरन्यासद्वारा अग्निदेवाला होणारा त्रास दूर झाला पाहिजे आणि तो त्वरित दूर झाला पाहिजे असे इथे सुचविले आहे. कारण त्यास होणारा त्रास कार्यसिद्धीत अडथळा होऊ शकतो. म्हणून तो टाळण्यासाठी इंद्राने त्यास गंगेकडे त्वरेने जाण्यास प्रवृत्त केले. शिवपुत्राच्या जन्मात कोणतेही विघ्न येऊ नये यासाठी इंद्राने अग्नीस त्वरा करण्यास सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

अथाभ्युपेतस्तस्तापार्तो निमज्जानलः किल ।
विपदा परिभूताः किं व्यवस्यन्ति विलम्बितुम् ॥
( कुमार. १०.३५)

विवेचन :

इंद्रदेवाने केलेल्या सूचनेप्रमाणे भगवान शंकाराच्या तेजामुळे शरीर जळत असता अग्निदेव गंगेजवळ पोहेचताच त्वरेने गंगेत बुडी दिली. कारण संकटात पडलेल्या व्यक्तीजवळ थोडा वेळ देखील थांबण्याचे धैर्य नसते.

**निरीक्षण :**

संकटात सापडलेली व्यक्ती त्यातून बाहेर पडण्यासाठी अजिबात धीर धरत नाही हा व्यक्तीचा स्वभावविशेष इथे कालिदासाने नमूद केला आहे. अग्नीदेवाने गंगेचा आश्रय घेणे हे या स्वभावास अनुसरून योग्यच आहे असे म्हणता येईल.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

सीताराम नामक टीकाकाराने या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[७४]

अथ दिव्यां नदीं देवीमभ्यनन्दन् विलोक्य ताः ।
कं नाभिमन्दयत्येषा दृष्टा पीयूषवाहिनी ॥

( कुमार १०.४८ )

**विवेचन :**

भगवान शंकाराच्या दिव्य वीर्याने संतप्त झालेल्या अग्नीने गंगाप्रवाहात स्नान केले आणि ते वीर्य गंगेत समर्पित केले. त्या वीर्यलाभाने गंगा अत्यंत प्रसन्न झाली. त्या पवित्र गंगेला पाहून सहा कृतिका अत्यंत आनंदित झाल्या कारण अशा अमृतमयी गंगेला पाहून कोण बरे आनंदित होणार नाही ?

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात ' कृत्तिकांनी गंगेला पाहून आनंदित होणे ' या विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास असल्याचे कनकलाल ठक्कर यांनी सांगितले आहे.[७५] म्हणून प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार येथे लक्षात घेतला आहे. यात काव्यगत रमणीयता नसल्याने अर्थान्तरन्यास अलंकार नाही. हा श्लोक केवळ गंगेच्या स्तुतिपर आहे.

---

[७४] उत्तरार्धगतसामान्यार्थेन पूर्वार्थगतविशेषार्थस्य समर्थनात् सामान्येन विशेष समर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः ॥ शिशु. पृ.३१८, ओळ क्र. २३-२५

७५ अर्थान्तरं न्यस्यति - एषेति । शिशु. पृ. ३२३, ओळ क्र. १४-१५

स्वर्गापगापावककृत्तिकादीन्कृताञ्जलीनामतोऽपिभूयः।
हित्वोत्सुका तं सुतमाससाद पुत्रोत्सवे माद्यति को न हर्षात् ॥
( कुमार. ११.१७ )

विवेचन :

भगवान शंकराकडून कुमाराच्या उत्पत्तिविषयी माहिती मिळाल्यावर पार्वती अत्यंत आनंदाने त्या मुलाजवळ निघाली. त्यावेळी गंगा, अग्निदेव आणि कृत्तिका यांनी हात जोडून मस्तक लववून पार्वतीला वंदन केले. परंतु त्यांच्याकडे लक्ष न देता पार्वती अत्यंत प्रेमाने त्या मुलाजवळ पोहोचली. पुत्रजन्माच्या आनंदात कोणती माता आनंदाने मत्त होत नाही ?

निरीक्षण :

या श्लोकात पुत्रजन्मामुळे मातेला प्राप्त होणारा आनंदाचा क्षण लक्षात घेऊन अर्थान्तरन्यास अलंकाराने मानवी स्वभावाचा आरोप करुन पार्वतीला झालेला पुत्र-जन्माचा आनंद वर्णन केला आहे. मानवांप्रमाणे देवतांनाही सुखदुःखाचा अनुभव प्राप्त होतो. हे कवीने या श्लोकातून सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात ' पार्वतीने गंगा, अग्निदेव इत्यादींकडे दुर्लक्ष करणे ' हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन शेवटी आलेल्या सामान्य निर्देशद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकावर टीका लिहिताना अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[७६]

तमीक्षमाणा क्षणमी क्षणानां सहस्रमाप्तं विनेमेषमैच्छत् ।
सा नन्दनालोकनमङ्गलेषु क्षणं क्षणं तृप्यति कस्य चेतः ? ॥
( कुमार. ११.२० )

विवेचन :

पुत्र पाप्तीमुळे झालेल्या आनंदाने पार्वतीचे नेत्र भरुन गेल्याने समोर असलेले बालक क्षणमात्र तिला दिसले नाही. त्यानंतर तिने त्यास आपल्या मांडीवर घेतले. तेव्हा

[७६] तुर्यपादगतसामान्यार्थेन पादत्रयगत विशेवषार्थसमर्थनादर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३३६ ओळ क्र. १०

आश्चर्यकारक सुखानुभूतीच्या आनंदाने तिचे नेत्र प्रफुल्लित झाले, त्यामुळे त्यांतून आनंदाश्रू वाहू लागले आणि तिच्या हृदयात अलौकिक वात्सल्यभावना निर्माण झाली. यावेळी तिला ते बालक दिसू लागले. त्याला तिने क्षणभर एकटक पाहिले परंतु तिची तृप्ती झाली नाही. म्हणून त्यावेळी तिच्या मनात अशी भावना जागृत झाली की जर मला हजार नेत्र मिळाले तर याला पोटभर पाहिले असते. पुत्रदर्शनाच्या पवित्र उत्सवाने कोणाचे हृदय तृप्त झाले आहे ?

**निरीक्षण :**

या श्लोकात कालिदासाने पुत्रजन्मामुळे झालेला आनंद रेखाटला आहे. घरी पुत्राचा जन्म झाला की सर्वांनाच आनंद होतो. हा सामान्य नियम लक्षात घेऊन कवीने अर्थान्तरन्यासद्वारा पार्वतीला झालेला आनंद वर्णन केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार असल्याचे सांगितले आहे. [७७]

ततः कुमारः समुदां निदानैः स बाललीलाचरितैर्विचित्रैः।
गिरीशगौर्योर्हृदयं जहार मुदे न हृद्या किमु बालकेलि ॥
( कुमार. ११.४० )

**विवेचन :**

कुमारजन्माचा उत्सव शिव-पार्वतींनी विशेष रुपात साजरा केला. त्यानंतर बालककुमाराने स्वतःच्या आनंददायक बाललीलांनी शंकर व पार्वनी यांच्या हृदयास आनंदित केले. कारण बाललीला कोणाच्या मनाला मोहवीत नाहीत ?

**निरीक्षण :**

बाललीला मातापित्यांना आनंदित करतात हा मानवाच्या नेहमीच्या सामान्यजीवनातील अनुभव लक्षात घेऊन कालिदासाने या श्लोकात शिवपार्वतीला कुमारकार्तिकेयाच्या बाललीलांनी होणारा आनंद वर्णन केला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या पादात सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे. [७८]

---

[७७] उत्तरार्थगतसामान्यार्थतः पूर्वार्धगतविशेषार्थसमर्थनादर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. 33७, ओळ क्र. १९-२०
[७८] तुर्यपादगतसामान्यार्थेन पादत्रगतविशेषार्थसमर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. 3४६, ओळ क्र. ४-५

तथाविधं शैलसुताधिनाथं पुलोमपुत्रीदयितो निरीक्ष्य ।
आसीत्क्षणं क्षोभपरो नु कस्य मनो न हि क्षुभ्यति धामधाम्नि ॥
( कुमार. १२.२२ )

**विवेचन :**

कैलास पर्वतावर रत्नजडित सभा-भवनामध्ये अनेक गणांमध्ये बसलेले भगवान शंकर इंद्रदेवाने आपल्या हजार नेत्रांनी पाहिले. तेथील वैभव पाहून इंद्राचे डोळे दिपले. याचे वर्णन करताना कवी लिहितात की, ' अशा प्रकारच्या भगवान शंकराला पाहून इंद्राचे चित्त थोडया वेळाकरिता चंचल बनले. कारण इतके तेजस्वी वैभव पाहून कोणाचे मन चंचल होणार नाही.'

**निरीक्षण :**

सामान्यतः असे दिसते की दुसऱ्याचे वैभव हे इतरांना विस्मयकारक असते. याचा आधार घेऊन कालिदासाने या अर्थान्तरन्यास अलंकारद्वारा शंकराचे वैभव पाहून इंद्र विस्मित झाल्याचे वर्णन केले आहे.

श्लोकाच्या पहिल्या तीन पादांतील विशेषाचे चतुर्थ पादामधील सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[७९]

सीताराम नामक टीकाकारनेही या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार असल्याचे सांगितले आहे.[८०]

गणोपनीते प्रभुणोपदिष्टः शुभासने हेममये पुरस्तात् ।
प्रापोपविश्य प्रमुदं सुरेन्द्रः प्रभुप्रसादो हि मुदे न कस्ये ॥
(कुमार. १२.३२ )

---

[७९] तुर्यपादगतसामान्यार्थेन पादत्रयगतविशेषार्थस्य समर्थनात्सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासाऽळङ्कारः । शिशु. पृ ३६१, ओळ क्र. १८-१९

[८०] ननु महेश्वरदर्शनेन कथं व्याकुलं आसीदित्यर्थान्तरं हि यतः धामधाम्नि तेजोराशौ कस्य मनश्चेतो न क्षुभ्यति क्षोभं प्राप्तोति। सीता. पृ. ३६१, ओळ क्र. १२-१४

विवेचन :

जेव्हा भगवान शंकर कुमार कार्तिकेयाचा विद्याभ्यास पाहत होते तेव्हा समग्र देवतांसह इंद्रदेव तिथे आले आणि त्यांनी भगवान शंकरांना वंदन केले असता इंद्रदेव शंकराच्या आज्ञेवरुन एका गणाने आणलेल्या सुवर्णाच्या सुंदर आसनावर शिवाच्या समोर स्थानापन्न होऊन आनंदित झाले. कारण स्वामींच्या कृपेने कोणाला आनंद होत नाही ?

निरीक्षण :

सेवकाचा आनंद स्वामींच्या कृपेवर अवलंबून असतो. या अनुभवाच्या आधारे कालिदासाने इथे अर्थान्तरन्यासाची योजना केली आहे. भगवान शंकराने केलेल्या आदरसत्काराने इंद्र आनंदित झाला यांचे वर्णन करुन कवीने स्वामींची कृपा हाच आनंद आणि स्वामी–सेवक भावातील मर्म इथे सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या तीन पादांत विशेष आहे आणि त्याचे समर्थन चौथ्या पादात आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[८१]-

पराभवं तस्य महासुरस्य निषेद्धुमेकोऽमलंभविष्णुः ।
दावानलप्लोषविपत्तिमन्यो महाम्बुदात्किं हरते वनानाम् ॥
(कुमार. १२.४१ )

विवेचन :

तारकासुराने केलेल्या पराभवाने तेज नष्ट झालेल्या इंद्रादि प्रमुख देवतांना पाहून करुणेने आर्द्र हृदयाच्या भगवान शंकरांनी त्यांचे सान्त्वन करीत म्हटले, ' त्या महान राक्षसाकडून होणाऱ्या आपल्या पराजयाला टाळण्याची शक्ती केवळ माझ्यामध्ये आहे. कारण दावाग्नीने जळणाऱ्या जंगलाला विझविण्याची शक्ती मेघाशिवाय कोणाकडे असणार?

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतला सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

प्रस्तुत श्लोकात कनकलाल ठक्कर यांनी अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे. [८२]

तती गिरीषस्य गिरां विरामे जगाद लब्धेऽवसरे सुरेन्द्रः ।
भवन्ति वाचोऽवसरे प्रयुक्ता ध्रुवं फलाविष्टमहोदयाय ॥

( कुमार. १२.४३ )

विवेचन :

भगवान शंकरांनी तारकासुरापासून इंद्रादि देवतांना अभयदान दिल्यावर त्यांच्या चेहऱ्यावर पुन्हा टवटवी आली. भगवान शंकराचे बोलणे संपल्यावर योग्य समयी इंद्र त्यांना म्हणाला, ' कारण योग्य वेळ पाहून सांगितलेली गोष्ट निश्चतच सफल आणि उन्नती मिळवून देणारी असते.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात योग्य काळवेळ पाहून केलेली गोष्ट ही निश्चितच सफल व प्रगतीकारक असते, हा अनुभव कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा प्रतिपादन केला आहे. भगवान शंकरांनी इंद्राला अभयवचन दिल्यानंतर इष्टप्राप्ती होणारच हे सूचित केले आहे.

श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास आहे. कनकलाल ठक्कर यांनी इथे हाच अलंकार असल्याचे सूचित केले आहे.[८३]

शासनं पशुपतेः स कुमारः स्वीचकार शिरसावनतेन ।
सर्वथैव पितृभक्तिरतानामेष एव परमः खलु धर्मः ॥

( कुमार. १२.५८ )

विवेचन :

इंद्रदेवाने भगवान शंकरांना तारकासुराच्या अत्याचाराचे कथन केले. ते ऐकून भगवान शंकर क्रोधित होऊन इंद्रदेव व इतर देवतांना म्हणाले, ' मी आणि माझा पुत्र तुमचे कार्य सिद्ध करण्यासाठी तयार आहोत. मी समाधीमध्ये नेहमी मग्न असे पण तारकासुरासारख्या शत्रूचा वध करणाऱ्या पुत्राचा जन्म व्हावा यासाठी पार्वतीशी विवाह केला. तेव्हा आपल्या कार्यास योग्य अशा या कुमारास आपण सेनापती बनवून तारकासुराचा वध करा. त्यामुळे सर्व देवतांसह इंद्रदेव पुन्हा स्वर्गाचा आनंद प्राप्त करील'. त्यानंतर भगवान शिव आपल्या मुलाला म्हणाले, ' हे बाळा ! आता तू जा आणि युद्धात

---

[८१] तुर्यपादगतसामान्यार्थेन पादत्रयगत विशेषसमर्थनात्सामान्येन विशेष समर्थमनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३६५, ओळ क्र. २८-२९

[८२] उत्तरार्थगतसामान्यार्थतः पूर्वार्धगतविशेषस्य समर्थनान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३६९, ओळ क्र. २८-२९

[८३] अर्थान्तरन्यासासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३७०, ओळ क्र. २४-२५

देवतांचा शत्रू तारकासुर याचा वध कर.' कुमार कार्तिकेयानेही भगवान शंकारांच्या आज्ञेचा मस्तक लववून स्वीकार केला. कारण पितृभक्त पुत्राचा धर्म हाच आहे की त्याने नेहमी पित्याच्या आज्ञेचे पालन करावे.

**निरीक्षण :**

कालिदासाने प्रस्तुत श्लोकात पितृभक्तीची महती सांगितली आहे. कवीने अर्थान्तरन्यासाच्या माध्यमातून पुत्राचा पितृविषयक धर्म प्रतिपादन केला आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या श्लोकात आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[८४]

असुरयुद्धविधौ विबुधेश्वरे पशुपतौ वदतीति तमात्मजम् ।
गिरिजया मुमुदे सुतविक्रमे सति न नन्दति का खलु वीरसूः ॥
( कुमार. १२.५९ )

**विवेचन :**

भगवान शंकर कुमार कार्तिकेयास असे म्हणाले की, ' हे बाळा ! आता तू जा आणि युद्धात देवतांचा शत्रू तारकासुर याचा वध कर .' कुमार कार्तिकेयानेही भगवान शंकराच्या आज्ञेचा मस्तक लववून स्वीकार केला. त्यानंतर देवाधिदेव शंकर कार्तिकेयाला राक्षसांशी युद्ध करण्याच्या पद्धती सांगू लागले. त्यावेळी पार्वती अत्यंत आनंदित झाली. कारण अशी कोणती वीरमाता असेल की जी आपल्या पुत्राच्या पराक्रमावर प्रसन्न होणार नाही? '

**निरीक्षण :**

कालिदासाने या श्लोकात कुमार कार्तिकेय पराक्रम गाजविणार या कल्पनेने पार्वतीला झालेला आनंद वर्णन केला आहे. पुत्राच्या पराक्रमावर कोणतीही वीरमाता आनंदित होईल, हा सामान्य अनुभव इथे कथन केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने त्याचे समर्थन केल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

कनकलाल ठक्कर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[८५]

---

[८४] अर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३७६, ओळ क्र. २९-३०
८५. [अर्थान्त]तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ३७७, ओळ क्र. १६

सुरपरिवृढः प्रौढं वीरं कुमारमुमापते-
र्बलवदमरारातिस्त्रीणां दृगञ्जनभञ्जनम् ।
जगदभयदं सद्यः प्राप्य प्रमोदपरोऽभव-
दभिमतेऽभिमते पूर्णे को वा मदा न हि माद्यति ॥

( कुमार.१२.६० )

विवेचन :

भगवान शंकारांनी कुमार कार्तिकेयास देवसेनेचे सेनाधिपत्य स्वीकारण्यास सांगितले. तेव्हा बलवान राक्षसांच्या स्त्रियांच्या डोळ्यांतील काजळ पुसणारा तसेच जगताला निर्भयतेचे वरदान देणाऱ्या अत्यंत पराक्रमी कुमारास मिळवून देवराज इंद्र अत्यंत आनंदित झाला. कारण आपल्या अभिलाषांची पूर्तता झाल्यावर आनंदाने मत्त होणार नाही असा कोण बरे असेल ?

निरीक्षण :

अभिलाषापूर्ती झाल्यावर होणाऱ्या आनंदाने व्यक्ती बेहोष होते, हा सामान्य अनुभव कालिदासाने इथे अर्थान्तरन्यासातून सूचित केला आहे. देवसेनेचे सेनापतित्व कार्तिकेयाने स्वीकारल्यावर देवांचा राजा इंद्रास असाच आनंद झाला होता.

प्रस्तुत श्लोकात ' इथे इंद्राने आदंदित होणे ', हे विशेष असून त्याचे समर्थन श्लोकाच्या दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकात सीताराम आणि कनकलाल ठक्कर यांनी अर्थान्तरन्यास आहे असे सांगितले आहे.[८६]

अरिष्टमाशङ्क्य विपाकदारुणं निवार्यमाणोऽपि बुधैर्महासुर ।
पुरः प्रतस्थे महतां वृथा भवेदन्सदग्रहान्धस्य हितोपदेशनम् ॥

( कुमार. १५.२६ )

विवेचन :

तारकासुर कार्तिकेयाबरोबर जेव्हा युद्धास निघण्याची तयारी करीत होता तेव्हा त्यास अरिष्टसूचक अपशकून झाले. ते पाहून अनिष्टाच्या भीतीने विद्वान मंडळींनी त्यास युद्धास

जाण्यापासून अडविले. परंतु त्याने त्यांचा सल्ला मानला नाही. तो पुढेच गेला. कारण दुराग्रहाने आंधळे झालेल्या लोकांना मोठया लोकांचा हितकारक उपदेशही व्यर्थ होतो. म्हणजेच ते कोणाचेही म्हणणे ऐकत नाहीत.

**निरीक्षण :**

महाकवी कालिदासाने या श्लोकात दुराग्रही माणसाचा स्वभाव वर्णन केला आहे. त्यांच्या पुढे ध्येय प्राप्ती असते. ती पूर्ण झाल्यास होणाऱ्या दुष्परिणामास ते पाहत नाहीत. एवढेच नव्हे तर त्यांना हिताच्या चार गोष्टी सांगितल्या तर त्यांना रुचत नाहीत. ह्या सामान्य अनुभवाचा आधार घेऊन या अर्थान्तरन्यासद्वारा तारकासुराचा स्वभाव वर्णिला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[८७]

गुहोऽसुरे षड्दिनजातमात्रको निदाघधामेव निशातमोभरैः ।
विषह्यते नाभिमुखो हि संगरे कुतस्त्वया तस्य समं विरोधिता ॥
(कुमार १५.३४ )

**विवेचन :**

कुमार कार्तिकेयाबरोबर युद्ध करण्यास निघालेल्या तारकासुरास त्याने कुमाराबरोबर युद्ध करु नये हे देववाणीने सांगितले. देववाणी त्यास म्हणाली की, ' हे गर्विष्ठ तारका ! तू आपल्या प्रचंड बाहुबलाच्या अभिमानात कार्तिकेयाबरोबर युद्ध करण्यास जाऊ नको. ज्याप्रमाणे रात्रीचा घनदाट अंधार सूर्यासमोर टिकत नाही, त्याप्रमाणे केवळ सहा दिवसांच्या कुमार कार्तिकेयांसमोर युद्धामध्ये समग्र राक्षसही टिकू शकणार नाहीत. मग त्याच्याबरोबर तू लढू शकशील काय ? '

**निरीक्षण :**

सूर्य घनदाट अंधाराचा नाश करतो या निसर्गातील घटनेचा आधार घेऊन कालिदासाने अर्थान्तरन्यासाची योजना केली आहे. या अलंकारातून कुमार कार्तिकेयाचे सामर्थ्य सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार आहे असे वाटत नाही. पण कनकलाल ठक्कर यांनी यात अर्थान्तरन्यास अलंकार सूचित केला आहे.[८८]

---

८६. अत्र सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । सीता. पृ. ३७७, ओळ क्र. २८-२९.शिशु. पृ. ३७८, ओळ क्र. १०

[८७] सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । शिशु. पृ. ४४३, ओळ क्र. ८

[८८] अत्रोपमाऽर्थान्तरयोः संसृष्टिः । शिशु. पृ. ४४७, ओळ क्र. ११

# प्रकरण चौथे

# - : रघुवंशातील अर्थान्तरन्यास : -

महाकवी कालिदासाचे ' रघुवंश ' हे संस्कृत साहित्यामध्ये सर्वात महत्त्वाचे काव्य आहे. यांमध्ये दिलीप राजापासून अग्निवर्ण राजापर्यंतच्या सर्व रघुवंशीय राजांची वर्णने आली आहेत. कवीने या काव्याच्या सौंदर्यवृद्धीसाठी अलंकाराचा सर्वत्र वापर केला आहे. या काव्यात १९ सर्ग असून १५६८ श्लोक आहेत. या सर्वात ५६ श्लोकांत अर्थान्तरन्यासाचा प्रयोग आपणांस आढळतो. या अलंकाराचे निरीक्षण केले असता असे दिसून येते की सामान्याद्वारा विशेषाचे समर्थन हा प्रकार फार आढळतो. त्यांमध्ये साधर्म्यपर समर्थनाची ४८ उदाहरणे असून वैधर्म्यपर समर्थनाची ८ उदाहरणे आहेत. या व इतर सर्व उदाहरणांचे या प्रकरणात क्रमशः विवेचन केले आहे. हे करताना पुढील टीकांचा वापर करण्यात आला आहे.

मल्लिनाथांची संजीवनी, नारायण पण्डितांची पदार्थदीपिका, अरुणगिरीनाथांची प्रकाशिका, हेमाद्रिंची रघुवंशदर्पण टीका आणि जीनसेनाचार्यांची टीका या सर्व टीकांचा यथोचित वापर केला आहे. त्या त्या प्रसंगी संबंधित टीकाकारांचा अभिप्रायही नोंदविला आहे. आता रघुवंशातील प्रत्येक अर्थान्तरन्यासाच्या उदाहरणांची चर्चा करु.

तं सन्तः श्रोतुमर्हन्ति सदसद् व्यक्तिहेतवः ।
हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुध्दिः श्यामिकापि वा ॥

( रघु. १.१०)

**विवेचन :**

रघुवंश महाकाव्याच्या सुरुवातीस काव्याचा आरंभ करण्यापूर्वी महाकवी कालिदास लिहितात की, माझे हे काव्य चांगल्या-वाईटाची निवड करण्यास समर्थ असलेल्या विद्वानांनी ऐकावे. कारण सोने अग्नीत तापविल्यानेच कसास उतरते. अर्थात अग्निद्वारा परीक्षा झाल्यानंतरच सोने खरे की खोटे याचे ज्ञान होते.

**निरीक्षण :**

कालिदासाचा अर्थान्तरन्यास हा आवडता अलंकार असला पाहिजे, असे त्याच्या या आरंभीच्या श्लोकामध्ये योजलेल्या अलंकारावरुन दिसून येते. विद्वानांनी कालिदासाच्या उपमांना नावाजून त्याच्या आधारे कालिदासाचे श्रेष्ठ स्थान मानले. परंतु कालिदासाच्या अंतरंगामध्ये अर्थान्तरन्यासाला श्रेष्ठ स्थान होते, असे या श्लोकातील त्याच्या उपयोगावरुन दिसून येते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

ईप्सितं तदवज्ञानाद् विद्धि सार्गलमात्मनः ।
प्रतिबध्नाति हि श्रेयः पूज्यपूजाव्यतिक्रमः ॥
( रघु.१.७९ )

**विवेचन :**

राजा दिलीप संतान नसल्यामुळे वसिष्ठ महर्षींकडे जातो. तेव्हा ते राजाला संतान न होण्याचे कारण सांगतात की, राजाकडून पूर्वी कामधेनूची अवज्ञा झाली होती . म्हणून तिने त्याला शाप दिल्यामुळे राजाला संतान होत नाही. या श्लोकात ऋषी सांगतात की, तिच्या अवज्ञेमुळेच राजाच्या मनोकामनेला प्रतिबंध झाला आहे कारण पूजनीय व्यक्तींच्या पूजेत भंग झाला असता कल्याणाला प्रतिबंध होतो.

**निरीक्षण :**

आपल्या उद्दिष्टांची प्राप्ती होत नाही तेव्हा काही तरी अडचणी असतात. त्या दृष्ट व अदृष्ट असतात. मनुष्य अनवधानाने, अज्ञानामुळे अपराध करीत असतो. ते कधी तरी अंतराय बनतात. ते समजून घेऊन ते दूर करण्याचे प्रयत्न करणे जरुरीचे असते. दिलीपराजाला संतान प्राप्तीमध्ये कामधेनूची अवज्ञा अंतराय झाली. मोठया व्यक्तींची अवज्ञा करणे हे घातक असते, हे कालिदासाने इथे सुचविले आहे.

प्रस्तुत श्लोकात ' राजाच्या मनोकामनेला प्रतिबंध म्हणजे त्याला संतान न होणे ' हे विशेष आहे. त्याचे समर्थन ' पूजनीय व्यक्तींच्या पूजेत भंग झाला असता कल्याणाला प्रतिबंध होतो ' या सामान्य विधानाद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

व्रताय तेनानुचरेण धेनोर्न्यषेधि शेषोऽप्यनुयायिवर्गः।
न चान्यतस्तस्य शरीररक्षा स्ववीर्यगुप्ता हि मनोः प्रसूतिः ॥
( रघु. २.४ )

**विवेचन :**

वसिष्ठ महर्षींकडून निःसंतान होण्याचे कारण समजल्यावर राजा दिलीपाने कामधेनूची कन्या नंदिनीची सेवा करण्याचा निश्चय केला आणि त्या व्रताच्या पालनाकरिता धेनूच्या मागोमाग राहणाऱ्या त्या राजाने आपल्या शिल्लक राहिलेल्या

सेवकांनाही रजा दिली. त्याला स्वतःचे रक्षण करण्याकरिता बाहेरच्या मदतीची आवश्यकता नव्हती कारण स्वपराक्रमाने संरक्षण करणे हा तर मनूच्या वंशजांचा गुण आहे.

**निरीक्षण :**

कालिदासाने अर्थान्तरन्यासाने स्वसंरक्षण स्वपराक्रमाने करणे हा गुण सांगून मनुवंशजाचा गौरव करुन दिलीपाने स्वपराक्रमाने स्वतःचे रक्षण करण्याचा घेतलेला निर्णयही त्याला अपवाद नाही असे सूचित केले आहे. तसेच अर्थान्तरन्यास योजून कालिदासाने राजा दिलीपाचा पराक्रमविशेष सांगितला आहे.

या श्लोकात शेवटच्या पंक्तीत सामान्याचा निर्देश आहे. येथे सामान्य विधानाद्वारा पहिल्या पंक्तीतील विशेष म्हणजे राजाने सेवकांना सुट्टी देणे आणि स्वसंरक्षणासाठी तयार होणे याचे साधर्म्याने समर्थन केले असल्याने या ठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रस्तुत श्लोकात नारायण पण्डितांनी अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.[१]

वत्सोत्सुकापि स्तिमिता सपर्यां प्रत्यग्रहीत् सेति ननन्दतुस्तौ ।
भक्त्योपपन्नेषु हि तद्विधानां प्रसादचिह्नानि पुरःफलानि ॥
( रघु. २.२२ )

**विवेचन :**

राजा दिलीप राणी सुदक्षिणेसह कुलगुरु वसिष्ठांच्या सूचनेप्रमाणे संतानप्राप्तीसाठी कामधेनूची कालवड असलेल्या नंदिनीची सेवा करु लागला. तेव्हा ती नंदिनी ( गाय ) आपल्या वासराकरिता उत्सुक असूनही स्तब्ध उभी राहून पूजेचा स्वीकार करीत असे. त्यामुळे त्या दोघांना आनंद होत असे कारण भक्तियुक्त असलेल्यांना तिच्यासारख्यांची प्रसादचिन्हे भावी कार्यसिद्धीची निदर्शक असतात.

**निरीक्षण :**

राजा दिलीपाने केलेली सेवा स्वीकारताना नंदिनीने त्याच्या भक्तियुक्त अन्तःकरणाचा मान राखून आपल्या वासरालाही दूर ठेवले. अशा भक्तियुक्त सेवेची स्वीकृती ही कार्यसिद्धीला कारण होते ही बाब कालिदासाने या अर्थान्तरन्यासाने दाखविली आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष निर्देशिले असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

---

[१] न हि मनुकूलजातानामात्मरक्षणे परापेक्षेत्यर्थान्तरन्यासः । पदा. पृ. ६९, ओळ क्र. १६

अलं महीपाल तव श्रमेण प्रयुक्तमप्यस्त्रमितो वृथा स्यात् ।
न पादपोन्मूलनशक्ति रहः शिलोच्चये मूर्च्छति मारुतस्य ।।
( रघु. २.३४ )

**विवेचन :**

वसिष्ठ मुनींच्या आज्ञेप्रमाणे दिलीप राजा आपल्या राणीसह नंदिनीची सेवा करु लागला. एकवीस दिवस सेवा घेतल्यावर बाविसाव्या दिवशी नंदिनीच्या मनात राजाच्या भक्तीची कसोटी पाहवी असे आले व त्याप्रमाणे तिने एक ' माव ' रचली. राजा सृष्टिसौंदर्य पाहण्यात गर्क आहे हे पाहून गाय एका अंधाऱ्या गुहेत शिरली व तिथे एका सिंहाने तिच्यावर झडप घातली. तेव्हा त्या गाईने मोठ्याने हंबरडा फोडला. तो ऐकून राजा भानावर आला तेव्हा त्यास असे दिसले की एका सिंहाने गाईवर झडप घातली आहे. त्याने त्याला शिक्षा करण्यासाठी आपल्या बाणाला हात घातला असता बाणांच्या बुडाशी बोटे चिकटल्यामुळे निश्चल राहिला. तेव्हा तो रागाने जळफळू लागला असता सिंह त्याला म्हणाला – ' हे राजा ! कशाला हे श्रम घेतोस ? पुरे कर, माझ्यावर अस्त्र सोडले तरी ते फुकट जाईल. अरे, झाडे उन्मळून टाकण्याची शक्ती असलेल्या वायूचा वेग पर्वतावर ( त्यास हलविण्यास ) समर्थ होत नाही.

**निरीक्षण :**

निसर्गातील घटनेच्या साहाय्याने अर्थान्तरन्यासद्वारा कवीने सिंहाच्या तुलनेने दिलीपाचे असामर्थ्य वर्णन केले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

हे एक अर्थान्तरन्यासाचे सुंदर उदाहरण आहे.

स त्वं निवर्तस्व विहाय लज्जां गुरोर्भवान् दर्शितशिष्यभक्तिः ।
शस्त्रेण रक्ष्यं यदशक्यरक्षं न तद् यशः शस्त्रभृतां क्षिणोति ।।
(रघु. २.४० )

**विवेचन :**

सिहाने नंदिनीवर झडप घातली असता राजा दिलीपाने त्यास मारण्याचा प्रयत्न केला असता तो निष्फळ ठरला. त्यावेळी सिंह त्यास म्हणाला, ' हे राजा, तू खंत न करता परत जा, मी गाईला मारुन माझे पारणे करणार आहे. भुकेलेल्या माझी तृप्ती व्हावी यासाठी परमेश्वरानेच जिची मरणवेळ ठरविली आहे, अशा या गाईच्या रुधिराने माझे क्षुधाशमन

होईल. म्हणून तू हिचा विचार न करता परत जा. तू गुरुंच्या ठिकाणी योग्य शिष्यभक्ती दाखविली आहेस. अरे, जिथे रक्षावयाची वस्तू शस्त्राने रक्षण करणे शक्य नसते तिथे शस्त्र धारण करणाऱ्याच्या यशाला कमीपणा येत नाही.

निरीक्षण :

दिलीप राजा नंदिनीचे रक्षण शस्त्राने करण्याचा प्रयत्न करतो परंतु काही बाबतीत शस्त्रसुद्धा निरुपयोगी ठरतात. हे अर्थान्तरन्यासाने कालिदासाने सांगितले आहे

प्रस्तुत श्लोकात पहिलल्या ओळींत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्य विधानाद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

तद् रक्ष कल्याणपरम्पराणां भोक्तारमूर्जस्वलमात्मदेहम् ।
महीतलस्पर्शनमात्रभिन्नमृद्धं हि राज्यं पदमैन्द्रमाहुः ॥
( रघु. २.५० )

विवेचन :

राजा दिलीपाने नंदिनी गाईचा विचार न करता तिला सिंहाने खाऊ द्यावी , हे सांगताना सिंह राजाला म्हणाला, ' हे राजा, जगाचे एकछत्री राज्य, तरुण वय आणि सुंदर वय या सर्वांचा एका गाईसाठी त्याग करणे मूर्खपणाचे आहे. तुला जर प्राणिमात्रांविषयी खरोखरच अनुकंपा वाटत असेल तर तू आपल्या नाशाने केवळ एका गाईचे कल्याण साधशील. पण तू जिवंत राहिला तर प्रजेचे निरंतर संकटापासून रक्षण करशील. या गाईच्या बदल्यात कोट्यधी गाई गुरुंना देऊन त्यांचा राग नाहीसा करणे शक्य आहे. म्हणून कल्याण परंपरेचा भोक्ता व सामर्थ्यसंपन्न अशा ह्या आपल्या देहाचे रक्षण कर. अरे, समृद्ध असे राज्य येथे भूतलावर आहे एवढाच फरक बाकी ते इंद्रपदच आहे असे म्हटले जाते '.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात दिलीप राजाचे ऐहिक ऐश्वर्य सांगितले आहे. दिलीपाच्या राज्याची तुलना इंद्राच्या राज्याशी करून त्यास साजेसे भोग त्याने भोगावेत असे या अर्थान्तरन्यासद्वारा कालिदासाने सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत आलेल्या ' तू तुझ्या देहाचे रक्षण कर ' हे विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या ' तुझे राज्य म्हणजे भूतलावरील जणू इंद्रपदच आहे '. या सामान्य विधानाद्वारा साधर्म्याने केले आहे.

या श्लोकात रामचंद्र शुक्ल यांनी अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[२] पण यात काही आलंकारिक सौंदर्य नसल्याने इथे अलंकार मानण्याची आवश्यकता नाही, असे वाटते.

भवानपीद परवानवैति महान् हि यत्नस्तव देवदारौ ।
स्थातुं नियोक्तुर्नहि शक्यमग्रे विनाश्य रक्ष्यं स्वयमक्षतेन ।।
( रघु. २.५६ )

**विवेचन :**

वसिष्ठ मुनींच्या आज्ञेप्रमाणे दिलीप राजा आपल्या राणीसह नंदिनीची सेवा करीत असता बाविसाव्या दिवशी नंदिनीच्या मनात राजाच्या भक्तीची कसोटी पाहवी असे आले व तिने एक ' माव ' रचली. त्या नुसार एका सिंहाने नंदिनीवर झडप घातली. तिने हंबरडा फोडताच राजाने त्यास शिक्षा करण्यासाठी आपल्या बाणाला हात घातला. पण त्या ठिकाणी हात चिकटून राहिला. तेव्हा राजा रागाने जळफळू लागला असता सिंह त्याचेकडे पाहून हसू लागला. त्यावेळी राजाची मनःस्थिती चमत्कारिक झाली.राजा अशा स्थितीत असता सिंहाने त्यास आपला इतिहास निवेदन करून असे सांगितले की या गाईवर मला आजची पारणा करावयाची आहे. तेव्हा राजा त्याला म्हणाला की, ' माझ्या देहाचे मोल देऊन या गाईला सोडविले पाहिजे आणि दुसरे असे की, तू देवदार वृक्षाचे मोठया तत्परतेने रक्षण करतोस. तेव्हा तूही परतन्त्र आहेस आणि म्हणून रक्षणास दिलेली वस्तू गमवून आपला देह सांभाळून आपल्या स्वामीसमोर उभे राहणे कितपत शक्य आहे हे तुझ्या सहज लक्षात येईल '.

**निरीक्षण :**

या श्लोकात अर्थान्तरन्यास द्वारा कवीने सेवकाचा धर्म कठीण असतो याचे वर्णन केले आहे. वसिष्ठ ऋषींच्या आश्रमातील नंदिनी नामक गाईचे रक्षण करण्याची जबाबदारी राजा दिलीपाकडे होती. त्यामुळे तो सेवाधर्म म्हणून स्वतःचा देहसुद्धा अर्पण करून तिचे रक्षण करण्यास तयार झाला. त्याचा परमोच्च सेवाभाव या अर्थान्तरन्यासाने सांगितला आहे.

या श्लोकात अर्थान्तरन्यासध्वनी आहे. ' राखणीची वस्तू गमावून स्वामीसमोर उभे राहणे अयोग्य आहे ? ' या सामान्य उक्तिद्वारा पूर्वी निर्देश केलेले विशेष म्हणजे 'सिंहाने नंदिनीस न मारणे अथवा राजाद्वारा नंदिनीच्या रक्षणासाठी असमर्थ ठरणे ' या विशेषाचे समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

[२] रामचंद्र शुक्ल - रघुवंशम् - सर्ग २ पृष्ठ ८१

रक्षणासाठी दिलेल्या वस्तूचे रक्षण करणे कठीण असते ही कल्पना भासाच्या स्वप्नवासवदत्तम् नामक नाटकात आली आहे.

दुःखं न्यासस्य रक्षणम् ।[3]

किमप्यहिंस्यस्तव चेन्मतोऽहं यशःशरीरे भव मे दयालुः ।
एकान्तविध्वंसिषु मद्विधानां पिण्डष्वनास्थ खलु भौक्तिकेषु ॥
( रघु. २.५७ )

विवेचन :

राजा दिलीपाने सिंहाच्या तावडीतून नंदिनीची सुटका करण्यासाठी विनंती करताना असे म्हटले की, ' तू अवध्य आहेस असे तुझे मत असेल तर निदान माझ्या ' कीर्ती ' रूप शरीरावर दया कर, कारण माझ्या सारख्यांना ह्या नाशीवंत पंचभूतात्मक देहाची तितकीशी किंमत वाटत नाही.'

निरीक्षण :

राजा दिलीपाची व्यक्तिरेखा रेखाटत असताना कालिदासाने असे म्हटले आहे की, तो कीर्तिरूपी शरीराला भौतिक देहापेक्षा श्रेष्ठ मानतो. भगवान श्रीकृष्णांनी देखील भगवद्गीतेत असे म्हटले आहे की,

सम्भावितस्य चाकीर्तिमरणादतिरिच्यते ।[४]

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

संबन्धमाभाषणपूर्वमाहुर्वृत्तःस नौ संगतयोर्वनान्ते ।
तद् भूतनाथानग नार्हसि त्वं सम्बन्धिनो मे प्रणयं विहन्तुम् ॥
( रघु.२.५८)

---

[3] स्वप्न.. १.१० पृ..६

[४] गीता अ. २ श्लोक क्र. ३४ पृ. ५८

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोकात सिंहाला नंदिनीस ठार करण्यापासून परावृत्त करण्यासाठी राजा दिलीप त्यास म्हणाला की, ' संभाषणाने मैत्री जडते असे म्हणतात. त्या दृष्टीने पाहता या वनात एकत्र आलेल्या आपल्या दोघांची मैत्री घडून आली आहे. म्हणूनच हे शंकर-किंकरा ! माझा मित्र बनलेल्या तू माझी प्रार्थना झिडकारू नकोस.'

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात मैत्रीचा विशेष सांगितला आहे. दिलीप राजा आणि सिंह यांच्या संभाषणातून राजाच्या मते त्यांची मैत्री प्रस्थापित होते. या मैत्रीच्या बंधनाने राजा सिंहाला अडवू इच्छित होता असे कालिदासाने सूचित केले आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीत सामान्य आले असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या विशेषद्वारा वैधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

**दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे ।**
**बभूव सर्वं शुभशंसि तत्क्षणं भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम् ॥**

( रघु. ३.१४ )

**विवेचन :**

राजा दिलीपाच्या सुदक्षिणा राणीला पुत्रलाभ झाला त्यावेळी कवीला दिसलेल्या परिसराचे वर्णन कवीने इथे केले आहे. ते असे - पुत्राचा जन्म झाला त्या क्षणी दिशा प्रसन्न झाल्या, वारे आल्हादकारक वाहू लागले, अग्नी आपल्या ज्वाला दक्षिणेकडे करून हविर्भागाचा स्वीकार करू लागला, अशी सर्व शुभसूचक चिन्हे होऊ लागली, बरोबरच आहे - अशा प्रकारच्या लोकांचा जन्म लोकांच्या अभ्युदयार्थच असतो.

**निरीक्षण :**

महान व्यक्तींचा जन्म हा लोकांच्या कल्याणासाठी असतो हे कालिदासाने शुभसूचक चिन्हांच्या वर्णनाने या श्लोकात सांगितले आहे. दिशा प्रसन्न झाल्या, वारे आल्हादकारक वाहू लागले आणि अग्नी दक्षिणेकडे ज्वाला करून हविर्भागाचा स्वीकार करू लागला हे निसर्गात बदल घडून आले. अर्थात दिलीपाच्या पुत्रजन्माचा आनंद कालिदासाने निसर्गाच्या वृत्तींमध्ये प्रतिबिंबित झालेल्या बदलाने या अर्थान्तरन्यासद्वारा सूचित केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला असून ' भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम् ' या चतुर्थ पादातील सामान्याद्वारा त्याचे साधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सूचित केला आहे.[५]

या श्लोकातील कल्पनेसारखी कल्पना अन्य संस्कृत वाङ्मयातही पहावयास मिळतात. उदा.

प्रसन्नदिक् पांसुविविक्तवातं शङ्खस्वनानन्तरपुष्पवृष्टि ।
शरीरिणां स्थावरजङ्गमानां सुखाय तज्जन्मदिनं बभूव ।। [६]
तथापि पापीयसि निर्जिते गते दिशः प्रसेदुः प्रबभौ निशाकरः।
दिवो निषेतुर्भुवि पुष्पवृष्टयो रराज योषेव विकल्मषा निशा ।। [७]

अथोपनीतं विधिवद् विपश्चितो विनिन्युरेनं गुरवो गुरुप्रियम् ।
अवन्ध्ययत्नाश्च बभूवुरत्र ते क्रिया हि वस्तूपहिता प्रसीदति ।।

( रघु. ३.२९ )

### विवेचन :

दिलीप राजाने राजकुमार रघूचा योग्यवेळी यथाविधी उपनयन संस्कार केला. घुरूंना अत्यंत आवडता असलेल्या त्याला त्यानंतर विद्वान गुरूंनी शिक्षण दिले. ते आपल्या प्रयत्नात चांगले यशस्वी झाले. म्हणजेच रघूने सम्यक् विद्यार्जन केले, या संदर्भात कवी म्हणतो की, विद्वान गुरूंकडून रघूने ज्ञानग्रहण करणे बरोबरच आहे. कारण योग्य ठिकाणी दिलेले शिक्षण केव्हाही फलद्रूप होते.

### निरीक्षण :

कालिदासाने या ठिकाणी शिक्षणविषयक विचार मांडले आहेत. योग्य ठिकाणी दिलेले ज्ञानच फलद्रूप होत असते हे रघूच्या उदाहरणातून या अर्थान्तरन्यासाने दाखविले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या पादात आलेल्या ' क्रिया हि वस्तूपहिता प्रसीदति । ' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.नारायण पण्डितांनी प्रस्तुत श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[८]

---

[५] अत्रार्थान्तरन्यासः । पदा - पृ. १३५/ ओळ क्र.3
[६] कुमार १.२३ पृ. ७3
[७] बुध्दचरित -. १3.७3, पृ. ११६ .
[८] अत्र कौटल्यः - ' क्रिया हि द्रव्यं विनयति नाद्रव्यम् ' इति अत्रार्थान्तरन्यासः । पदा. पृ. १४६, ओळ क्र. ५ - ६

यासारखी कल्पना कालिदासाच्या तसेच इतर संस्कृत साहित्यात पहावयास मिळते. जसे, –

पात्रविशेषे न्यस्तं गुणान्तरं व्रजति शिल्पमाधातुः ।
जलमिव समुद्रशुक्तौ मुक्ताफलतां पयोदस्य ।। [९]
नाद्रव्ये निहिता काचित्क्रिया फलवती भवेत् ।
न व्यापारशतेनापि शुकवत्पाठ्यते बकः ।। [१०]
वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे ।
न तु खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहन्ति वा ।
प्रभवति च तयोर्भूमान्भेदः फलं प्रति तद्यथा ।।
प्रभवति शुचिर्बिम्बग्राहे मणिर्न मृदादयः ।। [११]

तदङ्गमग्र्यं मघवन् महाक्रतोरमुं तुरङ्गंप्रतिमोक्तुमर्हसि ।
पथः शुचेर्दर्शयितार ईश्वरा मलीमसामाददते न पद्धतिम् ।।
(रघु. ३.४६)

विवेचन :

राजा दिलीपाने नव्याण्णव अश्वमेध यज्ञ पूर्ण करून शंभराव्या यज्ञासाठी एक अश्व विश्वसंचारार्थ सोडला आणि त्याच्या रक्षणासाठी कुमार रघूची नियुक्ती केली होती. तो अश्व इंद्राने पळवून नेला. जेव्हा ही गोष्ट रघूच्या लक्षात आली तेव्हा तो इंद्राला म्हणाला, ' हे इंद्रा, अश्वमेध यज्ञाचे मुख्य अंग असलेल्या ह्या घोडयाला तू सोडावेस हे उचित आहे कारण सन्मार्गदर्शक सत्पुरूष केव्हाही वाकडया मार्गाने जात नाहीत.'

निरीक्षण :

या श्लोकात अर्थान्तरन्यासाने सज्जनांचे विशेष गुण वर्णन केले आहेत. सत्पुरूष कोणत्याही परिस्थितीत वाममार्गाचा अवलंब करीत नाहीत. इंद्रानेही सज्जनाप्रमाणे वागून अश्व पळवू नये हे इथे विशेष रुपात प्रतिपादन केले आहे.

या श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्य विधानाद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

---

[९] माल. १.६, पृ. 333
[१०] हितोपदेश प्रस्तावना. २८. पृ.४
[११] उत्तर. २.४, पृ.3४

तथापि शस्त्रव्यवहारनिष्ठुरे विपक्षभावे चिरमस्य तस्थुषः ।
तुतोष वीर्यातिशयेन वृत्रहा पदं हि सर्वत्र गुणैर्निधीयते ।।

(रघु. ३.६२ )

**विवेचन :**

रघूच्या विनंतीवरून इंद्राने अश्वमेधीय अश्व सोडला नाही. त्यामुळे त्याच्याबरोबर रघूला पराभूत करु शकला नाही म्हणून त्याने आपल्या वज्राने रघूच्या वक्षःस्थलावर प्रहार करून त्यास जमिनीवर पाडले. तेव्हा त्याचे सैनिक अश्रू ढाळू लागले. पण निमिषार्धात तो ते दुःख दूर सारून उठला. या वेळी सैनिकांनी आनंदोद्गार काढले. तथापि भयंकर शस्त्रास्त्रांचा उपयोग केला जात असतानाही विरुद्ध बाजू घेऊन बराच वेळ टिकाव धरणाऱ्या त्या रघूच्या पराक्रमामुळे इंद्र संतुष्ट झाला. साहजिकच आहे, गुणांची कोठेही प्रशंसाच होते.

**निरीक्षण :**

कालिदासाने प्रस्तुत श्लोकातील अर्थान्तरन्यास अलंकाराने इंद्राला पराक्रमाविषयी आस्था होती असे दिसून येते. रघूचा अलौकिक पराक्रम आणि इंद्राने त्याचे केलेले गुणग्रहण हेही इथे आपणांस समजून येते.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत इंद्राने संतुष्ट होणे या विशेषाचा निर्देश आहे आणि त्याचे ' पदं हि सर्वत्र गुणैर्निधीयते ' या चतुर्थ पादातील सामान्य वचनाद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

अथ स विषयव्यावृत्तात्मा यथाविधि सूनवे ।
नृपतिककुदं यूने दत्त्वा सितातपवारणम् ।
मुनिवनतरुच्छायां देव्या तया सह शिश्रिये ।
गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम् ॥

( रघु. ३.७० )

**विवेचन :**

रघुवंशाच्या तिसऱ्या सर्गातील शेवटच्या या श्लोकात रघूचा राज्याभिषेक व दिलीपाने वानप्रस्थाला जाणे या गोष्टींचा निर्देश केला आहे. राजभोगानंतर विषयापासून चित्तवृत्ती निवृत्त झालेल्या राजा दिलीपाने आपल्या तरुण मुलाला राज्यधुरा व श्वेत वर्णाचे छत्र देऊन त्याने आपल्या राणीसह वानप्रस्थाश्रम स्वीकारला, यावर कवी असे म्हणतो की, ' बरोबरच आहे, वृद्धापकाळी इक्ष्वाकवंशीय राजांचे हे कुलव्रतच आहे.'

**निरीक्षण :**

या श्लोकात कालिदासाने इक्ष्वाकू वंशातील राजांच्या कुलव्रताचे वर्णन केले आहे. दिलीप राजा हा इक्ष्वाकू वंशातील आहे. वृद्धापकाळी तो वनात जातो. थोडक्यात दिलीप राजा हा इक्ष्वाकू कुलातील व्रताचे पालन कर्ता आहे हे या अर्थान्तरन्यासातून दिसून येते.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या
'गलितवयसामिक्ष्वाकूणामिदं हि कुलव्रतम् ।' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

हेमाद्री, अरुणगिरीनाथ व नारायण पंडित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे. [१२]

हेमाद्रीने अर्थान्तरन्यासाचे लक्षण सांगताना त्याने दण्डीचे लक्षण उद्धृत केले आहे.[१३]

अशाच प्रकारची कल्पना संस्कृत वाङ्मयात पुढीलप्रमाणे आढळतात. जसे -

'अथ वीक्ष्य रघुः प्रतिष्ठितं प्रकृतिष्वात्मजमात्मवित्तया ।
विषयेषु विनाश-धर्मिषु त्रिदिवस्थेष्वपि निस्पृहोऽभवत् ॥
गुणवत्सुतरोपितश्रियः परिणामे हि दिलीपवंशजाः ।
पदवीं तरुवल्कवाससां प्रयताः संयमिनां प्रपेदिरे ॥[१४]
सन्त्यज्य ग्राम्यमाहारं सर्वं चैव परिच्छदम् ।
पुत्रेषु भार्यां निक्षिप्य वनं गच्छेत्सहैव वा ॥ [१५]
सुतविन्यस्तपत्नीकस्तया वानुगतो वनम् ।
वानप्रस्थो ब्रह्मचारी साग्निः सोपासनो व्रजेत् ॥[१६]

अपनीतशिरस्त्राणाः शेषास्तं शरणं ययुः ।
प्रणिपातप्रतीकारः संरम्भो हि महात्मनाम् ॥
( रघु. ४.६४ )

**विवेचन :**

---

[१२] रघु.दर्प : पृ ६१/ ओळ क्र १५-१६.
प्रका..पृ.१७२, ओळ क्र. ८,
पदा. पृ. १७२, ओळ क्र.१९
[१३] रघु.दर्प : पृ.६१, ओळ क्र. १८-१९., काव्याद : २.१६९ पृ. १९९-२००
[१४] रघु : ८.१०-११, पृ. २०५-२०६
[१५] मनुस्मृती : ६.3, पृ. ४६१
[१६] याज्ञवल्क्य. स्मृती : 3.४५, पृ. 330

प्रस्तुत श्लोक रघूराजाच्या दिग्विजयाच्या वर्णनात आला आहे. रघूने पश्चिमेकडील राजांना पराभूत केले आणि जे शिल्लक राहिले त्यांनी आपली शिरस्त्राणे काढून त्यास शरण गेले. कारण महात्म्यांचा क्रोध त्यांना वंदन करून घालविता येतो.

निरीक्षण :

कालिदासाने या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकाराने महात्मे शरणागतावर दया करतात हे सांगितले आहे. शरणागताला अभय देणे हा गुण रघूच्या स्वभावात होता हेही कालिदासाने सूचित केले आहे.

श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्य विधानाद्वारे साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

स विश्वजितमाजह्रे यज्ञं सर्वस्वदक्षिणम् ।
आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव ।।
( रघु. ४.८६ )

विवेचन :

संपूर्ण विश्वाला जिंकल्यावर राजा रघूने विश्वजित नामक यज्ञ केला. या यज्ञात सर्वस्वाचे दान करावे लागते. राजाच्या या कृतीवर कवी लिहितो की, ' बरोबरच आहे, मेघाप्रमाणे सत्पुरुषांचेही घेणे हे देण्याकरिताच असते.

निरीक्षण :

कालिदासाने मेघाची तुलना सत्पुरुषाशी करून सत्पुरुषाचे गुणवर्णन केले आहे आणि त्याद्वारा रघूचे आचरण सत्पुरुषासारखे होते हे दाखविले आहे. कारण रघूने जरी प्रजेकडून कर गोळा केला तरी त्या सर्वांचे दान यज्ञात केले. रघूच्या निस्पृहतेचा गौरव या अर्थान्तरन्यासाने केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळींत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने त्याचे समर्थन केले आहे.

एका अत्यंत सुंदर सुभाषिताची योजना या श्लोकात केलेली आहे.

सर्वत्र नो वार्तमवेहि राजन् नाथे कृतस्त्वय्यशुभं प्रजानाम् ।
सूर्ये तपत्यावरणाय दृष्टेः कल्पेत लोकस्य कथं तमिस्रा ।।
(रघु. ५.१३ )

विवेचन :

विश्वजित नामक रक्षामध्ये खजिन्यातील सर्व द्रव्य दान दिलेल्या रघूराजाकडे सर्व विद्या प्राप्त करून घेतलेला वरतन्तू मुनींचा शिष्य कौत्स गुरुदक्षिणेकरिता द्रव्य मागण्यासाठी आला. राजाने त्यास क्षेमकुशल विचारल्यावर तो राजाला म्हणाला की, ' हे राजा, तू राजा असताना प्रजेला दुःख कुठून होणार ? आमचे सर्वत्र क्षेम आहे. अरे ! सूर्य तळपत असताना अंधकार जनतेच्या दृष्टीला झाकून टाकण्यास समर्थ कसा होईल ?

**निरीक्षण :**

या श्लोकात रघूराजाची व्यक्तिरेखा कालिदासाने रेखाटली आहे. रघूच्या ठिकाणी दातृत्व आणि प्रजाहितदक्षता होती. इथे कवीने रघू राजाची तुलना सूर्याबरोबर केली आहे. सूर्य तळपत असताना अंधकाराची मात्रा दृष्टीवर चालत नाही. त्याप्रमाणे सूर्यवंशी रघूराजा असताना प्रजेला दुःख होणार नाही. हे या अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

टीकाकारांपैकी अरुणगिरीनाथ, नारायण पण्डित, मल्लिनाथ आणि हेमाद्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[१७]

कालिदासाच्या अभिज्ञानशाकुंतलात याच प्रकारचा श्लोक आहे,

कुतो धर्मक्रियाविघ्नः सतां रक्षितरि त्वयि ।
तमस्तपति घर्मांशौ कथमाविर्भविष्यति । ।। [१८]

**अथाङ्गराजादवतार्य चक्षुर्याहीति जन्यामवद्त कुमारी ।**
**नासौ न काम्यो न च वेद सम्यग्द्रष्टुं न सा, भिन्नरुचिर्हि लोकः ।।**

(रघु. ६.३०)

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोक इंदुमतीच्या स्वयंवर वर्णनासाठी योजला आहे. राजकुमारी इंदुमतीला सुनंदा नामक द्वारपालिका स्वयंवरासाठी उपस्थित झालेल्या राजे आणि राजपुत्र यांची माहिती देत असे. अनेकांची माहिती दिल्यानंतर तिने अंगराजाची माहिती दिली. तेव्हा अंगराजावरून दृष्टी काढून कुमारी इंदुमती सुनंदेला ' पुढे चल ' असे म्हणाली, या

---

१७ अत्रार्थान्तरन्यासः । नाथ इति । अत्र समर्थके सामान्यमुक्तं त्वन्नाथकत्वलक्षणम ।शुभाभावनिमित्तं सामर्थ्याद्विशेषेऽपि प्रतिपन्नं स्त तस्यानुपपद्यमानतां निरसति । प्रका. पृ. २३७, ओळ क्र. १८-१९
अत्र प्रतिवस्तुनोऽर्थान्तरन्यासस्य च सङ्करः । कित्ता. पृ. २३७.
अत्र अर्थान्तरन्यास्य प्रतिवस्तुनश्च सङ्करः । पदा. पृ. २३८ ओळ क्र. २५-२६

प्रसंगावर भाष्य करताना कवी लिहितो की, तो अंगराजा सुंदर नव्हता असे नाही, किंवा ती इंदुमती सारासार विचार जाणत नव्हती असे नाही तर निरनिराळ्या माणसांच्या निरनिराळ्या आवडी-निवडी असतात.

**निरीक्षण :**

सर्व राजे तुल्यबळ असले तरी इंदुमतीची आवड भिन्न असल्यामुळे तिने अंगराजाला निवडले नाही. तिने पुढे अज राजाला वरले. तिने इतर राजांना सोडून देण्यामध्ये तिची आवड-निवड महत्त्वाची असल्याचे कवीने सांगितले आहे. लोकांची आवड निवड भिन्न भिन्न असते या बाबत कालिदासाने असे म्हटले आहे की,'नाट्‍यंभिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ।[१९]

या श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन 'भिन्नरुचिर्हि लोकः ।' या चतुर्थ पादांतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

अरुणगिरीनाथ आणि नारायण पण्डित यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[२०]

तं प्राप्य सर्वावयवानवद्यं व्यावर्त्ततान्योपगमात् कुमारी ।
न हि प्रफुल्लं सहकारमेत्य वृक्षान्तरं काङ्‍क्षति षट्पदाली ।।
( रघु. ६.६९ )

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोकात इंदुमतीची स्वयंवराच्या वेळी अज राजाला पाहून काय स्थिती झाली हे वर्णिले आहे. कवी म्हणतो की, ' इन्दुमती त्या निर्दोष अवयवांच्या अज राजाजवळ आल्यावर दुसरीकडे जाण्याच्या विचारापासून पराङ्मुख झाली आणि तेच योग्य आहे कारण भुंग्यांचा समुदाय मोहोराने डंवरलेल्या आम्रवृक्षावर आल्यावर दुसऱ्या वृक्षाची इच्छा करीत नाही.'

**निरीक्षण :**

कालिदासाने या अर्थान्तरन्यासातून इंदुमतीने इतर राजे व राजपुत्रांना वगळून अजाला वरले याचे स्पष्टीकरण दिले आहे. ज्याप्रमाणे भुंगे मोहोराने डंवरलल्या आम्रवृक्षाची इच्छा करतात, अन्य वृक्षाची इच्छा करीत नाहीत. त्याप्रमाणे इंदुमतीने अजाची इच्छा

---

[१८] अभि . शा. १.१४ पृ.६०१ अर्थान्तरं न्यस्यति - सूर्य इ÷यादिना । संजी.पृ.११२ ओळ क्र. २५
[१९] माल. १.४, पृ.332
[२०] प्रका. पृ. 300, ओळ क्र. १५
तर्हि कथं वैमरव्यमत आह - लोकः भिन्नरुचिः हि इति । अत्रार्थान्तरन्यासः ।
पदा.. पृ. 30१ ओळ क्र. २ - 3

केली. आम्रवृक्षाच्या मोहोराचा वास सर्वत्र दरवळतो त्याप्रमाणे अजाच्या कीर्तिरूपी मोहराचा वास सर्वत्र पसरला होता. हे या अर्थान्तरन्यासातून कवीला सुचवावयाचे आहे.

श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा त्याचे समर्थन केल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

रतिस्मरौ नूनमिमावभूतां राज्ञां सहस्रेषु तथाहि बाला ।
गतेयमात्मप्रतिरुपमेव मनो हि जन्मान्तरसङ्गतिज्ञम् ॥
( रघु.७.१५ )

विवेचन :

इंदुमतीने स्वयंवर मंडपात अजाला माळ घातली. त्या दोघांच्या अनुरूप जोडीविषयी कवी लिहितो की, 'खरोखरच ही दोघे रती व मदन यांच्याप्रमाणे झाली. तसेच त्या बालिकेने हजारो राजांत केवळ आपल्याच रूपाशी तुल्य असलेल्या अजाला मिळविले. याला कारण असे की, मन हे पूर्वजन्मीचा संबंध जाणते.'

निरीक्षण :

सर्व राजे तुल्यबळ असताना इंदुमतीने अजाला वरले, याचे स्पष्टीकरण कालिदासाने या अर्थान्तरन्यासात दिले आहे. पूर्व संचितानुसार तिची भाग्यरेखा अज राजाशी निगडित होती. त्यामुळे पूर्वजन्मीच्या संस्काराने मनाने अजाशी असलेला संबंध जाणून तिला त्यास वरण्याची अन्तर्प्रेरणा दिली असे म्हणता येईल.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन चतुर्थ पादांतील ' मनो हि जन्मान्तरसंगतिज्ञम् '। या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

प्रथमपरिगतार्थस्तं रघुः संनिवृत्तं
विजयिनमभिनन्द्य श्लाघ्यजायासमेतम् ।
तदुपहितकुटुम्बः शान्तिमार्गोत्सुकोऽभू -
न्न हि सति कुलधुर्ये सूर्यवंश्या गृहाय ॥
( रघु. ७.७१ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोक हा सातव्या सर्गाचा अंतिम श्लोक असून यामध्ये इंदुमतीला घेऊन घरी आलेल्या अजाचे रघूने अभिनंदन करून त्याच्यावर राज्यकारभार सोपवून वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याचे वर्णन आहे. कवी म्हणतो की,

'अगोदरच सर्व हकीकत समजलेल्या रघूने त्यास योग्य अशी पत्नी बरोबर घेऊन आलेल्या व विजयशाली होऊन परत आलेल्या अजाचे अभिनंदन करुन व त्याच्यावर सर्व कुटुंबाचा भार सोपवून मोक्षमार्गाकडे वळण्यास उत्सुक झाला. कारण सूर्यवंशात उत्पन्न झालेले राजे कुळात कर्तासवरता मुलगा झाली की गृहस्थाश्रमात राहत नाहीत.'

**निरीक्षण :**

कालिदासाने सूर्यवंशाचा इतिहास सांगताना त्याने त्या कुळाचे काही विशेष धर्म सांगितले आहेत. त्यांचे त्या वंशातील सर्व राजे पालन करतात. अज राजाही त्याला अपवाद नाही. अज इंदुमतीशी विवाहबद्ध होऊन घरी आल्यावर रघूने त्याचे अभिनंदन केले आणि कुळाचार म्हणून गृहस्थाश्रमात न राहता मोक्षप्राप्तीसाठी उत्सुक होऊन वानप्रस्थाश्रम स्वीकारला. प्रस्तुत गोष्ट या अर्थान्तरन्यासाने सूचित केली आहे.

या श्लोकातील पहिल्या दोन ओळींत विशेष असून त्याचे समर्थन तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

अकरोत् स तदौर्ध्वदैहिकं पितृभक्त्या पितृकार्यकल्पवित् ।
न हि तेन पथा तनुत्यजस्तनयावर्जितपिण्डकाङ्क्षिणः ॥
(रघु. ८.२६ )

**विवेचन :**

रघू राजाने देहविसर्जन केल्याचे समजताच अज राजाने बराच वेळ शोक केला आणि पितरांसंबंधी करावयाच्या विधानाची माहिती असलेल्या अजाने पितृभक्तिपूर्वक त्याचे और्ध्वदैहिक केले. वास्तविक पाहता त्या मार्गाने देहत्याग करणारे मुलाने दिलेल्या पिण्डाची अपेक्षा करीत नाहीत.

**निरीक्षण :**

कालिदासाने सूर्ववंशाचा इतिहास सांगताना त्याने या श्लोकात त्या कुळाचा आणखी एक विशेष सांगितला आहे. त्याचे अज राजा देखील आचरण करीत होता हे या अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे. सूर्यवंशातील राजे मुलावर राज्याचा भार सोपवून वानप्रस्थाश्रम स्वीकारीत असत. त्या मार्गाने ते मोक्ष मिळवतात. त्यामुळे या वंशातील राजे मुलाने दिलेल्या पिंडाची अपेक्षा करीत नसत. तरीही अज राजाने रघूचे निधन झाल्यावर पितृभक्तिपूर्वक और्ध्वदैहिक कर्म केले.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने त्याचे समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

वपुषा करणोज्झितेन सा निपतन्ती पतिमप्यपातयत् ।
ननु तैलनिषेकबिन्दुना सह दीपार्चिरुपैति मेदिनीम् ॥
(रघु. ८.३८)

विवेचन :

अज व इंदुमती एके दिवशी नगराबाहेरच्या उद्यानात विहार करीत असता नारदमुनी आकाशमार्गाने गोकर्णस्थानाला निघाले असता त्यांच्या वीणेवरील दिव्य पुष्पांची माळ वाऱ्याने निसटून इंदुमतीच्या वक्षःस्थलावर पडली. ती माळ पाहून इंदुमती विह्वल होऊन निश्चेष्ट झाली. त्यानंतरच्या तिच्या अवस्थेचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आहे. चैतन्य नष्ट झालेल्या शरीराने खाली पडत असलेली ती इंदुमती आपल्या पतीसह खाली पडली, हे बरोबरच आहे की, दिव्याची ज्योत खाली जमिनीवर पडताना ठिबकणाऱ्या तेलाच्या बिंदूसह पडते.

निरीक्षण :

कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा इंदमतीचे देहावसान काव्यात्मक पद्धतीने वर्णन केले आहे. दिव्याची ज्योत ठिबकणाऱ्या तेलासह जमिनीवर पडते. दिव्याची ज्योत आणि तेलबिंदू यांचा जसा अविभाज्य संबंध आहे, तसा इंदुमती आणि अज राजा यांचा संबंध आहे. या अर्थान्तरन्यासाने अज-इंदुमतीचे एकमेकांवरील नितांत प्रेम कालिदासाने रेखाटले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्य विधानाद्वारा केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास संभवतो.

नृपतेर्व्यजनादिभिस्तमो नुनदे सा तु तथैव संस्थिता ।
प्रतिकारविधानमायुषः सति शेषे हि फलाय कल्पते ॥
(रघु. ८.४० )

विवेचन :

इंदुमतीच्या वक्षःस्थलावर नारदाच्या वीणेवरुन वाऱ्याने निसटलेली पुष्पमाला पडली. त्या माळेस पाहून अज राजासह ती मूर्च्छित झाली. तेव्हा वारा वगैरे घातल्यावर राजाची मूर्च्छा गेली. परंतु ती इंदुमती तशीच राहिली, कारण आयुष्य शिल्लक असेल तरच औषधोपचारांचा उपयोग होतो.

**निरीक्षण :**

कालिदासाने या श्लोकातील अर्थान्तरन्यासाने निसर्गातील महत्त्वाचा नियम सांगितली आहे. तो असा – आयुष्य शिल्लक असेल तर मृत्यूचा प्रतिकार औषधाने होतो. आयुष्य संपले असल्यास औषधांनी काही होत नाही. प्रस्तुत श्लोकात इंदुमतीचे आयुष्य संपले असल्याने तिच्यावर औषधांचा परिणाम झाला नाही. परंतु अजाचे आयुष्य शिल्लक असल्याने औषधोपचाराने तो शुद्धीवर आला, ही गोष्ट या अर्थान्तरन्यासाने सांगितली आहे.

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत सामान्याद्वारात साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा उल्लेख केला आहे.[२१]

स्रगियं यदि जीवितापहा हृदये किं निहिता न हन्ति माम् ।
विषयप्यमृतं क्वचिद् भवेदमृतं वा विषमीश्वरेच्छया ।।

(रघु. ८.४६ )*

**विवेचन :**

नारदाच्या वीणेवरील पुष्पमाळा आकाशातून खाली इंदुमतीच्या वक्षःस्थलावर पडली. आणि क्षणभर तिच्याकडे पाहून ती मृत झाली. तेव्हा राजा अज तिच्याविषयी विलाप करु लागला. तो म्हणाला की, ही माला जर प्राणहारक आहे तर माझ्या वक्षःस्थलावर पडली असता मला कशी मारीत नाही ? बरोबरच आहे. परमेश्वराच्या मर्जीने केव्हा अमृत देखील विष होईल.

**निरीक्षण :**

या श्लोकातून कालिदास हा ईश्वरवादी होता हे दिसून येते. ' ईश्वरेच्छा बलीयसी ।' ही गोष्ट या अर्थान्तरन्यासाने सूचित केले आहे. इंदुमतीच्या वक्षःस्थलावर पडलेली नाजूक पुष्पमाला तिला वज्रप्रहाराप्रमाणे घातक ठरली. त्याचे कारण ईश्वरी इच्छाच आहे हे कालिदासाने सांगितले आहे.

[२१] प्रतिकारविधानमित्यादिरर्थान्तरन्यासः । प्रका.. पृ. ५१, ओळ क्र. ९

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा त्याचे समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

सुरतश्रमसंभृतो मुखे ध्रियते स्वेदलवोद्गमोऽपि ते ।
अथ चास्तमिता त्वमात्मना धिगिमां देहभृतामसारताम् ॥
(रघु. ८.५२ )

**विवेचन :**

इंदुमतीच्या आकस्मिक झालेल्या निधनाने अज राजा अत्यंत दुःखी झाला. विलाप करीत असता तो म्हणाला की, 'सुरतश्रमामुळे उत्पन्न झालेले घर्मबिंदुदेखील तुझ्या चेहऱ्यावर अजून आहेत. पण तू स्वतः मात्र नाहीशी झाली आहेस. प्राण्यांच्या ह्या अस्थिरतेचा धिक्कार असो.'

**निरीक्षण :**

कालिदासाने या श्लोकात अर्थान्तरन्यासाने निसर्गाच्या नियमाचा आधार घेतला आहे. प्राणिमात्रांच्या जीवनामध्ये अस्थिरता असते. इथे कवी तत्त्वज्ञानाच्या मनःस्थितीत बोलून जीवनातील नश्वरतेचा धिक्कार करीत आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे चौथ्या पादात आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

रुदता कुत एव सा पुनर्भवता नानुमृतापि लभ्यते ।
परलोकजुषां स्वकर्मभिर्गतयो भिन्नपथा हि देहिनाम् ॥
( रघु. ८.८५ )

**विवेचन :**

अज राजा इंदुमतीच्या निधनामुळे झालेल्या दुःखाने मोहित झाला असल्याचे वसिष्ठ गुरुंनी जाणले आणि त्याचे सान्त्वन करण्यासाठी आपला एक शिष्य राजाकडे पाठविला. वसिष्ठशिष्याने केलेल्या बोधातील प्रस्तुत श्लोक आहे. वसिष्ठशिष्य राजाला म्हणाला, ' हे राजा, तू रुदन केल्याने ती कोठून मिळणार बरे ? एवढेच नव्हे तर तिच्या मागोमाग मेल्यानेही ती मिळणार नाही. कारण परलोकामध्ये वावरणाऱ्या जीवांना आपापल्या कर्मांच्या योगे भिन्नभिन्न गती मिळत असतात.'

---

* काही ठिकाणी हा श्लोक ' प्रक्षिप्त ' मानला आहे.

निरीक्षण :

कालिदासाने या श्लोकात हिंदू-धर्माचा विशेष सांगितला आहे. त्याचा पुनर्जन्मावर विश्वास आहे. वसिष्ठशिष्याने उपदेशाद्वारा कर्म सिध्दान्त व पुनर्जन्म हे दोन सिद्धान्त मांडले आहेत. या सिध्दान्ताच्या द्वारेच अजाचे सांत्वन करण्याचा प्रयत्न त्याने केला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रायोविषाणपरिमोक्षलघूत्तमाङ्गान्खङ्गांश्चकार नृपतिर्निशितैः क्षुरप्रैः ।
शृङ्गं स दृप्तविनयाधिकृतः परेषामत्युच्छ्रितं न ममृषे न तु दीर्घमायुः ।।

( रघु. ९.६२ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात दशरथ राजाच्या शिकारीचे वर्णन आले आहे. कवी म्हणतो की, ' तो दशरथ राजा तीक्ष्ण अशा क्षुरबाणांनी गेंडयांना त्याचे शिंग मोडून त्याचे मस्तक प्रायः हलके करीत असे. कारण उद्धट लोकांना नम्र करण्याचा अधिकार असलेला तो राजा शत्रूंचा चढलेपणा सहन करीत नसे. त्यांचे दीर्घायुष्य तो सहन करीत नसे असे नाही. अर्थात शत्रूंचे दमन करणे हेच त्यास अभिप्रेत होते.'

निरीक्षण :

कालिदासाने प्रस्तुत अर्थान्तरन्यासद्वारा दशरथाच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष वर्णन केला आहे. त्याने उद्धट लोकांना व शत्रूंना नमवले पण त्यांना ठार केले नाही. त्यांचे दीर्घायुष्य चिंतिले. ही गोष्ट कवीने गेंड्यांच्या उदाहरणातून स्पष्ट केली आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष आले असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ व नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[२२]

नृपतेः प्रतिषिद्धमेव तत् कृतवान् पङ्क्तिरथो विलङ्घ्य यत् ।
अपथे पदमर्पयन्ति हि श्रुतवन्तोऽपि रजोनिमीलिताः ।।

(रघु. ९.७४ )

[२२] प्रका. पृ. ९६, ओळ क्र. ४.,
पदा. पृ. ९६, ओळ क्र. १०

विवेचन :

प्रस्तुत श्लोक दशरथाच्या मृगयेचा शेवट कसा दुःखात झाला हे सांगताना आला आहे. एकदा राजा दशरथ दूर मृगाचा पाठलाग करीत दूर जंगलात गेला. तिथे श्रमामुळे घामाघूम झालेल्या घोड्यावरून तमसा नदीवर आला. त्याने पाण्यात भांडे भरताना होणारा आवाज ऐकून तो आवाज हत्तीचा चित्कार आहे असे समजून एक लक्षवेधी बाण सोडला. त्यामुळे नदीवर पाणी भरण्यास आलेला श्रावणकुमार मृत्यू पावला. यावर कवी लिहितो की, जे कृत्य राजे लोकांना निषिद्ध म्हणून सांगितले ते कर्म शास्त्राज्ञा उल्लंघन करून दशरथ राजाने केले. हे योग्यच आहे की, विद्वान लोक देखील रजोगुणांनी युक्त झाले असता वाममार्गाने जातात.

निरीक्षण :

क्षत्रिय धर्मानुसार हत्तीवध निषिद्ध आहे. परंतु दशरथ राजाकडून या नियमाचे उल्लंघन झाले. हत्तीचा चित्कार ऐकून त्याने बाण मारला होता. या गोष्टीचे समर्थन या ठिकाणी अर्थान्तरन्यासाने केले आहे. ते असे – रजोगुणाच्या प्रभावामुळे विद्वान लोकसुद्धा दुराचार करतात. दशरथ राजाही त्याला अपवाद नाही. कालिदासाने या श्लोकात सामान्य अनुभव-विशेषाचे बाबतीत उद्बोध करून दृढ केला आहे.

प्रस्तुत श्लोकामधील पहिल्या ओळीत आलेल्या विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

नारायण पण्डितांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[23] अशा प्रकारची कल्पना संस्कृत वाङ्मयात पुढीलप्रमाणे आढळते.

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ।
वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ।।[२४]

शापोऽप्यदृष्टतनयाननपद्मशोभे सानुग्रहो भगवता मयि पातितोऽयम् ।
कृष्यां दहन्नपि खलु क्षितिमिन्धनेध्दो बीजप्ररोहजननीं ज्वलनः करोति ।।

(रघु, ९.८० )

विवेचन :

दशरथ राजाकडून श्रावणकुमाराचा अजाणता वध झाला. जेव्हा त्यास असे समजले की तो अंध मातापित्यांचा एकुलता एक पुत्र होता. तेव्हा तो त्यांच्याजवळ गेला आणि आपल्या अपराधाची कबुली दिली. त्यावेळी वृद्ध पित्याने राजास ' तू देखील माझ्याप्रमाणे वृद्धापकाळी पुत्रशोकाने मरशील ' असा शाप दिला. यावर राजा त्यास म्हणाला की, ' पुत्राचे

---

[23] पदा. पृ.१०२, ओळ क्र. १३

मुखकमल न पाहिलेल्या मला आपण हा शाप देखील अनुग्रहपूर्वकच दिला आहे. खरोखर इंधनाने प्रज्वलित झालेला अग्नी नांगरण्यास योग्य जमिनीला जाळीत असताही बीजांकुर वाढविणारी करतो.

निरीक्षण :

श्रावण कुमाराच्या वधाने व्यथित होऊन त्याच्या मातापित्याने त्यास दिलेला शाप हा दशरथ राजास वरदान ठरला. ही गोष्ट कवीने सुंदर अर्थान्तरन्यासाने प्रतिपादन केली आहे. अग्नी हा जमिनीला जाळीत असतानाच तो तिला फलद्रूप होण्याचे सामर्थ्य प्रदान करतो, त्याप्रमाणे दशरथास मिळालेला शाप निपुत्रिक अशा त्यास पुढे पुत्रप्राप्तीसाठी वरदान ठरणार आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष आले असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

ते च प्रापुरुदन्वन्तं बुबुधे चादिपूरुषः ।
अव्याक्षेपो भविष्यन्त्याः कार्यसिद्धेर्हि लक्षणम् ॥
( रघु. १०.६ )

विवेचन :

दशरथ राजाला अनेक वर्षे मूलबाळ नव्हते म्हणून त्याने पुत्रकामेष्टी यज्ञाला आरंभ केला. त्याचवेळी रावणाच्या त्रासाने गांजलेले देव क्षीरसमुद्रावर भगवान विष्णूला भेटण्यास गेले. त्यावेळी ते आदिपुरुष विष्णूही तत्काळ योगनिद्रेतून जागृत झाले. बरोबरच आहे, कोणत्याही गोष्टीला विलंब न लागणे हे भविष्यकाळी होणाऱ्या कार्यसिद्धीचे लक्षण आहे.

निरीक्षण :

कार्यामध्ये दिरंगाई व आळस हे कार्यसिद्धीत व्यवधान ठरू शकतात. परंतु अविलंबाने घटना घडत गेल्यास कार्यसिद्धी प्राप्त होते असे सांगून कालिदासाने विष्णू योगनिद्रेतून जागृत झाले ही पुढील कार्यसिद्धीची सूचक आहे हे इथे अर्थान्तरन्यासाने सुचविले आहे.

प्रस्तुत श्लोकात ' भगवान विष्णूकडे सर्व देव गेल्यावर विष्णू जागृत होणे ' हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन ' कोणत्याही गोष्टीला विलंब न लागणे हे कार्यसिद्धीचे लक्षण आहे ' या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

---

[२४] किराता. २.३०, पृ. २८

कार्येषुः चैककार्यत्वादभ्यर्थ्योऽस्मि न वज्रिणा ।
स्वयमेव हि वातोऽग्नेसारथ्यं प्रतिपद्यते ॥
(रघु. १०.४०)

**विवेचन :**

भगवान विष्णूची इंद्रासह सर्व देवांनी केलेली स्तुती ऐकून विष्णू प्रसन्न झाले. त्यांनी देवांचे आपल्याकडे येण्याचे कारण जाणून, त्यांचे सान्त्वन करण्याकरिता रावण एवढा उन्मत्त का झाला व त्याचा नाश करण्याकरिता आपण काय करणर हे सांगताना विष्णू देवांना म्हणाले, ' तुमचा व माझा हेतू एकच आहे. त्यामुळे इंद्राने माझी प्रार्थना करण्याचे कारण नाही. कारण वारा स्वतः होऊनच अग्नीला साहाय्य करतो'.

**निरीक्षण :**

समान उद्दिष्टे असलेल्या दोन व्यक्ती एकत्र येऊन कार्य करतात. अग्नी व वायू हे एकत्र येऊन ज्वलनाचे कार्य करतात. तद्वत इंद्रादी देव व विष्णू जगत्कल्याणासाठी एकत्र येतात, हे कालिदासाने अर्थान्तरन्यासद्वारा सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा त्याचे साधर्म्याने समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

कौशिकेन स किल क्षितीश्वरो राममध्वरविघातशान्तये ।
काकपक्षधरमेत्य याचितस्तेजसां हि न वयः समीक्ष्यते ॥
( रघु.११.१ )

**विवेचन :**

विश्वामित्राने येऊन दशरथ राजाजवळ त्याच्या यज्ञकर्माला विघ्न उपस्थित होऊ नये म्हणून रामाला मागून घेतले. हे योग्यच होते की, जे तेजस्वी असतात त्यांचे वय कोणी पाहत नाही.

**निरीक्षण :**

पराक्रमी लोकांचे वय कोणी पाहत नाही. हे कालिदासाने या अर्थान्तरन्यासातून सांगितले आहे. राम हा वयाने लहान असून पराक्रमी होता हा त्याचा विशेष इथे दाखविला आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचे वर्णन असून त्याचे समर्थन चौथ्या पादांतील ' तेजसां हि न वयः समीक्ष्यते ' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ व नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[२५]

कृच्छ्र लब्धमपि लब्धवर्णभाक् तं दिदेश मुनये सलक्ष्मणम् ।
अप्यसु प्रणयिनां रघोः कुले न व्यहन्यत कदाचिदर्थिता ॥

( रघु. ११.२ )

विवेचन :

राजा दशरथाला मोठया तपस्येने राम–लक्ष्मण मिळाले होते. तथापि ते विद्वानांचे मोठे भक्त होते म्हणून लक्ष्मणासह रामाला विश्वामित्र मुनीला त्यांच्या यज्ञाचे रक्षण करण्यासाठी दिले. कारण रघुच्या कुळात नेहमी हीच रीत चालत आली आहे . जर एखाद्याने प्राणही मागितले तरी ते याचकाला विन्मुख होत नसत. म्हणजे याचकांची कोणतीही याचना विफल झालेला नाही.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात रघुकुलातील राजांचा विशेष सांगितला आहे. हे राजे प्राणाची याचना केली तरी ते याचकांना विन्मुख करीत नव्हते. दशरथ राजाचे राम – लक्ष्मण हे जीवन असूनही त्यांनी रघुकुलाचा आचार ध्यानात घेऊन विश्वामित्राला यज्ञ रक्षणार्थ दिले. याचना व्यर्थ होऊ न देणे हे या अर्थान्तरन्यासातून सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचे निर्देशन आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून येथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

तत्र यावधिपती मखद्विषां तौ शरव्यमकरोत् स नेतरान् ।
किं महोरगविसर्पिविक्रमो राजिलेषु गरुडः प्रवर्तते ॥

( रघु. ११.२७ )

विवेचन :

---

[२५] अत्रार्थान्तरन्यासे तेजशब्दशक्त्या यथाग्नीनां वयः स्फुलिङ्ग ाद्यवस्था न समीक्ष्यते, तथेति । प्रका. पृ. १४४, ओळ क्र. ७ – ८.
तेजसां वयः न समीक्ष्यते हि । - - - अत्रार्थान्तरन्यासः । पदा.. पृ. १४४, ओळ क्र. १५ – १६

विश्वामित्राच्या यज्ञात विघ्न निर्माण करणाऱ्या राक्षसांचा रामाने बंदोबस्त करण्याचा प्रयत्न केला. यज्ञामध्ये विघ्ने निर्माण करण्यात सुबाहू व मारीच आघाडीवर होते. ते सैन्य घेऊन यज्ञस्थली येऊन गोंधळ करू लागताच रामाने त्याच दोघांना मारून टाकले. त्याने इतर राक्षसांकडे दुर्लक्ष केले. याचे कारण असे की, मोठ-मोठया सर्पांना पराक्रम दाखविणारा गरूड दुतोंडया ( गांडूळा ) वर कधी झडप घालील काय ? अर्थात नाही.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात गरूडाचा स्वभाव लक्षात घेतला आहे. गरूडाचे भक्ष्य सर्पच असतो. गांडुळासारख्या प्राण्यांवर पराक्रम गाजवीत नाही. त्याप्रमाणे रामाने सुबाहू व मारीच यांना मारण्यात आहे, इतरांना नाही हे या श्लोकातील अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याने त्याचे समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

**अन्वियेष सदृशीं स च स्नुषां प्राप चैनमनुकूलवाग् द्विजः ।**
**सद्य एव सकृतां हि पच्यते कल्पवृक्षफलधर्मि काङ्क्षितम् ॥**

(रघु. ११.४९ )

विवेचन :

जनकराजाच्या यज्ञ समारंभासाठी विश्वामित्र निघाले असता त्यांनी राम व लक्ष्मणालाही बरोबर घेतले. तिथे त्यावेळी जनकाने आपली कन्या सीता रामास दिल्याचे सांगितले. दशरथ राजाही आपल्याला लायक अशी सून पाहत होता. एवढयात जनकाकडून त्याच्या मनाजोगा निरोप घेतलेला दूत त्याच्याकडे आला. बरोबरच आहे, कल्पवृक्षांच्या फलांचा धर्म असणारे पुण्यवान माणसांचे मनोरथ तावडतोब फळास येतात.

निरीक्षण :

कालिदासाने या अर्थान्तरन्यासाने पुण्यवान लोकांच्या इच्छा विनाविलंब अनायासे पूर्ण होतात असे सांगितले आहे. दशरथ राजाची त्याच्या मुलांच्या विवाहाची इच्छा अशीच पूर्ण झाल्याचे दिसून येते.

या श्लोकातील पहिल्या ओळीत सामान्यांचा निर्देश केला असून त्याचे समर्थत दुसऱ्या ओळीत असलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ यांनी अर्थान्तरन्यास दाखविला आहे. [२६]

---

[२६] अत्रार्थान्तरन्यासः । सद्यः अविलम्बितम् । सुकृतां - - - कल्पवृक्षफलस्येवध कर्मो - - - एव पच्यते । प्रका. पृ. १६४, ओळ क्र. ८ - ९

राघवोऽथ चरणौ तपोनिधेः क्षम्यतामिति वदन् समस्पृशत् ।
निर्जितेषु तरसा तरस्विनां शत्रुषु प्रणतिरेव कीर्तये ।।

(रघु. ११.८८ )

विवेचन :

रामचंद्राने परशुरामाच्या विनंतीवरून पूर्वाभिमुख होऊन बाण सोडला. तो बाण परशुरामाच्या स्वर्गाच्या मार्गातील अडसर झाला. रामाने देखील ' क्षमा करा ' असे म्हणत तपोनिधी परशुरामाच्या चरणांना स्पर्श केला. बलवंतानी बलाच्या जोरावर जिंकलेल्या शत्रूंना देखील केलेला नमस्कार कीर्तीला कारण होतो.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकातील अर्थान्तरन्यासातून रामाच्या स्वभावाचा एक विशेष सांगितला आहे. बलाढय शत्रूला जिंकल्यावर पराक्रमी शत्रूला वंदन केल्यास कमीपणा येत नाही उलट कीर्तीच वाढते, असे यातून सूचित केले आहे.

श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

सा सीतासन्निधावेव तं वव्रे कथितान्वया ।
अत्यारूढो हि नारीणामकालज्ञो मनोभवः ।।

( रघु. १२.33 )

विवेचन :

राम पंचवटीत राहत असता रावणाची धाकटी बहीण मदनातुर होऊन रामाजवळ आली. तिने सीतेसमक्ष आपल्या कुलगोत्रांचा पाढा वाचून त्यास वरले. बरोबरच आहे. स्त्रियांच्या कामाचा अतिरेक झाली की, त्या काळवेळ काही जाणत नाहीत.

निरीक्षण :

कालिदासाने या श्लोकात  अर्थान्तरन्यासाने स्त्री कामातुर झाली असता तिला काळवेळेचे बंधन राहत नाही. हे शूर्पणकेच्या वर्तनातून वर्णन केले आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीमध्ये विशेषाचा निर्देश असून त्याचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

तस्मै निशाचरैश्वर्यं प्रतिशुश्राव राघवः ।
काले खलु समारब्धाः फलं बघ्नन्ति नीतयः ।।

( रघु. १२.६९ )

**विवेचन :**

राम रावणाला ठार मारण्यासाठी समुद्राच्या किनाऱ्यावर गेला असता रावणाचा बंधू विभीषण त्यास भेटला. रामानेही त्याला रावणाचे ऐश्वर्य देण्याचे कबूल केले. योग्य वेळी लढवलेले डावपेच सफल झाल्याशिवाय राहत नाहीत.

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात राम व विभीषण यांच्या ऐतिहासिक भेटीचे वर्णन यशस्वी राजनीतीला साजेसे आहे. राजनीतीचा योग्य प्रकारे केलेला वापर सफल होतो हे या अर्थान्तरन्यास अलंकारातून स्पष्ट होते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास दाखविला आहे.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ व नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[२७]

निश्चित्य चानन्यनिवृत्ति वाच्यं त्यागेन पत्न्याः परिमार्ष्टुमैच्छत् ।
अपि स्वदेहात् किमुन्द्रियार्थाद् यशोधनानां हि यशो गरीयः ॥
( रघु. १४.३५ )

**विवेचन :**

गुप्तहेराने राजा रामाला लोकापवाद सांगितला. तेव्हा त्याच्या मनात निंदेकडे दुर्लक्ष करू की दोषरहित पत्नीचा त्याग करू? असे विचार येऊन यांपैकी कोणताही एक निश्चय होत नसल्याने रामाची चित्तवृत्ती दोलायमान झाली. त्यावेळी या अपवादाला टाळण्याचा दुसरा मार्ग नाही, असा मनाशी निश्चय करून पत्नीचा त्याग करून परिहार करण्याची इच्छा व्यक्त केली. बरोबरच आहे, यश हेच ज्यांचे धन आहे अशांना आपल्या देहापेक्षादेखील यश मोठे वाटते. मग इंद्रियांच्या विषयांपेक्षा देखील ते मोठे वाटल्यास नवल काय?

---

[२७] विभीषण वृत्तान्तसमर्थकोऽयमर्थान्तरन्यासः । ।प्रका. पृ.२०९, ओळ क्र. १२ - १3
राघवव्यवहारसमर्थको वा अयमर्थान्तरन्यासः ।
पदा. पृ. २०९, ओळ क्र. २3-२४

निरीक्षण :

प्रस्तुत अर्थान्तरन्यासाने यशोधन हे सर्वश्रेष्ठ आहे ही गोष्ट कालिदासाने सांगितली आहे. रामाने आपली प्रिय पत्नी सीतेचा त्याग करून आपली कीर्ती अबाधित ठेवली. प्रिय पत्नीपेक्षा यश अधिक महत्त्वाचे मानणारा राम होता, तो त्याचा एक विशेष होता, हे या श्लोकातून सूचित केले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे. आणि त्याचे दुसऱ्या ओळीतील साधर्म्याने समर्थन केले आहे.

या श्लोकातील कवीने 'यशोधनानां हि यशो गरीयः' या अतिशय सुंदर सुभाषिताचा प्रयोग केला आहे.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथाने अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[२८]

अवैमि चैनामनघेति किन्तु लोकापवादो बलवान् मतो मे ।
छाया हि भूमेः शशिनो मलत्वेनारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः ॥
( रघु. १४.४० )

विवेचन :

गुप्तहेराकडून तोंडून राजा रामाने लोकापवाद श्रवण केल्यावर त्याने आपल्या भावांना बोलावले आणि लोकापवाद त्यांना सांगितला. पुढे राम त्यांना म्हणाला की, ' ही ( सीता ) निर्दोष ( साध्वी ) आहे हे मी जाणतो, तथापि लोकापवादाला मी जास्त किंमत देतो. कारण पृथ्वीची छाया शुद्ध अशा चंद्रावर पडलेली पाहून लोक तो चंद्रावरील डाग आहे असे मानतात.'

निरीक्षण :

कालिदासाने या श्लोकात खगोलशास्त्रीय सुंदर घटनेचा निर्देश केला आहे. सीता ही निष्कलंक राहील व रामच कलंकित होईल, हे इथे सूचित केले आहे, चंद्र ग्रहण हा दोष चंद्राचा नसून पृथ्वीचा आहे. सीता त्यागाने तिच्याऐवजी रामाची प्रतिमा मलीन होते असे या अर्थान्तरन्यासातून सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारे साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

स शुश्रुवान् मातरि भार्गवेण पितुर्नियोगात् प्रहृतं द्विषद् वत्।
प्रत्यग्रहीदग्रजशासनं तदाज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ॥

( रघु.१४.४६ )

विवेचन :

राजा रामाने लक्ष्मणाला असे सांगितले की, 'डोहाळे लागलेल्या सीतेला तपोवनात रहाण्याची इच्छा आहे म्हणून तू तिला त्यानिमित्ताने वाल्मीकींच्या आश्रमाला सोड. ' ते ऐकून लक्ष्मणाने वडीलभावाची आज्ञा मान्य केली. पिता जमदग्नीच्या आज्ञेवरून परशुरामाने शत्रूप्रमाणे मातेवर प्रहार केलेला ऐकलेल्या लक्ष्मणानेही वडील भावाची आज्ञा मान्य केली कारण वडीलधाऱ्या व्यक्तींची आज्ञा ही केव्हाही पाळलीच पाहिजे. ती पाळताना कोणताही विचार करू नये.

निरीक्षण :

या श्लोकात कवीने लोकांसाठी एक चांगला संदेश दिला आहे की, ' माणसाने नेहमी वडीलधाऱ्या व्यक्तींच्या आज्ञेत राहवे '.

'गुरूणां हि आज्ञा शिरसावंद्या ।' हा शिष्यधर्म तर प्रसिद्ध आहे. याच्या आधारे कालिदासाने लक्ष्मण हा मोठया भावाची आज्ञा प्रमाण मानतो. या श्लोकातून अर्थान्तरन्यासाने रामाबद्दल आदर करून लक्ष्मणाचा स्वभाव-पैलू व्यक्त केले आहे.

प्रस्तुत श्लोकात लक्ष्मणाने रामाची आज्ञा पाळणे हे विशेष असून 'आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया।' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

अवेक्ष्य रामं ते तस्मिन्न प्रजहुः स्वतेजसा ।
त्राणाभावे हि शापास्त्राः कुर्वन्ति तपसो व्ययम् ॥

( रघु. १५.3 )

विवेचन :

यमुना नदीच्या काठी राहणाऱ्या मुनीजनांना लवण नामक राक्षस पीडा देत असे. तो त्यांचा विध्वंस करून धार्मिक आचरणातही बाधा आणी. तेव्हा राजा राम हा आपले रक्षण करणारा आहे असे जाणून त्या मुनींनी त्या राक्षसांवर त्यांच्या अंगी शापरूप सामर्थ्य ( तेज) असूनही त्याचा प्रयोग केला नाही. कारण रक्षकाच्या अभावी शास्त्र असलेले मुनी आपल्या तपाचा व्यय करतात. शापवाणी उच्चारल्याने अगर दिव्य शक्तीचा दुर्वापर केल्याने तपाचा क्षय होतो असे त्यांना वाटे.

---

देव्या इति समस्तनायिकागुणयोगं द्योतयत्तत्त्यागस्य दुष्करतां द्योतयति । अर्थान्तरं न्यस्यति-अपीति । प्रका. पृ. २७३ ओळ १०-११

निरीक्षण :

रक्षक नसेल तर शापरूपी अस्त्र तपाचे सामर्थ्य क्षीण होते असे इथे या श्लोकात सांगितले आहे. कालिदासाने रामाचे तेज ( सामर्थ्य ) सांगितले असून ते तपतुल्य असल्याचे म्हटले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रतिशुश्राव काकुत्स्थस्तेभ्यो विघ्नप्रतिक्रियाम् ।
धर्मसंरक्षणार्थैव प्रवृत्तिर्भुवि शार्ङ्गिणः ॥
( रघु. १५.४ )

विवेचन :

यमुनानदीकाठी राहणारे मुनी लोक लवणासुराकडून होणाऱ्या त्रासाला कंटाळून त्याच्यापासून रक्षण करावे या मागणीसीठी ते राजा रामाकडे आले. त्यांनी आपले म्हणणे रामाला सांगितल्यावर त्याने त्या मुनींना त्यांना होणाऱ्या धर्माचारणातील विघ्नाचा प्रतिकार करण्याचे अभिवचन दिले, कारण भूतलावर विष्णूचा अवतार धर्मसंरक्षणासाठीच असतो.

निरीक्षण :

पृथ्वीतलावर विष्णूने अवतार घेण्याचे मुख्य प्रयोजन धर्मरक्षण आहे हे या अन्य पौराणिक घटनेच्या आधारे कालिदासाने या श्लोकात सांगितले आहे. राम हा विष्णूचा अवतार आहे, या संकेताला कालिदासाने अर्थान्तरन्यासाने पुष्टी दिली आहे आणि रामाचे उदात्तीकरण केले आहे.

धर्माच्या रक्षणासाठी ईश्वराचे अवतार होतात हा विचार भगवद्गीतेत आढळतो. तो असा,

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूणां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ [२९]

याचा आधार कवीने घेतला आहे.

---

[२९] गीता. ४.७-८, पृ. ११०

प्रस्तुत श्लोकात रामाने मुनींना लवणासुराच्या त्रासापासून वाचविण्याचे अभिवचन देणे हे विशेष असून त्याचे समर्थन विष्णूचा अवतार भूतलावर धर्मरक्षणासाठीच होतो या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

अपशूलं तमासाद्य लवणं लक्ष्मणानुजः ।
रुरोध संमुखीनो हि जयो रन्ध्रप्रहारिणाम् ॥
( रघु. १५.१७ )

**विवेचन :**

यमुना नदीकाठच्या मुनींना लवण नामक राक्षसाकडून पीडा होऊ लागली. तेव्हा ते रामाकडे मदत मागण्यास आले. रामाने लवणासुराचा बंदोबस्त करण्याची जबाबदारी शत्रुघ्नावर सोपविली. शत्रुघ्नाने लवणाला त्याच्याजवळ शूल नसताना गाठून अडविले. कारण शत्रूचे छिद्र पाहून त्यावर आघात करणारांपुढे जय हात जोडून उभा असतो.

**निरीक्षण :**

राजनीतीतील महत्त्वाचे तत्त्व कालिदासाने इथे वर्णन केले आहे. शत्रुचे रहस्य जाणून त्याप्रमाणे माहीत झालेल्या छिद्रावर आघात केला असता जय हमखास मिळतो हे या अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे. या आधारे लवण राक्षसाजवळ शूळ नव्हता, ही उणीव जाणून घेऊन त्यावर शत्रुघ्नाने प्रहार केला व त्याच्यावर जय मिळविला. इथे शत्रुघ्नाचा मुत्सद्दीपणा दिसून येतो.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने या श्लोकात अर्थान्तरन्यास आहे.

अथेतरे सप्त रघुप्रवीरा ज्येष्ठं पुरोजन्मतया गुणैश्च ।
चक्रुः कुशं रत्नविशेषभाजं सौभ्रात्रमेषां हि कुलानुसारि ॥
( रघु. १६.१ )

**विवेचन :**

राजा रामाच्या निर्याणानंतर लव, तक्षक, पुष्कल, अंगद, चन्द्रकेतू, शत्रूपाती व सुबाहू हे सात रघुकुलातील वीर अगोदर जन्मल्यामुळे आणि ( शौर्यादी ) गुणांमुळे वडील असलेल्या कुशाला त्यांनी प्रमुख केले. कारण चांगला भ्रातृभाव त्यांच्यात परंपरागतच होता.

निरीक्षण :

कालिदासाने अर्थान्तरन्यासद्वारा सर्व राज्याचा भार कुशाकडे आल्याचे समर्थन केले आहे. कवीने इथे रघुकुलाचे विशेष सांगितले आहेत. ते असे-१ ) जेष्ठ बंधूस राज्यप्राप्ती व २ ) सौहार्द्र भ्रार्तृभाव. त्यामुळेच इतर बंधूंनी कलह न करता कुशाचे नेतृत्व स्वीकारले.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन चतुर्थ पादातील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास आहे.

प्रस्तुत श्लोकात नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[30]

जयश्रियः संवननं यतस्तदामुक्तपूर्वं गुरुणा च यस्मात् ।
सेहेऽस्य न भ्रंशमतो न लोभात् स तुल्यपुष्पाभरणो हि धीरः ॥
( रघु. १६.७४ )

विवेचन :

एकदा राजा कुश आपल्या स्त्रियांसह शरयू नदीत जलक्रीडा करीत असता त्याच्या हातातील कंकण नकळत पाण्यात पडले. स्नानानंतर वस्त्रे बदलताना ही गोष्ट त्याच्या ध्यानात आली. तेव्हा त्याला फार दुःख झाले. ज्याअर्थी ते कंकण त्याने धारण केले होते, त्या अर्थी ते गळून पडणे त्याला सहन झाले नाही. कारण लोभामुळे नव्हे तर धीर पुरुष फुले व अलंकार सारखेच मानतात.

निरीक्षण :

या श्लोकात कालिदासाने कुशाचा स्वभाव विशेष सांगितला आहे. कुलपरंपरेने प्राप्त झालेल्या विजय प्राप्त करून देणाऱ्या कंकणाकडे तो अलंकार म्हणून पाहत नव्हता तर ते एक विजयाचे प्रतीक मानीत होता. म्हणून ते नदीत पडल्याने दुःख झाले. ते लोभामुळे नव्हे कारण धैर्यवान पुरुष अलंकार आणि फुले यांना सारखेच मानतात असे कवीने सांगितले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास संभवतो.

विभूषणप्रत्युपहारहस्तमुपस्थितं वीक्ष्य विशांपतिस्तम् ।
सौपर्णमस्त्रं प्रतिसंजहार प्रह्वेष्वनिर्बन्धरुषो हि सन्तः ॥
( रघु. १६.८० )

विवेचन :

[30] पद्य. पृ. ३२२, ओळ क्र. १३–१४

शरयू नदीत पडलेल्या दिव्य कंकणाचा शोध कुश राजाने घेतला. पण त्याचा शोध लागला नाही. तेव्हा ते कंकण डोहात राहणाऱ्या कुमुद नामक नागानेच घेतले असावे असा विचार करून त्याचा नाश करण्याकरिता त्याने गरुडास्त्र सज्ज केले, त्याने ते अस्त्र सोडण्यापूर्वीच त्या डोहातून आपल्या कन्येला पुढे पुढे करून तो नागराज वर आला, राजाने ते कंकण परत देण्याकरिता हाती घेतलेल्या त्या कुमुदाला वर आल्याचे पाहून आपले गरुडास्त्र आवरते घेतले कारण सत्पुरुष विनयापुढे कठोर होत नाहीत.

**निरीक्षण :**

कुशाने कंकण घेऊन आलेल्या नागराजावर गरुडास्त्र सोडले नाही यांचे तात्पर्य कालिदासाने या अर्थान्तरन्यासात सांगितले आहे.

विनम्रापुढे मोठे लोक कठोर होत नाहीत या अर्थान्तरन्यासाद्वारा कालिदासाने कुशाचा मोठेपणा वर्णन केला आहे. कुश हा एक संयमी व समयोचित अस्त्रांचा वापर करीत होता असे इथे दिसून येते.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश असून त्याचे चौथ्या पादाने सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. त्यामुळे या ठिकाणी अर्थान्तरन्यास संभवतो.

अपथेन प्रववृते न जातूपचितोऽपि सः ।
वृद्धौ नदीमुखेनैव प्रस्थानं हि सरित्पतेः ॥
( रघु. १७.५३ )

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोकात अतिथीच्या सामर्थ्याचे वर्णन केले आहे. कवी म्हणतो की, तो अतिथी सर्व बाजूंनी समृद्ध होता. तरी वाममार्गाने केव्हाही गेला नाही. भरतीच्या वेळी समुद्राच्या पाण्याचा प्रसार नदीच्या मुखातूनच होत असतो.

याचा अर्थ असा की समुद्राला भरती आली म्हणून समुद्र ज्याप्रमाणे मर्यादा सोडीत नाही त्याप्रमाणे अतिथी सर्वैश्वर्यसंपन्न होता तरी त्याच्या हातून मयदिचा अतिरेक कधीही झाला नाही.

**निरीक्षण :**

प्रस्तुत अर्थान्तरन्यासाने अतिथी राजाच्या स्वभावाचा विशेष वर्णन केला आहे. तो वाममार्गाने कधीही वागला नाही असे इथे सूचित होते.

या श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

दुर्गाणि दुर्ग्रहाण्यासंस्तस्य रोद्धुरपि द्विषाम् ।
न हि सिंहो गजास्कन्दी भयाद् गिरिगुहाशयः ॥
( रघु. १७.५४ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात कुशपुत्र अतिथीचे किल्ले कसे बळकट असत हे सांगितले आहे. शत्रूवर चढाई करणाऱ्या अतिथीचे किल्ले हल्ला करण्यास कठीण असत. कारण हत्तीवर चालून जाणारा सिंह भीतीने पर्वताच्या गुहेचा आश्रय करीत नाही.

इथे शत्रूवर हल्ला करणारा अतिथी विश्रांतीसाठी किल्ल्यांचा आश्रय करीत असे. पण याचा असा अर्थ नव्हे की तो शत्रूला भीत असे.

निरीक्षण :

कुशपुत्र अतिथीने राज्याची सुरक्षा व्यवस्था मजबूत केली, हे अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे. त्याने राज्य मजबूत करण्यासाठी किल्ले बांधले होते.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

शक्येष्वेवाभवद् यात्रा तस्य शक्तिमतः सतः ।
समीरणसहायोऽपि नाम्भःप्रार्थी दवानलः ॥
( रघु. १७.५६ )

विवेचन :

अतिथी राजाचे शत्रूवर स्वारी करीत असता कोणते धोरण असे याचे वर्णन करताना प्रस्तुत श्लोक आला आहे. कवी म्हणतो की शक्तिमान असलेल्या त्या राजाच्या शक्य असतील तेथेच स्वाऱ्या होत असत. वाऱ्याचे साहाय्य मिळाले तरी वणवा पाण्याला जाळण्याची इच्छा करीत नाही.

निरीक्षण :

अतिथी राजा समर्थ असून ज्या ठिकाणी आवश्यक असेल, शेजारील राष्ट्रे पीडादायक ठरली तरच त्यांच्यावर चाल करून जात असे. तो विनाकारण दुसऱ्यावर आक्रमण करून आपल्या सैन्यशक्तीचा गैरवापर करीत नसे, हे या अर्थान्तरन्यासाने इथे सुचविले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेषाचे निर्देशन असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधमर्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास आहे.

कोशादाश्रयणीयत्वमिति तस्यार्थसंग्रहः ।
अम्बुगर्भो हि जीमूतश्चातकैरभिनन्द्यते ॥
( रघु. १७.६० )

**विवेचन :**

राजा अतिथी आपला खजिना का समृद्ध करीत होता याचे वर्णन प्रस्तुत श्लोकात आले आहे. कवी म्हणतो की, द्रव्य भांडार असले म्हणजे मनुष्य आदरणीय होतो म्हणून राजा अतिथी द्रव्यसंचय करीत असे. कारण पाण्याने भरलेल्या मेघाचेच चातकाकडून अभिनंदन होते.

**निरीक्षण :**

कोश ही राज्याची एक प्रकृती आहे. ती समृद्ध असेल तर राजा आदरणीय ठरतो. ही गोष्ट सुंदर अर्थान्तरन्यासाने कालिदासाने सांगितली आहे. पाण्याने परिपूर्ण असलेल्या मेघाचे चातकपक्षी त्याप्रमाणे संपन्न कोश असलेला अतिथी राजा आदरास पात्र ठरला. थोडक्यात त्याने कोश प्रकृतीवर विशेष भर दिला होता. या श्लोकातून कवीने राजाच्या राजनीतीचा एक पैलू दाखविला आहे.

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्तान्तरन्यास संभवतो.

तमात्मसंपन्नमनिन्दितात्मा कृत्वा युवानं युवराजमेव ।
सुखानि सोऽभुङ्क्त सुखोपरोधि वृत्तं हि राज्ञामपरुद्धवृत्तम् ॥
( रघु. १८.१८ )

**विवेचन :**

रघुवंशातील अठराव्या सर्गात अनेक राजांची वर्णने अगदी संक्षेपाने कवीन वर्णिली आहेत. पारियात्र राजाची माहिती सांगताना कवीने असे म्हटले आहे की, अहिनगू राजाला पारियात्र नामक पुत्र झाला. या पारियात्राला पुढे भरदार छातीचा व उदार असा शिल नामक पुत्र झाला. त्या शिलाला तरुणपणीच युवराज करून त्या पारियात्राने सुखाचा उपभोग घेतला. कारण राजे लोकांचे आयुष्य बंदिवासाप्रमाणे सुखोपभोगाला आंचवलेले असते.

निरीक्षण :

पारियात्र राजाने मुलावर राज्यकारभार सोपवून सुखोपभोग घेतला, त्याचे समर्थन कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा केला आहे. या श्लोकात राजे लोकांची व्यथा योग्यरीत्या कवीने मांडली आहे. त्यांचे आयुष्य सुखापासून वंचित असते.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळींतील विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

प्रस्तुत श्लोकात अरुणगिरीनाथ व नारायण पण्डित यांनी अर्थान्तरन्यास सांगितला आहे. [३१]

लोकेन भावी पितरेव तुल्यः संभावितो मौलपरिग्रहत्सः ।
दृष्टो हि वृण्वन् कलभप्रमाणोऽप्याशाः परोवातमवाप्य मेघः ॥
( रघु. १८.३८ )

विवेचन :

प्रस्तुत श्लोकात ध्रुवसंधीचा पुत्र सुदर्शनाचे वर्णन आले आहे. एकदा ध्रुवसंधी राजा मृगया करण्यासाठी वनात गेला असता एका सिंहाने त्यास ठार केले. तेव्हा त्याच्या प्रधानांनी त्याचा पुत्र असलेल्या कुमार सुदर्शनाचा राज्याभिषेक केला. तो बलराजा मुकुट धारण केल्यामुळे पित्यासारखाच होईल अशी लोकांनी कल्पना केली. कारण हत्तीच्या पोताएवढा लहानसा ढगदेखील वारा मिळाला की दिशा व्यापून टाकताना दिसतो.

निरीक्षण :

कुमार सुदर्शनास बालपणीच राज्यप्राप्ती झाली. पुढे तो पराक्रमी होईल हे कालिदासाने निसर्गातील एका घटनेच्या आधारे काव्यात्मक शैलीत वर्णन केले छोटासा ढग वारा मिळाला असता सर्व दिशा व्यापतो त्याप्रमाणे तो आपले साम्राज्य पसरवीत तो समर्थपणे राज्यकारभार पार पाडील हे सुचविले आहे.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत ओल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

दृष्टदोषमपि तन्न सोऽत्यजत् सङ्गमं तु भिषजामनाश्रवः ।
स्वादुभिस्तु विषयैर्हृतस्तो दुःखमिन्द्रियगणो निवार्यते ॥
( रघु. १९.४९ )

---

[३१] प्रका. पृ. ४०९, ओळ क्र. २० आणि पदा. पृ. ४१०, ओळ क्र५.

**विवेचन :**

प्रस्तुत श्लोकात अग्निवर्ण राजा विषयासक्त किती होता हे वर्णिले आहे. अत्याधिक विषयोपभोगामुळे त्याला निरनिराळ्या व्याधी उत्पन्न झाल्या. तेव्हा वैद्यांनी त्यास विषयोपभोगापासून दूर राहण्यास सांगितले. तरीही विषयातील दोष दिसत असतानाही वैद्यांचे न ऐकता विषयासक्ती उत्पन्न करणाऱ्या वस्तूंना त्याने सोडले नाही. कारण गोड वाटणाऱ्या विषयांनी इंद्रियगणाला आपल्या आधीन करून घेतले की तेथून मोठया कष्टांनी त्यास निवारिता येतो.

**निरीक्षण :**

कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा इंद्रियसमूहाची विषयाच्या गुलामीतून सुटका होणे कठीण असते, हे नेहमीच्या अनुभवाच्या आधारे सांगितले आहे. अग्निवर्ण राजाच्या विषयलोलुपवृत्तीचे चित्रण इथे केलेले दिसते.

या श्लोकात पहिल्या ओळींत विशेषाचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

# -: प्रकरण पाचवे : -

# कालिदासाच्या नाटकातील अर्थान्तरन्यास

**प्रस्तावना :**

कालिदासाने मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय आणि अभिज्ञानशाकुन्तल ही तीन नाटके लिहिली असली तरी यांपैकी अभिज्ञानशाकुन्तल या नाटकामुळे त्याला फार प्रसिद्धी मिळाली. त्यामुळेच

काव्येषु नाटकं रम्यं तत्र रम्यं शकुन्तला । असे एका सुभाषितकाराने म्हटले आहे, हे सर्वविदित आहे.

कालिदासाने लिहिलेल्या तिन्ही नाटकांचे अध्ययन केले असता असे दिसून येते की, त्याने अभिज्ञानशाकुंतल नाटकात ३६ ठिकाणी अर्थान्तरन्यासाचे प्रयोग योजिले आहेत आणि उरलेल्या दोन्ही नाटकांत प्रत्येकी ७ प्रयोग योजिले आहेत.

मेघदूत, रघुवंश प्रमाणेच या नाटकांत प्रामुख्याने सामान्याद्वारा विशेषाचे समर्थन हा प्रकार प्रामुख्याने दिसून येतो. सामान्याद्वारा विशेषाचे साधर्म्याने समर्थनाची २४ उदाहरणे आणि सामान्याद्वारा विशेषाचे वैधर्म्याने समर्थनाची १० उदाहरणे अभिज्ञानशाकुंतलमध्ये आहेत.

या नाटकांचा अर्थान्तरन्यासदृष्टया अभ्यास करताना पुढील टीकांचा उपयोग करण्यात आला आहे.मालविकाग्निमित्र नाटकावरील सहृदयतिलक राम पिशरोटी यांची सारार्थदीपिका, रमाशंकर पाण्डे यांची संस्कृत टीका, रामचंद्र मिश्र यांची प्रकाश टीका, श्रीरंग वर्मा यांची सरला टीका, अप्पाशास्त्री राशिवडेकर यांची बालप्रबोधिनी टीका आणि काट येम भूपाल यांची कुमारगिरीराजिया या टीकांचा वापर केला आहे.

विक्रमोर्वशीय नाटकावरील काट येम भूपाल यांची कुमारगिरीराजिया, रंगनाथांची प्रकाशिका, कोणेश्वरांची कोणेश्वरी, सुरेंद्रनाथ शास्त्री यांची कल्पलता, रामचंद्र मिश्र यांची प्रकाश आणि जीवानंद विद्यासागर यांची संस्कृत टीका या टीकांचा वापर केला आहे.

अभिज्ञानशाकुंतलम् हे सर्वात लोकप्रिय नाटक असल्याने त्यावर अनेक टीकाग्रंथ उपलब्ध आहेत. त्यातील पुढील टीकांचा आधार घेण्यात आला आहे. राघवभट्ट यांची अर्थद्योतनिका, काट येम भूपाल यांची कुमारगिरीराजिया, अभिराम यांची दृङ मन्त्रदर्शन, नीलकण्ठ यांची नीलकण्ठी, घनश्याम यांची संजीवन, श्रीनिवासाचार्यांची शाकुंतलव्याख्या, श्री शंकरांची रसचंद्रिका, श्री नरहरींची टिप्पणी, नारायणशास्त्री खिस्ते यांची लक्ष्मी, गजेंद्रगडकर यांची बालबोधिनी, शतावधान श्री निवासचार्यांची सहृदय या टीकांचा यथोचित उपयोग केला आहे. विवेचनप्रसंगी त्या त्या टीकाकारांचा अभिप्राय नोंदविला आहे.

या प्रकरणाची मांडणी करताना प्रथम मालविकाग्निमित्र नाटकातील उदाहरणे, नंतर विक्रमोर्वशीयमधील उदाहरणे व त्यानंतर अभिज्ञान शाकुंतल नाटकातील उदाहरणे दिली आहेत. प्रत्येक श्लोकाचे विवेचन व निरीक्षण या रूपात त्यांची चर्चा केली आहे.

आता प्रत्येक नाटकातील अर्थान्तरन्यास असलेल्या श्लोकांचे क्रमशः विवेचन करीत आहोत.

**अर्थं सप्रतिबन्धं प्रभुरधिगन्तुं सहायवानेव ।**
**दृश्यं तमसि न पश्यति दीपेन विना सचक्षुरपि ॥**

( माल. १.९ )

**विवेचन :**

राजाने विदुषकास एखादी क्लृप्ती काढून चित्रात पाहिलेल्या मालविकेला प्रत्यक्ष पहावयास मिळेल असे करण्यास सांगितले होते. विदुषकाने याबाबत योजलेल्या उपायांबाबत राजाच्या कानात सांगितले असता राजा त्यास असे म्हणतो की, ' शाब्बास मित्रा ! मोठ्या चतुराईने आखणी केलेल्या कामात यश मिळणे कठिण असले तरी या कामात आम्हांला आशा उत्पन्न झाली आहे, कारण सहाय्यक असलेलाच अडथळ्यांनी भरलेली गोष्ट संपादण्यास समर्थ ठरतो. डोळे असलेला देखील दिव्याशिवाय अंधारात पाहू शकत नाही.'

**निरीक्षण :**

कालिदासाने कार्यसिद्धीसाठी एकाचे कर्तृत्व कारणीभूत नसून त्याला नेहमी साहाय्याची आवश्यकता असते. तसेच ' संघशक्ती कलौ युगे ।' हा सार्वत्रिक अनुभव लक्षात घेऊन त्याच्या आधारे राजाने मालविकेची प्राप्ती विदुषकासारख्या मित्राशिवाय होणे संभवणीय नाही हे इथे सांगितले आहे. यासाठी त्याने डोळ्यांचा दाखला दिला आहे. अंधारात दिवा डोळ्यांना वस्तूंचे ज्ञान होण्यास मदत करतो, त्याप्रमाणे कार्य होण्यास अडथळे असतील तर साहाय्यकाची आवश्यकता असते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचे निर्देशन आहे. त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. जसे डोळस माणसाला अंधारात दिव्याच्या मदतीने वस्तूचे ज्ञान होते तसे विदुषकाच्या मदतीने राजाची कार्यसिद्धी होईल हाच या श्लोकाचा आशय आहे.

प्रस्तुत श्लोकात एकाच टीकाकाराने अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.[1]

---

[1] सारार्थ. पृ. २३ ओळ क्र.१४

अनिमित्तमिन्दुवदने किमत्रभवतः पराङ्मुखी भवसि ।
प्रभवन्त्योऽपि हि भर्तृषु कारणकोपाः कुटुम्बिन्य : ॥
( माल. १.१८ )

**विवेचन :**

नाटयाचार्य गणदास आणि हरदत्त या दोहोंपैकी श्रेष्ठ कोण या कलहावर निर्णय कसा करावा याबाबत राणी धारिणीने ' दोघांनी आपल्या तालमीचे प्रात्यक्षिक – भगवतींना दाखवावे ' असा आग्रह धरला. पण ही भूमिका भगवती कौशिकींनाच मान्य नसते. शेवटी राणी संतापून तोंड फिरवून बसते. त्यावेळी राणीची समजून काढण्यासाठी ती तिला म्हणते, 'हे चंद्रानने, तू राजापासून विनाकारण तोंड फिरवतेस कारण विवाहित स्त्रिया पतीवर सत्ता गाजविणाऱ्या असूनही कारणानेच रागावतात.'

**निरीक्षण :**

कालिदासाने सुज्ञ व समंजस स्त्रियांचा स्वभाव जाणला आहे. विवाहित स्त्रिया पतीवर सत्ता चालवीत असूनही योग्य ठिकाणीच रागावतात. या स्वभावानुसार या अर्थान्तरन्यासाने भगवती कौशिकी राणीची समजूत काढते. ती सुज्ञ व समंजस स्त्री असल्याने तिने राजावर अकारण रागावू नये असा सल्ला दिला आहे, ही गोष्ट या अर्थान्तरन्यासातून समजून येते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे. आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. वास्तविक पाहता राणीचा राग भगवती कौशिकी (परिव्राजिका) हिच्यावर आहे पण ती मात्र तसे न दाखवता राणी राजावरच रागावली आहे असा अर्थ घेते.

या श्लोकात सहृदयतिलक राम पिशरोदी, रमाशंकर पाण्डेय, रामचंद्र मिश्र, श्रीरंग वर्मा आणि अप्पाशास्त्री राशिवडेकर यांनी अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[१अ] अप्पा शास्त्री राशिवडेकर यांनी विश्वनाथाने दिलेले अर्थान्तरन्यासाचे लक्षण उद्धृत केले आहे.[२]

---

[१अ] अत्रार्थान्तरन्यासः । सारार्थ. पृ. १७, ओळ क्र. २९.
अत्र सामान्येन विशेषसमर्थन रूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । रमाशंकर पाण्डेय, पृ. ३५, ओळ क्र. २०.
प्रकाश पृ. ४५, ओळ क्र. १७ – १८.
कुटुम्बिन्य . . . . कारणेन . . . कोपःभवन्ति । न तु निष्कारणं कुप्यन्ति इति भावः ।
अत्र कुलीनस्त्रीणां सकारणं कोपो भवतीति सामान्येन वैधर्म्येन तव कोपोऽयमनुचितः ।
इति विशेषार्थस्य समर्थनादर्थान्तरन्यासोलङ्कारः । सरला पृ. 33, ओळ क्र १८ – २१
अत्र कुलीनानां सकारणः कोपः इति सामान्येन वैधर्म्येण राज्ञीकोपानुचितत्वं समर्थ्यत इति वैधर्म्येण सामान्येन विशेषसमर्थन रूपोर्थान्तरन्यासः । बाल. पृ. ४५. ओळ क्र. ११ – 13.

[२] बाल. पृ. ४५ ओळ क्र. १२– १६. आणि सा.द. दशम परिच्छेद कारिका क्र. ६१. पृ. ५७९.

अलमन्यथा गृहीत्वा न खलु मनस्विनि मया प्रयुक्तमिदम् ।
प्रायः समानविद्याः परस्परयशः पुरोभागाः ।।

( माल. १.२० )

**विवेचन :**

विदुषकाच्या नियोजनाप्रमाणे हरदत्त आणि गणदास यांच्या शिष्यांच्या नृत्याच्या प्रात्यक्षिकाचे आयोजन करण्याचे ठरले आणि असा निर्णय झाला की, ' छलित ' हा प्रकार प्रयोगाला कठीण असल्याने त्याचाच प्रयोग करावा. पुढे परिव्राजिकेने असे सुचविले की सर्वांगाचा मोहकपणा प्रकट व्हावा म्हणून विद्यार्थाचा प्रवेश अगदी झिरझिरीत वेषभूषेने व्हावा. ते ऐकून राजाकडे पाहून राणी म्हणते की, ' आर्यपुत्रांनी जर राजकार्यात एवढी उपाययोजनांची चतुराई दाखविली तर फार छान होईल'. तेव्हा या श्लोकात राजा असे म्हणतो, ' तू गैरसमज करुन घेऊ नकोस. खरोखरच हा बनाव मी घडवून आणलेला नाही. समान विद्या असलेले विद्वान एकमेकांच्या कीर्तिबद्दल मत्सरी असतात हेच त्याचे कारण आहे '. अर्थात हा सर्व प्रकार राजाच्या इच्छेनुसारच झाला आहे ही गोष्ट राणीच्या ध्यानात यायला वेळ लागला नाही.

**निरीक्षण :**

एकाच विद्येत पारंगत असलेले विद्वान परस्परांच्या कीर्तीचा मत्सर करतात हा विद्वान लोकांचा विशेष लक्षात घेऊन कालिदासाने हरदत्त व गणदास या दोघांचे स्वभाव वर्णन केले आहेत. कथानकातील एक महत्त्वाची घटना या अर्थान्तरन्यासाने सांगून कथाविकासात महत्त्वाची भर घातली आहे.

प्रस्तुत श्लोकात दोन्ही नाटयाचार्यात भांडण लावून नृत्याच्या प्रात्यक्षिकाद्वारा मालविकेला पाहणे हा बनाव राजाने घडवून आणण्याचे नाकारणे हे विशेष असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील , ' बहुधा समान विद्या असणारे लोक एकमेकांच्या कीर्तीबद्दल मत्सरी असतात ' या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

या श्लोकात कालिदासाने ज्ञानी लोकांच्या स्वभावाचे वर्णन करुन अग्निमित्र राजाची मधुलोलुपवृत्ती सांगितलेली आहे.

रमाशंकर पाण्डेय, रामचंद्र मिश्र आणि अप्पाशास्त्री राशिवडेकर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[3]

---

[3] अत्र सामान्येन विशेषसमर्थनरूपो ऽर्थान्तरन्यासः ।
रमाशंकर पाण्डेय, पृ. ३९, ओळ क्र. २२.
प्रकाश पृ. २६, ओळ क्र. ६. उक्तपूर्वलक्षणोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः बाल. पृ. ४९, ओळ क्र. २४

मन्दोऽप्यमन्दतामेति संसर्गेण विपश्चितः।
पङ्कच्छिदः फलस्येव निकषेणाविलं पयः ॥

( माल. २.७ )

विवेचन :

मालविकेने चतुष्पदी गात नृत्याचे प्रदर्शन केल्यानंतर रंगमंचावरून जाऊ लागते तेव्हा तिथे असलेला विदुषक तिला थांबावयास सांगतो. तो तिला म्हणतो की, ' आपण नृत्यातला थोडासा क्रियाभाग विसरुन गेलात. तेव्हा जरा थांबा ' हे ऐकून गणदास तिला थांबण्याची सूचना देतो आणि ती मागे वळून थांबते. यावर राणी राजाला उद्देशून म्हणते की, ' गौतमाचे बालणे आर्यपुत्र मनावर घेणार आहेत?' तेव्हा गणदास तिला उद्देशून म्हणतो की, ' राणीसाहेब, असे म्हणू नका. महाराजांच्या सान्निध्याने गौतमाच्या ठिकाणी सूक्ष्म व चिकित्सक बुद्धी असणे शक्य आहे, पहा की – ' विद्वान माणसाच्या सहवासाने मंद बुद्धीचा मनुष्य देखील तल्लख होतो; चिखल नष्ट करणाऱ्या कतक–फलाचे सान्निध्याने गढूळ पाणीही स्वच्छ होते. '

निरीक्षण :

या श्लोकात कालिदासाने विद्वानांच्या संगतीचा प्रभाव जाणून विदूषकाच्या ठिकाणी आलेले बद्धिचातुर्य व शहाणपण हा राजाच्या संगतीचा परिणाम आहे हे अर्थान्तरन्यासाने सांगितले आहे. याचा अर्थ असा की, राजाच्या रसिक व संगीतप्रिय स्वभावामुळे विदूषकालाही त्यात जाण आली आहे. कतक फळ गढूळ पाणी स्वच्छ करते त्याप्रमाणे राजाच्या सहवासात विदूषकाची बुद्धी तल्लख झाली आहे हे अर्थान्तरन्यासाद्वारा राणीला गणदास पटवून देतो.

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत सामान्याचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या विशेषद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून या ठिकाणी अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

श्रीहृदयतिलक राम पिशरोदी यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[४] वास्तविक विदूषकाला नृत्याबाबत काहीही माहिती नव्हते. त्याचा उद्देश फक्त मालविकेला तिथे जास्त वेळ थांबविणे होता. या माध्यमातून राजाने तिला जास्त वेळ पाहवे हेच अभिप्रेत होते.

संगतीचा कसा सुपरिणाम होतो या संदर्भात काही प्रसिद्ध श्लोक संस्कृत साहित्यात आढळतात. जसे,



[४] सारार्थ. पृ. ५२, ओळ क्र. १२

जाड्यं धियो हरति सिञ्चति वाचि सत्यं मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ।
चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥[५]

भावज्ञानानन्तरं प्रस्तुतेन
प्रत्याख्याने दत्तयुक्तोत्तरेण ।
वाक्येनेयं स्थापिता स्वे निदेशे
स्थाने प्राणाः कामिनां दूत्यधीनाः

( माल. ३.१४ )

**विवेचन :**

तिसऱ्या अंकामध्ये बकुलावलिका मालविकेच्या मनात राजाविषयी प्रीतिभाव जागृत करते. मालविका तिला राणी धारिणीची भीती वाटत असल्याचे सांगून या संकटात तूच माझी पाठराखीण हो असे सांगते. तेव्हा ती तिला असे म्हणते की, ' मी नावाची बकुलावलिका आहे म्हटले ! ' हे ऐकल्यावर राजा तिची प्रशंसा करताना म्हणतो की, ' शाब्बास ! बकुलावलिके शाब्बास ! प्रेमाविषयीचे तिचे इंगित जाणून घेतल्यावरच आरंभ केलास, त्यात तिच्या विरोधी प्रश्नांना योग्य उत्तरे दिलीस आणि अशा रीतीने हिला (मालविकेला ) स्वतःच्या कामगिरीत पक्की केलीस. प्रणयीजनांचे प्राण दूतींच्या हातात (कामगिरीवरच अवलंबून ) असतात, असे जे म्हणतात ते योग्यच आहे.

**निरीक्षण :**

कालिदासाने आपल्या दूत कल्पनेचा वापर इथे केला आहे. प्रेमप्रकरणात दूतीचे कार्य महत्त्वाचे असते. कारण प्रियकर व प्रेयसी यांच्या मीलनात येणाऱ्या अडचणी दूर कराव्यात हा त्याचा महत्त्वाचा भाग असतो. बकुलावलिकाही त्याला अपवाद नाही. कवीने या अर्थान्तरन्यासद्वारा दूतीच्या हातात प्रणयीजनांचे प्राण असतात असे सांगून राजा व मालविका यांचे मीलन बकुलावलिकेद्वारा होईल हे सूचित केले आहे. कथानकाच्या विकासाच्या दृष्टीने बकुलावलिका ही दूतीचे काम पार पाडते

---

५- नी.श. पृ. ११

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश केला आहे आणि चौथ्या ओळीत ' स्थाने प्राणाः कामिनां दूत्यधीनाः । ' या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने विशेषाचे समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास आहे.

या श्लोकात कालिदासाने नायकाच्या प्रेमसाफल्यामध्ये दूतीची कामगिरीच महत्त्वाची असल्याचे सांगितले आहे.

सहृदयतिलक पिशरोदी यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[६]

कदा मुखं वरतनु कारणादृते तवागतं क्षणमपि कोपपात्रताम् ।
अपर्वणि ग्रहकलुषेन्दुमण्डला विभावरी कथय कथं भविष्यति ।।

(माल. ४.१६ )

## विवेचन :

चौथ्या अंकात विदूषकाच्या योजनेप्रमाणे धारिणी राणीच्या अंगठीचा उपयोग करून कैदेतून मालविकेची सुटका झाली. तिला समुद्रगृहात पोहोचवून राजाला ही बातमी सांगण्यासाठी तो येतो. राजा समुद्रगृहात मालविकेसह असतानाच तिथे इरावती येते. तेव्हा ती त्या सर्वांना पाहून बकुलावलिकेला म्हणते की, ' दुतीच्या कामात तू तुझी प्रतीक्षा पूर्ण केलीस त्या बद्दल तुझे अभिनंदन! ' यावर बकुलावलिका इरावती राणीला म्हणते की, 'क्षमा करा ! बेडूक ओरडले म्हणून इंद्रदेव पृथ्वीला विसरतात काय ? मी काय केले ते महाराजांनाच विचारा.' यावर विदूषक म्हणाला की, ' असे म्हणू नका. आपण केलेला अपराध ते केवळ तुमच्या दर्शनाने विसरले आणि तुम्ही मात्र अजून रागावलेल्याच '. यावर इरावती त्यास म्हणाली, 'रागावूनही मी काय करू शकणार ?' ते ऐकून राजा तिला म्हणाला की, 'निष्कारण तू रागावणे योग्य नव्हे. हे सुंदरी, कारणाशिवाय तुझा चेहरा कधी तरी कोपाचे आश्रयस्थान झाला आहे का ? ग्रहणाने चंद्रबिंब काळवंडलेली रात्र पौर्णिमेखेरीज कशी असेल ?'

## निरीक्षण :

कालिदासाने इथे खगोलशास्त्रातील एका घटनेच्या आधारे अर्थान्तरन्यास केला आहे. चंद्रग्रहणाशिवाय पौणिमेची रात्र काळवंडत नाही. त्याप्रमाणे कारणाशिवाय तुझ्या मुखावर कोपाचा आश्रय होत नाही. असे इथे सांगितले आहे. इथे मनुष्य स्वभावही कवीने लक्षात घेतला आहे. विनाकारण कोणी कोणावर रागवत नाही. शिवाय रागावल्यावर त्याच्या मनावर व चेहऱ्यावर परिणाम होतो हे मनोवैज्ञानिक सत्य दिसून येते.

प्रस्तुत श्लोकात कारणाशिवाय इरावतीच्या चेहऱ्याने कापाचा आश्रय न करणे हे विशेष असून त्याचे समर्थन ग्रहणाशिवाय पौणिमेची रात्र काळवंडत नाही या सामान्य

उक्तिद्वारा वैधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे. या श्लोकात कालिदासाने स्त्रीने पतीशी वर्तन करताना त्याच्यावर विनाकारण कोप धरू नये हा उपदेश केला असून त्याच्या स्पष्टीकरणासाठी पौर्णिमेलाच चंद्रग्रहण होते या खगोलशास्त्रातील गोष्टीचा उपयोग केला आहे.

प्रस्तुत श्लोकात कोणाही टीकाकाराने अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशित केला नाही. तथापि इथे सामान्य-विशेष-भावावर आधारित अर्थान्तरन्यास अलंकार असल्याचे दिसून येते.

प्रतिपक्षेणापि पतिं सेवन्ते भर्तृवत्सलाः साध्व्यः ।
अन्यसरितामपि जलं समुद्रगाः प्रापयन्त्युदधिम् ॥

( माल. ५.१९ )

विवेचन :

नाटकाच्या शेवटी धारिणी राणी राजा व मालविका यांच्या विवाहास संमती देते आणि राजाला सांगते की, आता तरी मालविकेचा राजाने स्वीकार करावा. तेव्हा राजा त्यास संमती देतो. तेव्हा परिव्राजिक राणीला म्हणते की,
'पतिनिष्ठा साध्वी स्त्रिया वैरी निर्माण करून ( सवत पत्करूनही ) पतीची सेवा करतात. समुद्राकडे जाणाऱ्या मोठया नद्या इतर शेकडो लहान नद्यांना समुद्राकडे घेऊन जातात.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत पतीवर प्रेम असणाऱ्या साध्वी स्त्रिया सवतीचा स्वीकार करून पतीची सेवा करतात. हे सामान्य असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या ' अन्यसरितामपि . . . . ' या विशेष पंक्तिद्वारा समर्थन केले आहे. हे समर्थन साधर्म्यपूर्वक आहे. साध्वी स्त्रियांनी सवत स्वीकारणे आणि मुख्य नद्यांनी उपनद्यांना बरोबर घेऊन समुद्राला मिळणे यात साधर्म्य आहे.

कालिदासाने इथे पतिव्रता व साध्वी स्त्रियांनी पतिसेवा करताना कसे वर्तन करावे हे नदीच्या उदाहरणारुन उत्तमरित्या स्पष्ट केले आहे. त्यातून त्याचे निसर्गातील सूक्ष्म निरीक्षण दिसून येते.

साध्वी स्त्री कशी असते हे पुढील श्लोकात दिले आहे :

आर्ताऽऽर्त्ते मुदिता हृष्टे वियोगे मलिना कृशा ।
मृते म्रियेत या पत्यौ साध्वी ज्ञेया पतिव्रता ॥

[६] कामीनां प्राणाः प्राणनोपायः प्राणत्वेन प्रियाया अध्यवसायो वा । दूत्यधीनाः इति यत् यत् स्थाने युक्तम् । अत्र प्रकृतेन विशेषण सामान्यस्य समर्थनादर्थान्तारन्यासः । सारार्थ. पृ. ८८, ओळ क्र. २५ -२७

या श्लोकात सहृदयतिक राम पिशरोदी, उमाशंकर पाण्डेय आणि रामचंद्र मिश्र यांनी अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे.[७]

सर्वः कल्पे वयसि यतते लब्धुमर्थान् कुटुम्बी
पश्चात् पुत्रैरपहृतभरः कल्पते विश्रमाय ।
अस्माकं तु प्रतिदिनमियं साधयन्ती प्रतिष्ठां
सेवा कारा-परिणतिरहो स्त्रीषु कष्टोऽधिकारः ॥

( विक्रमा. 3.१ )

विवेचन :

नाटकामध्ये कंचुकी हे एक महत्त्वाचे पात्र असते. त्याची व्यथा या श्लोकात कालिदासाने सांगितली आहे. तो या कामात सुखी नाही. कारण वृद्ध झाल्यावर त्याला अधिक काम करावे लागते. बहुधा असे असते की, वृद्ध झाल्यावर लोक कामापासून विश्रांती घेतात पण कंचुकीसारख्या व्यक्तीला आणि त्याच्यासारख्या कामाला मात्र विश्रान्तीचे वेळी जास्त काम करावे लागते. या गोष्टीचे वर्णन श्लोकातील पहिल्या तीन ओळींत आले आहे. त्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या 'सेवा कारापरिणतिरहो स्त्रीषु कष्टोऽधिकारः । ' या वाक्याने केले आहे. ते असे- खरोखर स्त्रियांच्या सेवेत राहणे अत्यंत दुःखदायक आहे.

निरीक्षण :

कंचुकीने आपल्या कुटुम्बाचा भार मुलांवर सोपवलेला आहे. तरी त्याला विश्रांती मिळत नाही. कारण राजसेवा आधी कठीण असते आणि त्यातही अन्तःपुरातील स्त्रियांची सेवा करणे, त्यांचे रक्षण करणे अत्यंत क्लेषकारक असते. बंदीगृहातील कैद्याप्रमाणेच त्याचे जीवन आहे. ही गोष्ट कालिदासाने अर्थान्तरन्यासद्वारा अधिक स्पष्ट केली आहे.

या श्लोकातील पहिल्या तीन ओळींत आलेले प्रस्तुत वर्णन विशेष असून त्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा केले आहे.

पं. सुरेन्द्रनाथ शास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दाखविला आहे. ते म्हणतात, ' अतः सामान्यं वस्तूपस्थापयति - अतः स्त्रीषु स्त्रीणां विषये अधिकारः कार्यकारित्वं कष्टः कष्टदायीति भावः । यतः जरत्तरत्वेऽपि विश्रान्तिर्न लभ्यते ।[८] अत्र चरमचरणे अर्थान्तरन्यासोऽलङ्कारः ॥[९]

---

[७] सारार्थ. पृ. १५६, ओळ क्र. २१,रमाशंकर पाण्डेय पृ. १८५, ओळ क्र. १७. अत्र विशेषेण सामान्यसमर्थन रुपोऽर्थान्तरन्यासः। प्रकाश पृ. 3६, ओळ क्र. १६-१७

[८] कल्प. पृ. १०५, ओळ क्र. 13-१५

[९] कित्ता. पृ. १०५, ओळ क्र. 3२

अङ्गमनङ्गक्लिष्टं सुखयेदन्या न मे करस्पर्शात् ।
नोच्छ्वसिति तपनकिरणैश्चन्द्रस्यैवांशुभिः कुमुदम् ॥

(विक्रमो. ३.१८ )

**विवेचन :**

तिसऱ्या अंकात आलेल्या या श्लोकात उर्वशीच्या प्रेमाने विह्वल झालेला राजा विदुषकास उद्देशून असे म्हणतो की, कामाने संतप्त झालेल्या माझ्या शरीराला उर्वशीच्या स्पर्शाशिवाय दुसरी कोणतीही स्त्री शांत करू शकणारा नाही. याचे वैधर्म्याने समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या उक्तीने म्हणजे चंद्राचे किरण अंगावर पडल्यावर कुमुद विकसित होते, सूर्यकिरणांनी नाही - याने केले आहे.

**निरीक्षण :**

कुमुद कमळे चंद्राच्या शीतल किरणांनी उमलतात. पण ती प्रचंड तेजस्वी अशा सूर्याच्या प्रखर किरणांनी मात्र उमलत नाहीत. हा निसर्गातील येणारा हृदयंगम अनुभव कालिदासाने इथे लक्षात घेऊन राजाची काम-विह्वलता आणि मनाची संवेदना वर्णन केली आहे.कामी मनुष्याला प्रियेशिवाय दुसऱ्या कोणत्याही आल्हादकारक वस्तूत रुची वाटत नाही, त्याला शांती देत नाही. केवळ त्याचे समाधान प्रियेच्या करस्पर्शानेच होते. प्रियामय झालेल्या व्यक्तीचे इथे सुंदर वर्णन या अर्थान्तरन्यासातून कालिदासाने केले आहे.

या श्लोकात ' उर्वशीच्या स्पर्शाने राजाचा विरहताप शांत होणे ' हे विशेष आहे आणि चंद्रकिरणांनी कुमुद विकसित होणे हे सामान्य आहे. इथे सामान्याद्वारा विशेषाचे साधर्म्याने समर्थन असल्याने अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

टीकाकारांपैकी कोणेश्वराने या श्लोकात अर्थान्तरन्यास निर्देशिला आहे. ते म्हणतात, 'अत्रार्थान्तरन्यासमाह–कुमुदं चन्द्रस्यांशुभरिव तपनकिरणैर्नोच्छ्वसिति । यथा चन्द्रस्य किरणैः कुमुदमुन्मुद्रयति तथा न सूर्यकिरणैरित्यत्र किं क्रियताम् । किंचिद् वस्तु स्वभावादेव कस्यचित् किंचिदवस्थाप्रापकमिति भावः ॥[१०]

कुपिता, न तु कोपकारणं, सकृदप्यात्मगतं, स्मराम्यहम् ।
प्रभुता रमणेषु योषितां नहि भावस्खलितान्यपेक्षते ॥

( विक्रमो ४.१२ )

**विवरण :**

उर्वशी राजाला सोडून गेल्यावर राजा म्हणाला की, त्याची प्रिया रागावून गेली आहे पण राजाला असे वाटते की त्याच्याकडून काही चूक झाली आहे. याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील उक्तिद्वारा केले आहे. ते असे की, स्त्रियांची आपल्या प्रियकरांवर पूर्ण सत्ता असते आणि त्याच्यावर रागावण्यासाठी त्यांना काहीही कारण लागत नाही.

---

[१०] कोणे. पृ. १५८, ओळ क्र. १८-२१.

निरीक्षण :

या श्लोकात कालिदासाने स्त्रियांचा एक विशेष स्वभाव वर्णन केला आहे. त्या आपल्या पतीवर सर्वस्वी स्वामीत्व गाजवतात आणि त्यांचा कोणताही अपराध नसताना त्यांच्यावर रुष्ट होतात. हा विशेष पुरुषांना जाणवतो. त्यांच्या दृष्टीने स्त्रिया अकारण रागावतात पण तो स्वतःकडे दोष घेत नाही असे राजाला वाटते. स्त्रिया त्यांच्यावर अकारण रागावतात ही पुरुषांची व्यथा या श्लोकात सांगितली आहे. राजा निरपराधी असून उर्वशी त्याच्यावर अकारण रागावली आहे. आणि त्या रागावण्याचे कारण या श्लोकात अर्थान्तर न्यासाद्वारा कवीने सांगितले आहे.

श्लोकाच्या पहिल्या ओळींत उर्वशीने राजाला अकारण सोडून जाणे हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत ' स्त्रियांचा त्यांच्या प्रियांवर सर्वाधिकार असतो आणि त्यांच्यावर रागावण्यास कारण काही लागत नाही ' या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे.

टीकाकारांपैकी फक्त सुरेंद्रनाथ शास्त्री यांनी या श्लोकात अलंकार निर्देशिला आहे.[११]

महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः
प्रणयमगणयित्वा यन्ममापद् गतस्य ।
अधरमिव मदान्धा पातुमेषा प्रवृत्ता
फलमभिनवपाकं राजजम्बूद्रुमस्य ॥

( विक्रमो. ४.१३ )

विवेचन :

या श्लोकात कालिदासाने राजाच्या कामविह्वळ अवस्थेचे वर्णन केले आहे. दुसऱ्याचे दुःख कितीही मोठे असले तरी ते दुसऱ्यांना शीतल वाटते. त्या दुःखाचा त्रास दुसऱ्याला होत नसतो. हा सामान्य नियम कवीने इथे योजला आहे. कोकिळ पक्षी राजाचे दुःख लक्षात घेत नाही, तसेच ती त्यास सहानुभूतीही दाखवीत नाही. उलट त्याच्या प्रियेच्या ओठाप्रमाणे असलेल्या जांभळीच्या फलांचे सवेन करीत आहे. कधी कधी कालिदास मनुष्यांच्या भावनांना अनुकूल असे निसर्गाचे चित्रण करतो. अभिज्ञानशांकुतलाच्या चौथ्या अंकातही त्याचे असेच वर्णन आढळते.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लाकोत शेवटच्या तीन ओळींत राजा कोकिळेला पाहून असे म्हणतो की, कामपीडित मी या कोकिळेची प्रार्थना करीत आहे. पण ती माझ्याकडे लक्ष न देता माझ्या प्रियेच्या ओष्ठाप्रमाणे असलेल्या जांभळीच्या फलांचे सेवन करीत आहे. या विशेषाचे द्वारे

---

[११] कल्प. पृ. १७६, ओळ क्र.. २२ - २३

पहिल्या ओळीत आलेल्या उक्तीचे दुसऱ्याचे दुःख कितीही मोठे असले तरी ते इतरांना नगण्य असते. या सामान्याचे समर्थन केले आहे.

या श्लोकात पहिल्या ओळींत सांगितलेले ' परदुःख शीतल असते ' हे सामान्य आहे आणि त्याचे समर्थन ' कोकिळेने राजाकडे दुर्लक्ष करणे ' इत्यादी विशेष वाक्याने साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

या श्लोकावर टीका करताना सुरेंद्रनाथ शास्त्री म्हणतात की. 'तथा च प्रथमगतसामान्यस्य चरणत्रयगतविशेषेण समर्थनादर्थान्तरन्यासः ।'[१२]

पश्यात् सरः प्रतिगमिष्यसि मानसं तत्
पाथेयमुत्सृज बिसं ग्रहणाय भूयः ।
मां तावदुद्धर शुचो दयिताप्रवृत्त्या
स्वार्थात् सतां गुरुतरा प्रणयिक्रियैव ॥

( विक्रमो. ४.१४ )

विवेचन :

मानस सरोवराकडे जाण्यास उद्युक्त झालेल्या हंस पक्ष्यांना पाहून जोपर्यंत ते तिकडे जाण्यासाठी उडत नाहीत तोपर्यंत आपल्या प्रियेची माहिती विचारावी असा विचार करून पक्ष्यांच्या जवळ जाऊन कामविह्वळ राजा असे म्हणतो की, ' हे जलात विहार करणाऱ्या पक्ष्यांच्या राजा ! तू नंतर मानस सरोवराकडे जाऊ शकतोस. आता थोडा वेळ तू कमलतंतू बाजूला ठेव, नंतर ते घे आणि माझ्या प्रियेसंबंधी काही बातमी देऊन माझे दुःख कमी कर.

निरीक्षण :

कालिदासाने आपल्या आवडत्या दूत कल्पनेचा वापर करून अर्थान्तरन्यासाची योजना केली आहे. राजहंसाला प्रियेकडील समाचार कळाल्यावर राजाचे दुःख कमी होईल, म्हणून त्याने आपल्या स्वार्थापेक्षा राजास मदत करावी, कारण तो एक सज्जन आहे असे कवीने इथे म्हटले आहे. त्या श्लोकातील पहिल्या तीन ओळींत आलेल्या विशेषाचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या उक्तीने म्हणजेच स्वतःच्या स्वार्थापेक्षा इतरांना मदत करणे ही सज्जनांची क्रिया असते. या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. इथे हंसाने मानस सरोवराकडे न जाणे आणि राजाला प्रियेसंबंधी बातमी देऊन मदत करणे हे विशेष आहे. तसेच स्वार्थ सोडून इतरांना मदत करणे हे सामान्य आहे.

टीकाकारांपैकी रामचंद्र मिश्र, सुरेंद्रनाथ, काट्येम यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[१३]

---

[१२] कल्प. पृ. १८०, ओळ क्र. १८ १८-१९
१३ प्रकाश पृ. १६३, ओळ क्र. २३.

सुरेंद्रनाथ शास्त्री यांनी आपल्या टीकेत पं. जगन्नाथाने दिलेले अर्थान्तरन्यास अलंकाराचे लक्षण उद्धृत केले आहे.[१४]

न हि सुलभवियोगा कर्तुमात्मप्रियाणि
प्रभवति परवत्ता शासने तिष्ठ भर्तुः ।
अहमपि तव सूनावद्य विन्यस्य राज्यं
विचरितमृगयूथान्याश्रयिष्ये वनानि ॥

(विक्रमो. ५.१७ )

विवेचन :

शेवटच्या अंकात स्वतःच्या पुत्राला पाहिल्यावर पूर्वनियोजनाप्रमाणे उर्वशी राजाला सोडून जायला तयार होते. त्यावेळी ती राजाला दुःखी होऊन सांगते की, मला आता स्वर्गाला जावे लागणार आहे. तेव्हा अभागी अशा मला आपण अनुमती द्यावी. यावर राजा तिला म्हणतो की,' पराधीन असणारी व्यक्ती स्वइच्छेनुसार कार्य करु शकत नाही.' श्लोकातील पहिल्या ओळीत आलेल्या या सामान्य विधानाचे शेवटच्या तीन ओळींत आलेल्या विशेषणद्वारा समर्थन केले आहे. ते असे – हे सुंदरी ! तुझ्या स्वामीच्या (इंद्राच्या) आदेशाचे पालन कर आणि मी देखील आपल्या मुलांवर राज्याचा भार सोपवून वानप्रस्थ आश्रम स्वीकारीन.

निरीक्षण :

या श्लोकात उर्वशीच्या प्रेमात गुंतलेला राजा प्रसंगी तो संयमी व समजदार होतो, हे या अर्थान्तरन्यासद्वारा कालिदासाने स्पष्ट केले आहे. राजा तिला स्वर्गास जाण्यास परवानगी देतो. कारण ती देवांच्या आज्ञेआधीन असते. हीच गोष्ट इथे कालिदासाने वर्णन केली आहे.

'पराधीन व्यक्ती स्वेच्छेने कार्य करु शकत नाही' हे पहिल्या ओळीत सामान्य आले आहे आणि शेवटच्या तीन ओळींत आलेले वाक्य म्हणजे आता उर्वशीने राजाला सोडावे लागणे व राजाने वानप्रस्थ आश्रमास जाणे हे विशेष असून त्याने त्याचे साधर्म्याने समर्थन केले आहे.

पं. सुरेद्रनाथ शास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[१५]

---

चतुर्थचरणस्य पूर्वोक्तस्तुनः समर्थकत्वादर्थान्तरन्यासालङ्कारः । कल्प पृ. क्र.१८२. ओळ क्र. ३४, कुमारगिरी पृ. क्र. २०१, ओळ क्र. ३२ – ३४.

[१४] सामान्येन विशेषस्य विशेषेण सामान्यस्य वा यत्समर्थनं तदार्थान्तरन्यासः ॥ कल्प. – पृ. १८२, ओळ क्र. ३५ – ३६. रस.गंगा. पृ. ६६९, क्र. ६७, ओळ क्र. ३–४.

शमयति गजानन्यान् गन्धद्विपः कलभोऽपि सन्
भवति सुतरां वेगोदग्रं भुजङ्गशिशोर्विषम् ।
भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं
न खलु वयसा जात्यैवायं स्वकार्यसहो भरः ॥

(विक्रमो. ५.१८ )

विवेचन :

राजा आपल्या पुत्रास समजावून सांगताना असे म्हणतो की, ' गन्धद्विप ' वयाने लहान असला तरी दुसऱ्या हत्तीचे दमन करु शकतो. भुजंगाच्या पिलाचे ( लहान सर्पाचे ) विष अत्यंत घातक होऊ शकते. राजा वयाने लहान असला तरी पृथ्वीचे रक्षण करण्यास समर्थ असतो. स्वकार्य संपादन करण्याचे अलौकिक सामर्थ्य ( शक्ती ) त्यास जन्मतःच असते. ते वयाने संपादित होत नसते. म्हणजेच राजकुमार लहान असूनही राज्यकारभार सांभाळू शकतो.

निरीक्षण :

उर्वशीच्या वियोगानंतर राजा वानप्रस्थाला जातो. त्यापूर्वी तो आपली राजधुरा स्वतःच्या लहान मुलावर सोपवितो. त्याचे समर्थन कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा केले आहे. ' गन्धद्वीप ' हत्ती मोठया हत्तींना देखील प्रभावी ठरतो किंवा सर्पाच्या पिलाचे विषसुद्धा भयंकर असते. त्याप्रमाणे राजपुत्र लहान असला तरी तो राज्यधुरा सांभाळण्यास समर्थ असेल.

या श्लोकात पहिल्या दोन ओळींत दोन विशेष आलेले आहेत आणि त्याचे समर्थन तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा केले आहे.

हा श्लोक अर्थान्तरन्यासाचे सुंदर उदाहरण आहे. ते नैसर्गिक सत्यावर आधारित आहे. ते सत्य म्हणजे दैवी शक्ती जन्मतःच प्राप्त असते. ती वयावर अवलंबून नसते. तसेच तिचे वयाने संपादन होत नाही.

---

[१५] कल्प. पृ. २४९, ओळ क्र. 30 - 31

टीकाकारांपैकी पं. सुरेद्रनाथ शास्त्री, श्रीरामचंद्र मिश्र आणि श्री कात येमभूपाल यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.[१६]

आ परितोषाद् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।
बलवदपि शिक्षितानात्मन्यप्रत्ययं चेतः ।।
( अभि. शा. १.२ )

विवेचन :

सूत्रधाराला नाटकाच्या रचनेत महत्त्वपूर्ण स्थान असते. तो नाटकाची सुरुवात करतो. तो कालिदासाने रचलेले अभिज्ञानशाकुन्तलम् नामक नवीन नाटक दाखविणार आहे. तेव्हा त्यास नटी म्हणते की, ' आपण तर नाट य कलेत निपुण आहात. सर्व व्यवस्थाही चांगली केली आहे. त्यामुळे कसलीही उणीव भासणार नाही '. हे ऐकून सूत्रधार तिला पुन्हा सांगतो की,' मी तुला खरे सांगतो की, जोपर्यंत विद्वान लोकांचे माझ्या अभिनयाने पूर्ण समाधान होणार नाही तोपर्यंत मी माझे ज्ञान परिपूर्ण झाले आहे असे समजत नाही. कारण भरपूर ज्ञान प्राप्त करुनही माणसाचे मन स्वतःच्या कर्तृत्वाच्या बाबतीत साशंक असते '.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात विद्वानांचे समाधान होईपर्यंत सूत्रधाराने आपले ज्ञान परिपूर्ण झाले आहे असे न समजणे हे पहिल्या ओळीत विशेष आहे. दुसऱ्या ओळीत सार्वजनिक सत्यावर आधारित केलेले कथन' माणसाचे मन स्वतःच्या कर्तृत्वाबाबत साशंक असते ' हे सामान्य आहे आणि पहिल्या ओळीत आलेल्या विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने इथे समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगाद्वारे कालिदासाने इथे एका त्रिकालाबाधित सत्यावर प्रकाश टाकला आहे. इतर लोकांचे त्यांच्याकडून समाधान होईपर्यंत माणसाचे मन स्वकर्तृत्वाबाबत साशंक असते. सूत्रधारही त्याला अपवाद नाही. त्यास खात्री असते की, हे नाटक उत्तम होईल पण त्याच्या यशस्वितेबद्दल तो संशयी आहे. सर्व कलाकारांना येणारा

[१६] कल्प. पृ. २५१, ओळ क्र. १६,
प्रकाश पृ. २२५, ओळ क्र.. १७-१९, कुमारगिरी पृ. २२६, ओळ क्र. १०-१३

हा अनुभव कवीने इथे मांडला आहे. कलाकारास आपल्या कलेचे सामर्थ्य माहीत असते. परंतु त्या कलेला विद्वान रसिकांकडून मान्यता मिळणे जास्त महत्त्वाचे असते. ही बाब कालिदासाने इथे सूचित केली आहे.

टीकाकारांपैकी नवकिशोरकर शास्त्री, शंकर, नीलकण्ठ, नारायण शास्त्री खिस्ते, गजेंद्रगडकर यांनी अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश प्रस्तुत श्लोकात केला आहे.[१७]

शंकर नामक टीकाकाराने अर्थान्तरन्यासाचे दण्डीने दिलेले लक्षण उद्‌धृत केले आहे. ते असे, –

ज्ञेयः सोऽर्थान्तरन्यासो वस्तु प्रस्तुत्य किंचन ।

तत्साधनसमर्थस्य न्यासो योऽन्यस्य वस्तुनः इति ।[१८]

गजेंद्रगडकर यांनी एकावलीतील अर्थान्तरन्यासाचे लक्षण उद्‌धृत केले आहे ते असे –

उक्तिरर्थान्तरन्यासः स्युत्सामान्यविशेषयोः ।[१९] अशाच प्रकारचा विचार कालिदासाच्या साहित्यात अन्यत्रही आलेला आहे. तो असा –

उपदेशं विदुः सन्तस्तमुपदेशिनः ।

श्यामायते न युष्मासु यः काञ्चनमिवाग्निषु [२०]

द्वितीयः–न खलु न खलु बाणः सन्निपात्योऽयमस्मिन् मृदुनि मृगशरीरे

वैखा – तूलराशाषिवाग्नि

तृतीयः – क्व बत हरिणकानां जीवितं चातिलोलं

वैखा – क्व च निशितनिपातावज्रसाराः शरास्ते ॥ ( अभि. ज्ञा. १.१०)

विवेचन :

---

[१७] किशोर. पृ. ८ ओळ क्र.१६,
रस. पृ. १६४, ओळ क्र. ६,
नील. पृ. १०, ओळ क्र. १,
लक्ष्मी. पृ. १२,
बाल. पृ. ५, ओळ क्र. २४

[१८] रस. पृ १६४, ओळ क्र. ७-८.
काव्याद २.१६९, पृ. १९९-२००,
प्रस्तुत प्रबंध पृ.क्र.

[१९] बाल. पृ.५, ओळ क्र. २४-२५. एका. पृ. ओळ प्रस्तुत प्रबंध पृष्ठ. क्र.

[२०] माल. २.९ पृ. ३५१ आणखी पहा.
तं सन्तः श्रोतुमर्हन्ति सदसद्व्यक्तिहेतवः।
हेम्न संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा ॥
( रघु. १.१० पृ. १४६ )
त्वत्संभावितमात्मानं बहु मन्यामहे वयम् ।
प्रायः प्रत्ययमाधत्ते स्वगुणेषूत्त मादरः ॥
( कुमार. ६.२० पृ. १०८ )

अभिज्ञानशाकुंतल नाटकात पहिल्या अंकात राजा दुष्यंत कण्वमुनींच्या आश्रमातील मृगाला मारण्यासाठी धनुष्य-बाण सज्ज करून उद्युक्त होतो. तेव्हा आश्रमातील तपस्वी लोक राजाला आर्जवाने सांगतात की, ' हा आश्रमातील मृग आहे, याला मारू नका. ' ते त्याला का मारावयाचे नाही याचे कारण प्रस्तुत श्लोकात सांगतात. ते असे – कापसाच्या राशीवर विस्तव टाकावा त्याप्रमाणे या मृगाच्या नाजूक शरीरावर मुळीच बाण टाकू नका. मृग-पाडसाचा नाजूक जीव कुठे आणि तीक्ष्णपणे घुसणारे वज्राप्रमाणे कठीण असे तुझे बाण कुठे ? म्हणून बरोबर नेम धरून जोडलेला बाण तू मागे घे. तुझे शस्त्र दीनांचे रक्षण करण्यासाठी आहे. अश्राप प्राण्यांवर चालविण्यासठी नाही.'

## निरीक्षण :

दुष्यंताची पश्चातापदग्ध अवस्था आणि हताशवृत्ती यांचे सुंदर चित्रण या श्लोकात केले आहे. या श्लोकाच्या पहिल्या दोन ओळींत आलेले ' मृगाच्या नाजूक शरीरावर मुळीच बाण टाकू नका.' हे प्रस्तुत विशेष आहे. याचे समर्थन तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेली उक्ती – ' मृगाच्या पाडसाचा अगदी नाजूक जीव कुठे आणि वज्राप्रमाणे कठिण असणारे असे तुझे बाण कुठे ? या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

कार्यकारणभावाधारित अर्थान्तरन्यासाच्या प्रकारात या श्लोकाचा समावेश होऊ शकतो. पहिल्या दोन ओळींत ' हरिणाच्या नाजूक शरीरावर मुळीच बाण न मारणे ' हे कार्य असून तिसऱ्या आणि चौथ्या ओळीत आलेले – ' हरिणाच्या पाडसाचा नाजूक जीव कुठे आणि वज्रासारखे कठिण कुठे ? या कारणाने समर्थन केले आहे.

टीकाकारांपैकी नवकिशोरकर शास्त्री आणि पं. शिवप्रसाद द्विवेदी यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[२१]

या श्लोकात ' क्व . . . क्व ' हा प्रयोग विशेष महत्त्वाचा आहे. या प्रकारच्या लेखनशैलीची आवड कालिदासाला फार होती असे आपणांस त्याच्या साहित्याच्या अभ्यासातून दिसून येते. जसे –

धूमज्योतिः सलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः
सन्देशार्थीः क्व पटुकरणैर्प्राणिभिः प्रापणीया । [२२]
मनीषितताः सन्ति गृहेऽपि देवतास्तपः क्व वत्से क्वताः तावकं वपुः । [२३]

तत् , साधु कृतसन्धानं प्रतिसंहर सायकम् ।
आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि ॥

---

[२१] अत्रान्तिमचरणद्वयवाक्यार्थ रूपसामान्येनादिमचरणद्वयवाक्यार्थरूपविशेषस्य समर्थनादर्थान्तरन्यासोनामालंकारः । किशोर. पृ. २१, ओळ क्र. १३-१४
अत्र उत्तरार्धिन सामान्यरूपेणार्थेन विशेषरूपस्यार्थस्य समर्थनादर्थान्तरन्यासनामकोऽलङ्कारः । भाव प्र. पृ. १८, ओळ क्र. २७-२८
[२२] मेघ. ५, पृ. क्र. ४२
[२३] कुमार. ५.४, पृ. ४ . आणखी पहा. रघु. १.२ पृ. १४५, अभि.शा. २.१९. पृ. ५६१

( अभि.शा. १.११ )

विवेचन :

कालिदासाने या श्लोकात दीनांचे रक्षण करणे हे राजाचे कर्तव्य सांगितले आहे. राजा दुष्यंत कण्व मुनींच्या आश्रमातील मृगाला मारण्यासाठी धनुष्य-बाण सज्ज करून उद्युक्त होतो. तेव्हा आश्रमातील एक तपस्वी त्याला उद्देशून असे म्हणतो की, ' बरोबर नेम धरून जोडलेला बाण मागे घे. तुझे शस्त्र दीनांचे रक्षण करण्यासाठी आहे. निरपराध प्रण्यांवर चालविण्यासठी नाही.'

निरीक्षण :

इथे श्लोकातील पहिल्या ओळीत ' धनुष्याला लावलेला बाण मागे घे ' हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन ' आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि' या सामान्य वाक्याद्वारे साधर्म्याने केले आहे. कारणद्वारा कार्याचे साधर्म्याने समर्थन या प्रकारातही या श्लोकाचा अन्तर्भाव होतो. श्लोकातील पहिल्या ओळीत कार्य असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील कारणाने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[२४]

शान्तमिदमाश्रमपदं स्फुरति च बाहुःकुतःफलमिहास्य ।
अथवा भवितव्यानां द्वाराणि भवन्ति सर्वत्र ॥

( अभि. शा. १.१५ )

विवेचन :

पहिल्या अंकात दुष्यन्त राजाला कण्व मुनींच्या आश्रमात प्रवेश करताना शुभशकुन होतो. तेव्हा तो त्याच्या मनात आललेले विचार प्रस्तुत श्लोकात मांडतो. ते असे -

हा आश्रम शान्त आहे आणि माझा बाहू तर स्फुरण पावत आहे. याचे फळ या आश्रमात कुठून मिळणार ? अथवा अटळ असणाऱ्या गोष्टींची साधने कुठेही उपलब्ध होतात.

बाहू स्फुरण पावणे हा शुभशकुन असला तरी शामप्रधान ऋषींचे वास्तव्य असलेल्या या आश्रमात त्याचे फळ मिळण्याची शक्यता नाही. त्यामुळे ' याचे फळ या आश्रमात कुठून मिळणार ? हे राजाचे म्हणणे योग्य आहे.

निरीक्षण :

---

[२४] किशोर - पूर्वदर्थान्तरन्यासइत्यन्ये । पृ.२१, ओळ क्र.२८.

बाहुस्फुरणाचे फल आपणांस कुठून मिळणार ? अशी शंका राजास वाटते. त्या शंकेचे समाधान तो स्वतःशीच करून घेतो हे या अर्थान्तरन्यासातून दिसते.

या प्रसंगी या श्लोकातील पहिल्या ओळीत आलेली उक्ती विशेष अथवा कार्य आहे आणि त्याचे दुसऱ्या ओळीत आलेल्या ' भविव्यानां द्वाराणि भवन्ति सर्वत्र ।' या सामान्याने अथवा कारणाने समर्थन केले आहे.

दक्षिण-बाहुस्फुरणाच्या संकेताचा उल्लेख कालिदासाच्या ग्रंथांमध्ये व इतरत्रही आढळतो. जसे –

तस्य स्फुरति पौलस्त्यः सीतासंगमशंसिनि ।
निचखाधिकक्रोधः शरं सव्येतरे भुजे ॥[२५]

या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकाराचा प्रयोग करताना कालिदासाने ' होणारी गोष्ट चुकत नाही' या त्रिकालाबाधित सत्याचा आधार घेतला आहे.

टीकाकांपैकी गजेन्द्रगडकर, नीलकण्ठ, नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, राघवभट्ट व नारायण शास्त्री खिस्ते यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासाचा निर्देश केला आहे.[२६]

सरसिजमनुविद्धं शैवलेनापि रम्यं
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।
इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिव हि मधुराणां मण्डनं नाकृतीनाम् ॥
( अभि. शा. १.१८ )

विवेचन :

पहिल्या अंकात राजा दुष्यन्त वल्कले नेसलेल्या शकुंतलेला पाहतो आणि तो असा विचार मांडतो की, हिच्या वयाला वल्कले मुळीच शोधत नाहीत. पण दुसऱ्याच क्षणी वल्कलामुळे देखील तिचे मूळचे सौंदर्य अधिक आकर्षक दिसते असे त्याला वाटते व तो ते सुंदर का दिसते? त्याचे कारण प्रस्तुत श्लोकात दिले आहे.

दुष्यन्त म्हणतो की, कमळ शेवाळ्याने वेढलेले असले तरी मोहक दिसते; चंद्राचा कलंक मलिन असून देखील त्याची शोभा वृद्धिंगत करतो; वल्कले नेसूनही ही सुकुमार

---

भाव प्र – अत्राप्यर्थान्तरन्यासालङ्कारः पृ. १९ ओळ क्र. १६.
[२५] रघु.१२.९० पृ. २५3. आणखी पहा –
अयं मां स्पन्दितैर्बाहुराश्वासयति दक्षिणः ॥ माल. 3.९, पृ. क्र. ४७४
अभिमतफलशंसी चारु पुस्फोर बाहूः . . ॥ भट्टिकाव्य. १.२७, पृ. क्र. ६
वामेतर भुजस्पन्दो वरस्त्रीलाभसूचकः । अभ्दुतसागर.
[२६] बाल. पृ. १८, ओळ क्र. २७.
नील. पृ. २०, ओळ क्र. २२-२3,
किशोर. पृ. 3०, ओळ क्र. ७-८,
भाव.प्र. पृ. २७, ओळ क्र. १०, अर्थद्यो. पृ. ६५, ओळ क्र. ६-७, लक्ष्मी पृ. ४२.

बाला अधिक मोहक दिसत आहे. आकर्षक सौंदर्य असलेल्या व्यक्तींना काय बरे शोभून दिसत नाही?

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेष असून त्या तिहींचे समर्थन चौथ्या ओळींत आलेल्या सामान्य विधानाद्वारा वैधर्म्याने केले आहे.

राघवभट्ट नामक टीकाकार या श्लोकावर लिहिताना असे लिहितो की, 'मधुराणां सुन्दराणामाकृतीनां किमिव हि न मण्डनम् । अपि तु सर्वम् । हीनमहीनं स्वसंबद्धं चेति सामान्यस्य समर्थक- त्वादर्थान्तरन्यासः ।[२७]

अन्य टीकाकारांपैकी गजेंद्रगडकर, अभिराम, शिवप्रसाद द्विवेदी, नवकिशोरकर शास्त्री, नीलकण्ठ आणि नारायण शास्त्री खिस्ते यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[२८]

नीलकण्ठाने या श्लोकात अर्थान्तरन्यान आहे हे सांगताना त्याने मम्मटाचे लक्षण उद्धृत केले आहे.[२९]

'जातीच्या सुंदरा काहीही शोभते ' असे सौंदर्याचे स्वरूप या श्लोकात सांगितले आहे. सौंदर्याविषयी कालिदासानचे हे विधान सर्वमान्य झाले असे म्हणावयास हरकत नाही. कालिदासाच्या अन्य साहित्यात या प्रकारचे विचार पुढीलप्रमाणे आढळतात. जसे –

यथा प्रसिद्धैर्मधुरं शिरोरुहैर्जटाभिरप्येवमभूत तदानन् ।
न षट्पदश्रेणिभिरेव पङ्कजं सशैवलासङ्गमपि प्रकाशते ।। [३०]
अहो सर्वस्थानानवधता रूपस्य ।[३१]

संस्कृत साहित्यातील अन्यत्र देखील या संदर्भातील आलेले वर्णन पाहण्यासारखे आहे.[३२]

---

[२७] अर्थद्या. पृ ७५, ओळ क्र. १४–१६.
२८ बाल. पृ.23, ओळ क्र. २१–२२,
अभि. पृ. क्र. ३६, ओळ क्र. १४–१५,
भावप्र पृ. क्र. ३४, ओळ क्र.१७–१८,
किशोर पृ.क्र. ३७, ओळ क्र. ११–१२,
नील. पृ.२४, ओळ क्र.२५, लक्ष्मी पृ.क्र.५३-५६
२९ नील पृ. क्र. २४, ओळ क्र. २३–२५.
का.प्र. १०.१०९ पृष्ठ ६६१
[३०] कुमार ५.९, पृ क्र. ९८
30 माल. अंक. २ पृ. क्र. ३४८, ओळ क्र. १५
३१
[३२] न रम्यमाहार्यमपेक्षते गुणम् । किरात. ४.२३, पृ.क्र. ५९, आणखी पहा – रम्याणां विकृतिरपि श्रियं तनोति । कित्ता. ७.५ पृष्ठ क्र. ९२

असंशयं क्षत्रपरिग्रहक्षमा यदार्यमस्यामभिलाषि मे मनः।
सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ॥
( अभि. शा. १.२० )

विवेचन :

राजा दुष्यन्त शकुंतलेच्या सौंदर्याने मोहित होतो व तिच्याशी विवाह करण्याचा विचार त्याच्या मनात डोकावतो. तेव्हा त्याच्या मनात अशी शंका उत्पन्न होते की, ही कन्या कुलपती महर्षी कण्वांची क्षत्रिय वर्णाच्या स्त्रीपासून उत्पन्न झालेली असेल काय ? पण इथे संशय कशाला ? खात्रीने ही क्षत्रियाची पत्नी होण्यास योग्य असली पाहिजे. कारण ( विनय विद्या सदाचारी गुणांनी संपन्न झालेले ) माझे मन हिच्यावर जडले आहे. थोर लोकांना ज्यांच्याविषयी शंका निर्माण होते अशा गोष्टींच्या बाबतीत त्यांच्या अन्तःकरणाच्या वृत्ती ह्यात प्रमाण होत ! याचा अर्थ असा की, सज्जन ज्या वस्तूला पवित्र अथवा स्वीकरणीय आहे असा मनाने निश्चय करतो तेव्हा ती आवश्यच पवित्र अथवा स्वीकरणीय असते. म्हणून हिच्यावर माझे मन जडणे हे या गोष्टीचे प्रमाण आहे की ही मी पत्नीरूपात स्वीकरणीय आहे.

निरीक्षण :

या श्लोकात पहिल्या ओळीत सांगितलेला विषय की, ' ही क्षत्रियाची पत्नी होण्यास योग्य आहे हे विशेष आहे आणि त्याचे दुसऱ्या ओळीत आलेल्या वाक्याद्वारा म्हणजेच सज्जनांच्या अन्तःकरणप्रवृत्ती संदेह स्थली प्रमाण असतात '. या सामान्यासाद्वारा समर्थन केले आहे.

या श्लोकात कालिदासाने सज्जनांचा स्वभाव आणि त्यांचे चिंतन कसे प्रमाण असते हे सांगितले आहे.

गजेंद्रगडकर, नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, राघव भट्ट आणि नारायणशास्त्री खिस्ते यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.[33]

मानुषीषु कथं वा स्यादस्य रूपस्य संभवः ? ।
न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् ॥
( अभि. शा. १.२३ )

---

[33] बाल. पृ. २७, ओळ क्र. १४,
किशोर. पृ. ४५, ओळ क्र. १५,

**विवेचन :**

शकुंतला ही अप्सरेची कन्या असल्यामुळे अलौकिक सुंदर आहे. हे राजाला समजताच तो अनसुयेस म्हणतो की, पृथ्वीवरील स्त्रियांच्या ठिकाणी असले रूप कसे शक्य आहे ? दीप्तीमुळे उज्ज्वल झालेले असले तेज पृथ्वीपासून निर्माण होत नसते !

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत आलेल्या विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याने वैधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

टीकाकारांपैकी फक्त शंकरानेच या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[३४]

चेष्टाप्रतिरूपिका कामिजनमनोवृत्तिः। अहं हि
अनुयास्यन् मुनितनयां सहसा विनयेन वारितप्रसरः ।
स्थानादनुच्चलन्नपि गत्वेव पुनः प्रतिनिवृत्तः ॥
(अभि. शा. १.२६पृ.५४५ ओळ क्र. २२)

**विवेचन :**

जेव्हा शकुंतला तेथून काही न बोलता निघून जाऊ लागते तेव्हा तिने तेथेच थांबावे अशी राजाची उत्कट इच्छा होती. त्यामुळे ती जाऊ लागल्याबरोबर तिला अडवावे असा त्याला मोह झाला. परंतु विनयामुळे तसे न करता तो मनाला म्हणाला की, ' कामी माणसाच्या मनोवृत्तीचे प्रतिबिंब त्याच्या कृतीत दिसते.' याचं कारण स्वतःच देतो की, मुनीकन्येच्या मागे जाण्याच्या बेतात असलेल्या माझी गती एकाएकी विनयामुळे कुंठित झाली. आणि स्वतःच्या जागेपासून एक रेसभरही न हालता जणू काही मी तिच्या मागोमाग गेलो आणि परत आलो ! राजाने सुचविलेले कारण या श्लोकात वर्णिले आहे. ते विशेष अथवा कार्य आहे. आणि त्याच्यापूर्वी ' चेष्टाप्रतिरूपिका कामिजनमनोवृत्तिः । ' या सामान्याचा निर्देश केला आहे. या सामान्याचे समर्थन उत्तरवर्ती संपूर्ण श्लोकाद्वारा साधर्म्याने केले आहे . इथे विशेषद्वारा सामान्याचे साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

**निरीक्षण :**

---

[३४] भावप्र. पृ. ४२, ओळ क्र. १२, अर्थद्यो. पृ. ८२, ओळ क्र. १७-१८, लक्ष्मी पृ. ६६, रसचं. पृ. १८७, ओळ क्र. १७-१८

प्रायशः एकाच श्लोकात समर्थ्य–समर्थक भाव असताना अर्थान्तरन्यास अलंकाराचा प्रयोग दिसून येतो. पण इथे मात्र सामान्याचा निर्देश राजाच्या संभाषणात ( गद्य वाक्यात ) एका ओळीत आला आहे आणि त्याचे समर्थन नजीकच्या पुढील श्लोकात आलेल्या विशेषद्वारा केले आहे. गद्य – पद्यमिश्रित समर्थ्य–समर्थक भाव असलेला हा अर्थान्तरन्यासाचा प्रयोग वेगळ्या प्रकारचा आहे. अशा प्रकारचे उदाहरण क्वचितच आढळते.

टीकाकारांपैकी केवळ नारायण शास्त्री खिस्ते यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार दर्शविला आहे. अत्र... चेष्टाप्रतिरुपिकेत्यादिसामान्यस्य अनेन पद्येन समर्थनादर्थान्तरन्यासः ।[३५]

कामं प्रिया न सुलभा मनस्तु तद्भावदर्शनाश्वासि ।
अकृतार्थेऽपि मनसिजे रतिमुभयप्रार्थना कुरुते ॥

( अभि. शा. २.१ )

विवेचन :

दुसऱ्या अंकाच्या सुरुवातीला राजा दुष्यंत विदुषकाला सांगतो की, ती ( शकुंतला ) मला अतिशय प्रिय आहे. पण ती सहज प्राप्त होण्याजोगी नाही. तथापि तिच्या भावनांच्या आविष्करणामुळे माझ्या मनाला दिलासा मिळाला आहे. प्रेमाचे साफल्य (प्रत्यक्ष मीलन) झाले नाही तरी प्रेमिकांचे एकमेकांवरील प्रेम सुख प्राप्त करून देते.

निरीक्षण :

या श्लोकात पहिल्या ओळीत ' ती मला फार प्रिय आहे ' इत्यादी विशेष आहे. त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या 'अकृतार्थेऽपि मनसिजे रतिमुभयप्रार्थना कुरुते ।' या सामान्य वाक्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

या श्लोकावर टीका लिहिताना राघवभट्ट असे लिहितात की, 'यथा मन्मनसस्तद्भावदर्शनलालसत्वं कार्यं समर्थ्यते तेनार्थान्तरन्यासः ।'[३६] यावरून या श्लोकात कारणद्वारा कार्याचे समर्थन हा अर्थान्तरन्यासाचा प्रकारही संभवतो. श्लोकातील

---

[३५] लक्ष्मी – पृ. क्र. ९९,
[३६] अर्थ द्यो. पृ. १२९, ओळ क्र. १७–१८

पहिल्या ओळीत कार्य असून दुसऱ्या ओळीतील कारणाने त्याचे साधर्म्याने समर्थन केलेले आहे.

पं.शिवप्रसाद द्विवेदी यांनी या श्लोकावर व्याख्या लिहिताना असे लिहिले आहे की, 'अत्र पूर्वार्ध- सामान्यस्य परार्धसामान्येन समर्थनात् अर्थान्तरन्यासालङ्कारः। ' [३७] पण हे बरोबर वाटत नाही. सामान्याद्वारा सामान्याचे समर्थन केल्याने अर्थान्तरन्यास अलंकार होत नाही. काव्यशास्त्रग्रंथातील संदर्भ उद्धृत करताना कदाचित अनवधानाने विशेष शब्दाऐवजी सामान्य हा शब्द लिहिला असेल. कारण याच नाटकातील ' न खलु न खलु . . . ' या श्लोकावरील व्याख्येत ' सामान्याद्वारा विशेषाचे समर्थनामुळे अर्थान्तरन्यास अलंकार होतो ' असे म्हटले आहे.[३८]

अन्य टीकाकारंमध्ये नीलकण्ठ, नवकिशोरकर शास्त्री, पं. नारायणशास्त्री खिस्ते, गौरीनाथ पाठक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश केला आहे. [३९]

इथल्या प्रमाणेच महाकवी कालिदासाच्या ग्रंथात प्रेमिकांची मनःस्थिती, त्यांच्या प्रवृत्ती आदि विषय वर्णिलेले आढळतात. उदा.

अनातुरोत्कण्ठितयोः प्रसिद्धयता समागमेनापि रतिर्न मां प्रति ।
परस्परप्राप्तिनिराशयोर्वरं शरीरनाशोऽपि समानुरागयोः ।। [४०]

वाचं न मिश्रियति यद्यपि यद्वचोभिः कर्णं ददात्यभिमुखं मयि भाषमाणे ।
कामं न तिष्ठति मदाननसंमुखीना भूयिष्ठमन्यविषया न तु दृष्टिरम्याः ।। [४१]

अभिमुखे मयि संहृतमीक्षितं हसितमन्यनिमित्तकृतोदयम् ।
विनयवारितवृत्तिरतस्तस्या न विवृतो मदनो न च संवृतः ।।[४२]

स्निग्धं वीक्षितमन्यतोऽपि नयने यत् प्रेरयन्त्या तया
यातं यच्च नितम्बयोर्गुरुतया मन्दं विलासादिव ।
मा गा इत्युपरुद्धया यदपि सा सासूयमुक्ता स

---

[३७] भाव प्र. पृ. ७७, ओळ क्र १९
[३८] कित्ता. पृ. १८, ओळ क्र. २७ – २८. आणखी पहा – प्रस्तुत प्रबंध, तळटीप क्र. २१
[३९] नील. पृ. ४७, ओळ क्र.१८,
किशोर. पृ. ८७, ओळ क्र. २५,
लक्ष्मी. पृ. १२१-२3, ओळ क्र. .
सुबो. पृ. ४७, ओळ क्र. २८–२९
[४०] माल. 3.१५ पृ. 3७४.
आणखी पहा अभि. शा. १.२८, पृ. ५४७,
कित्ता. २.१२ पृ. ५५६,
कित्ता २.१3 पृ. ५५६,
कित्ता 3.२ पृ. ५६3
[४१] कित्ता. १.२८, पृ. ५४७
[४२] कित्ता. २.१२, पृ. ५५६

सर्व तत् किल मत्परायणमहो कामी स्वस्तां पश्यति ॥

( अभि. शा. २.२ )

विवेचन :

राजा दुष्यंत प्रेमाने विह्वल झाला आहे. त्याला असे वाटते की त्याच्या प्रेमिकेची देखील त्याच्यासारखीच स्थिती झाली असेल असे तो म्हणतो. यावेळी पहिल्या अंकात त्याची व शकुंतलेची भेट झाली होती, त्याची आठवण काढून तो म्हणतो की, ' वास्तविक नजर दुसरीकडे वळली असताना सुद्धा तिने जो प्रेमकटाक्ष टाकला, नितंबाच्या पुष्टपणामुळे जणू काही विलासाने टाकावी त्याप्रमाणे तिने मंद पावले टाकली, ' जाऊ नकोस ' असे म्हणून मैत्रिणीने अडवलेली ती रागाने जे काही बोलली ते सारे माझ्याशी संबंध असलेले होतो'. हे प्रस्तुत वर्णन विशेष आहे आणि त्याचे समर्थन शेवटच्या ओळीत आलेल्या 'कामी स्वतां पश्यति ।' ( कामी मनुष्याला जिकडे तिकडे आपल्याच भावनेचे प्रतीक दिसते.) या सामान्य विधानाद्वारे केले आहे.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचा निर्देश असून चौथ्या ओळीतील सामान्याने विशेषाचे साधर्म्याने समर्थन केले आहे.

कालिदासाच्या वाङ्मयात पहिल्या तीन ओळींतील विशेषाचे चौथ्या ओळीतील सामान्याने समर्थन केल्याची उदाहरणे भरपूर आढळतात.[४३]

टीकाकारांपैकी पं. नारायणशास्त्री खिस्ते, शंकर, नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, काट्येम, राघवभट आणि नीलकण्ठ यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[४४]

कामी व्यक्तीच्या मनःस्थितीचे वर्तन इत्यादी विषय कालिदासाच्या वाङ्मयात इतरत्रही पहावयास मिळतात. [४५]

संस्कृत साहित्यशास्त्रात याला विलास म्हटले आहे. याचे लक्षण दशरुपक नामक ग्रंथात आले आहे.[४६]

शमप्रधानेषु तपोधनेषु गूढं हि दाहात्मकमस्ति तेजः।

---

[४३] पहा. प्रस्तुत प्रबंध प्रकरण ६-५ अर्थान्तरन्यासाचे प्रकार

[४४] लक्ष्मी – रसच. पृ. क्र. १९५, ओळ क्र. 13,
किशोर पृ. ८९, ओळ क्र. २४-२५,
भावप्र. पृ. ७८, ओळ क्र. २५,
कुमारगिरी पृ. ३६, ओळ क्र. २४,
अर्थद्यो. पृ. १३२, ओळ क्र. ९ – ११,
नील. पृ. ४८, ओळ क्र. २४ – २५

[४५] अनसूया – सखी न युक्तं ते अकृतसत्कारमतिथि पशेषं विसृज्य स्वच्छन्दतो गमनम् । अभि. शा. अंक १ पृ. ५४५, ओळ क्र १८

[४६] तात्कालिको विशेषस्तु विलासोऽङ्गक्रियोक्तिषु । २.३७ पृ. ६१
आणखी पहा – यानस्थानासनादीनां मुखनेत्रादिकर्मणाम् ।
विशेषस्तु विलासः स्यादिष्टसन्दर्शनादिना । सा.द.३. ९९–१०० पृ. क्र. १३२

स्पर्शानुकूला अपि सूर्यकान्तास्तेजोऽन्यतेजोभिभवाद् वमन्ति ॥

( अभि.शा. २.७)

विवेचन :

दुष्यन्त राजा आपल्या सैनिकांसह वनातील कण्वमुनींच्या आश्रमात आला होता. त्याचे काही सैनिक शिकार मिळावी या हेतूने रान उटविण्यासाठी पुढे गेले होते. त्या सैनिकांना परत बोलवावे अशी सूचना राजा विदूषकाला करून तो पुढे म्हणतो की, मनोनिग्रही तपस्वी ऋषींच्या ठिकाणी दग्ध करुन टाकण्याचे सामर्थ्यरुपी तेज गुप्तपणे वास करते. एरव्ही सुखकर स्पर्श असलेल्या सूर्यकान्त मण्याप्रमाणे त्यांच्याहून अन्य तेजाचे आक्रमण झाले असता ते स्वतःचे तेज प्रकट करतात.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत सांगितलेले 'तपोधन ऋषींमध्ये दग्ध करुन टाकणारे तेज गूढपणे वास करते ' हे प्रस्तुत विशेष आहे आणि या विशेषाचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्य उक्ती म्हणजे ' सूर्यकांत मणी दुसऱ्या तेजाचे आक्रमण झाले की स्वतःचे तेज प्रकट करतो ' या सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

टीकाकारांपैकी केवळ शंकर या श्लोकावर व्याख्या करताना अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[४७]

कालिदासाच्या या श्लोकामध्ये आलेल्या कल्पनेसमान कल्पना संस्कृत साहित्यामध्ये अनेक ठिकाणी आढळते. जसे-

यदचेतनोऽपि पादैः स्पृष्टः प्रज्वलति सवितुरिनकान्तः।
तेजस्वी पुरुषः परकृतनिकृतिं कथं सहते ।[४८]

अनुकारिणि पूर्वेषां युक्तरुपमिदं त्वयि ।
आपन्नाभयसत्रेषु दीक्षिताः खलु पौरवाः ॥

( अभि. शा. २.१७ )

विवेचन :

दुसऱ्या अंकामध्ये शकुंतलेच्या भेटीची अनावर उत्कंठा होऊन आश्रमात पुन्हा कोणत्या निमित्ताने जावे हा विचार राजा दुष्यंत करीत असतानाच दोन ऋषींनी त्याला आश्रमात यज्ञाच्या रक्षणासाठी तेथेच राहण्याची विनंती केली. ही विनंती राजाने मान्य केल्याने आनंदून ते दोघे ऋषी असे म्हणतात की, ' पूर्वजांचे अनुकरण करणाऱ्या तुला हे साजून दिसत आहे. संकटात सापडलेल्या लोकांना अभय देणे हा जो यज्ञ आहे त्याची दीक्षाच पुरुवंशातील राजांनी घेतली आहे. '

---

[४७] रस.पृ. १९८, ओळ क्र. १९-२२

[४८] नी.श. पृ. १७, श्लोक क्र. २९

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत सांगितलेली गोष्ट म्हणजे ' पूर्वजांचे अनुकरण करणे ' हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

नवकिशोरकर शास्त्री यांनी या श्लोकातील अर्थान्तरन्यासाविषयी असे म्हटले आहे- 'अत्र... उत्तरार्ध्देगतकारणद्वारा प्रथमार्ध्देगतकार्यस्य समर्थनादर्थान्तरन्यासोऽलङ्कारः ॥[४९]

त्यामुळे या श्लोकात ' कारणद्वारा कार्याचे समर्थन ' या प्रकारचा अलंकार आहे.

इतर टीकाकांपैकी पं. शिवप्रसाद द्विवेदी, पं. नारायण शास्त्री खिस्ते आणि गौरीनाथ पाठक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[५०]

श्लोकात आलेल्या कल्पनेशी जुळणारी कल्पना असणारे काही श्लोक प्रस्तुत नाटकात अन्यत्रही आहेत.

तत्साधुकृतसंधानं प्रतिसंहार सायकम् ।
आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि ।[५१]
जन्म यस्य पुरोर्वंशे युक्तरुपमिदं तव
पुत्रमेवंगुणोपेतं चक्रवर्तिनमाप्नुहि ॥[५२]
एष त्वामभिनवकण्ठशोणितार्थी शार्दूलः पशुमिव हन्मि चेष्टमाम् ।
आर्तानां भयमपनेतुममधन्वा दुष्यन्तस्तव शरणं भवत्विदानीम् ॥[५३]

स्मर एव तापहेतुर्निर्वापयिता स एव मे जातः ।
दिवस इवाभ्रश्यामस्तपात्यये जीवलोकस्य ॥
( अभि. शा. 3.११ )

विवेचन :

तिसऱ्या अंकात प्रेमविह्वल दुष्यंत राजा शकुंतलेला भेटण्यासाठी उत्सुक असतो. एवढयात मालिनी नदीच्या तीरावरील लताकुंजात मदनज्वराने बाधित झालेल्या शकुंतलेची तिच्या मैत्रिणी शुश्रूषा करीत असल्याचे त्याला दिसते. तो एका झाडाआड उभा राहून त्यांच्या गुजगोष्टी ऐकतो. तेव्हा शकुंतला आपल्या व्यथेचे कारण मैत्रिणींना थोडयाशा

[४९] किशोर. पृ. १२८, ओळ क्र. १२ - १३
[५०] भाव प्र. पृ. १०६, ओळ क्र. २३ - २४ लक्ष्मी. पृ १७२-१७३
सुबो . पृ. ६४ ओळ क्र. २४-२५
[५१] अभि. शा. १.११. पृ. ५३६
[५२] कित्ता १.१२ पृ. ५३६
[५३] कित्ता. ६.२७ पृ. ६३५

संकोचाने असे सांगते की, ' ज्या क्षणी ते राजर्षी दृष्टीस पडले त्या क्षणापासून त्यांच्यावर मन जडल्यामुळे माझी अशी अवस्था झाली आहे '.

शकुंतलेचे म्हणणे ऐकल्यावर तो राजा आनंदाने स्वतःशीच म्हणतो की,' जे ऐकावयास मिळावे अशी उत्कट इच्छा होती तेच ऐकले.!'

ग्रीष्म ऋतूच्या शेवटी मेघाने झाकाळलेला दिवस सर्व प्राणिमात्रांना सुखवितो त्याप्रमाणे माझ्या दुःखाचे कारण असलेला मदनच आता मला सुखवीत आहे.

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत सांगितलेल्या विशेषाचे दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याने साधर्म्यपूर्वक समर्थन केले आहे.

प्रस्तुत श्लोकात शंकर नामक टीकाकाराने अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[५४]

यासारखीच कल्पना श्रीहर्षाच्या एका ग्रंथात आली आहे ती अशी–तपति प्रावृषि नितरामभ्यर्णजलागमो दिवसः ।[५५]

अयं स तं तिष्ठति संगमोत्सुको
इवशङ्किसेभीरु ! यतोऽधीरणाम् ।
लभेत वा प्रार्थयिता न वा श्रियं,
श्रिया दुरापः कथमीप्सितो भवेत् ? ॥
( अभि. शा. 3.93 )

**विवेचन :**

प्रेमविह्वल शकुंतलेला राजा दुष्यंताकडे प्रेमपत्र पाठविण्यासाठी अनसूया प्रियंवदेला सांगते. शकुंतला त्यासाठी तयार होते पण राजाच्या भावनांची कल्पना नसल्यामुळे त्या प्रेमपत्राचा अव्हेर तर होणार नाही ना, या विचाराने तिच्या मनाचा थरकाप होतो. ते पाहून राजाला नवल वाटते आणि म्हणतो की, 'लाजरे ! ज्याच्याकडून अवहेलना होईल अशी तुला भीती वाटते तो हा मी तुझ्या सहवासासाठी उत्सुक झालो आहे. लक्ष्मीची इच्छा करणाऱ्यास लक्ष्मी मिळेल किंवा नाही पण प्रत्यक्ष लक्ष्मीनेच ज्याची इच्छा केली आहे अशी व्यक्ती तिला दुष्प्राप्य कशी असेल ? ' याचा अर्थ असा की लक्ष्मीच्या मागे लागलेल्या माणसाला ती मिळेलच असे खात्रीने सांगता येणार नाही. परंतु लक्ष्मीचेच मन ज्याच्यावर जडले आहे त्याची प्राप्ती करुन घेणे लक्ष्मीला मुळीच अवघड नाही.

**निरीक्षण :**

---

[५४] रस. पृ. २१३, ओळ क्र. २४–२५
[५५] रत्नावली 3.१० पृ. १२८

या श्लोकातील पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन तिसऱ्या व चौथ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

टीकाकारांमध्ये राघवभट्ट, नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[५६]

यासारखी कल्पना कालिदासाच्या वाङ्मयात इतरत्रही आढळते. जसे –

दिवं यदि प्रार्थयसे वृथा श्रमः पितुः प्रदेशास्तव देवभूमयः ।
अतोपयन्तारमलं समाधिना न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ॥[५७]

अयं स यस्मात्प्रणयावधीरणामशङ्कनीयां करभोरु! शङ्कसे।
उपस्थितस्त्वां प्रणयोत्सुको जनो न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ॥ *

विवेचन :

प्रेमविह्वल शकुंतला आपल्या मैत्रिणीला असे सांगते की, माझ्या प्रेमपत्राचा राजा अव्हेर तर करणार नाहीत ना ? तेव्हा यावर राजा असे म्हणतो की, तुला ज्या व्यक्तीच्या बाबतीत त्याच्याकडून प्रार्थनाभंग होईल अशी शंका वाटते ती योग्य नाही. तुला भेटण्यासाठी मी उत्सुक आहे. कारण रत्न स्वतः होऊन कोणाचा शोध घेत नाही तर त्याचा शोध सर्वजण करतात. इथे शकुंतलेला रत्नाची उपमा दिली आहे.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या तीन पादांत विशेषाचा निर्देश केला आहे आणि त्याचे समर्थन शेवटच्या पादातील 'न रत्नमन्विष्यति मृग्यते हि तत् ।' या सामान्यवाक्याद्वारा समर्थन केले आहे.

प्रस्तुत श्लोकात गौरीनाथ पाठक यांनी अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे. [५८]

या श्लोकातील चतुर्थ पाद कालिदासाच्या इतर ग्रंथातही आढळतो. [५९]

अन्तर्हिते शशिनि सैव कुमुद्वती मे
दृष्टिं न नन्दयति संस्मरणीयशोभा ।
इष्टप्रवासजनितान्यबलाजनस्य

---

[५६] अर्थद्यो. पृ. २००, ओळ क्र. १५.
किशोर – अत्र सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । पृ.१७२, ओळ क्र. ८
भावप्र. – पृ. १३९, ओळ क्र. १७
[५७] कुमार. ५.४५ पृ. १०२
* कालि.ग्रन्था. पृ. ५६८. चिकित्सक आवृत्तीत हा श्लोक प्रक्षिप्त मानलेला आहे. तथापि अर्थान्तरन्यास अलंकाराचे उदाहरण म्हणून इथे घेतला आहे.

[५८] सुबो. पृ. ८२, ओळ क्र. २२

दुःखानि नूनमतिमात्र – सुदुःसहानि ॥

( अभि. शा. ४.३० )

**विवेचन :**

प्रस्तुतचा श्लोक चौथ्या अंकातील आहे. कण्व मुनींच्या आश्रमात सकाळच्या प्रहरी झोपून उठलेला शिष्य सकाळ झाली का? असे विचारीत बाहेर येतो आणि इकडे तिकडे पाहून म्हणतो की, अरे ! सकाळ झालीच की ! कारण चंद्र अस्ताला गेल्यावर जिचे सौंदर्य आता केवळ स्मृतिरुपाने राहिले आहे. तीच कुमुदिनी माझ्या दृष्टीला आनंद देत नाही. प्रिय व्यक्तीच्या विरहामुळे स्त्रियांची दुःखे कमालीची असह्य असतात.

कुमुदिनीच्या बाबतीत ' इष्टप्रवास ' म्हणजे तिचा जो प्रियकर चंद्र तो मावळणे. कुमुदिनीच्या उदाहरणावरुन संपूर्ण स्त्रीजातीविषयी सर्वसामान्य सिद्धान्त कवीने इथे मांडला आहे.

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश आहे आणि त्याचे समर्थन तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.[६०]

नीलकण्ठ, पं. नवकिशोरकर शास्त्री, नारायणशास्त्री खिस्ते, प. शिवप्रसाद द्विवेदी, गौरीनाथ पाठक, गजेंद्रगडकर, घनश्याम, अभिराम, सातवाहन श्रीनिवासाचार्य आणि श्रीनिवासाचार्य यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशित केला आहे.[६१]

सर्वात प्राचीन टीकाकार काटयवेम या श्लोकावर लिहिताना असे म्हणतो की,

शशिनि चन्द्रे अन्तर्हिते व्यवहिते सति सैव पूर्वमतिरम्यतया दृष्टैव । . . . संस्मरणीयशोभा अपगतक्लान्तिः दृष्टिं नयनं न नन्दयति न प्रीणयति । अर्थान्तरन्यासेन तदेवोपपादयति । इष्टप्रवासजनितानि प्रियवियोगोत्पादितानि

---

[५९] कुमार. ५.४५, पृ. १०२

[६०] उत्तरार्धेन सामान्येन विशेषस्य समर्थनादर्थान्तरन्यास :। अर्थद्योत.पृ..२४१, ओळ क्र. ८ - ९

[६१] नील. पृ. ९४, ओळ क्र. ११-१२,
किशोर. पृ. २४९, ओळ क्र. १७-१८,
भावप्र. पृ. १९५, ओळ क्र. २०-२१,
लक्ष्मी. पृ. २७८
सुबो . पृ. १०९, ओळ क्र. २७-२८
बाल . पृ. १०५, ओळ क्र. २९,
संजी. पृ. ९६, ओळ क्र. २२
अभि. पृ. १५४, ओळ क्र. १९-२०
सहृदय पृ. १२९, ओळ क्र. २२
व्याख्या पृ २४१, ओळ क्र. २१

एषापि प्रियेण विना गमयति रजनी विषाददीर्घतराम् ।
गुर्वपि विरहदुःखमाशाबन्धः साहयति ॥

( अभि. शा. ४.१६ )

विवेचन :

शकुंतलेची सासरी पाठवणी करावयाची असे कण्व मुनींनी ठरविले. त्यावेळी तिला निरोप देण्यासाठी कण्वमुनी इ. सर्वजण एकत्र जमतात आणि ते सर्व औदुंबराच्या झाडाखाली बसतात. तेव्हा शकुंतला अनसूयेला सांगते की,' आपला सहचर केवळ कमळाचे पान आड आल्यामुळे दिसेनासा झाला म्हणून चक्रवाकी आक्रोश करीत आहे आणि मी मात्र पतीपासून इतकी दूर असताही वियोग दुःख सहन करीत आहे '. हे ऐकून अनसूयेने जे तिला सांगितले ते या श्लोकात दिले आहे. ती म्हणते, ' असे बोलू नकोस. ही विरहव्याकुळ झालेली चक्रवाकी सुद्धा दुःखामुळे दीर्घ भासणारी रात्र आपल्या प्रियकराशिवाय घालविते. विरहाचे दुःख कितीही मोठे असले तरी आशाबन्ध ते सहन करावयाचे सामर्थ्य माणसाला देत असतो '.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत आलेल्या ' एषापि प्रियेण विना गमयति रजनीं विषाददीर्घतराम् ।' हे विशेष आहे आणि त्याचे समर्थन शेवटच्या ओळीत आलेल्या ' गुर्वपि विरहदुःखमाशाबन्धः साहयति । ' या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

टीकाकारांपैकी राघवभट्ट, पं. नारायणशास्त्री खिस्ते, गजेंद्रगडकर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यासा सांगितला आहे. [६४]

'आशाही प्रेमिक–प्रेमिकांचे जीवनधारणेचे सूत्र असते '. हा कालिदासाच्या आवडीचा विषय असून त्यातून त्याचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण दिसून येतो. मनुष्याला कितीही दुःख असले तरी ते नाहीसे होऊन शेवटी आनंद मिळतो. त्याच्या साहित्यात या संबंधीची पुढील उदाहरणे आढळतात –

आशाबन्धः कुसुमसदृशं प्रायशो ह्यङ्गनानां
सद्यः पातप्रणयि हृदयं विप्रयोगे रुणद्धि । [६५]
किन्तु तादृशमनुरागं प्रेक्ष्य शक्यं खलु आशाबन्धेनात्मानं धारयितुम् ।[६६]

भवभूतीने देखील असे म्हटले आहे –

---

[६४] अर्थद्यो. पृ. २७१, ओळ क्र. ७,
लक्ष्मी पृ. ३२८-३२९
बाल. पृ. १२४, ओळ क्र. २५-२६.
[६५] मेघ. १०. पृ. ४३
[६६] विक्रमो. अंक 3, पृ. ४७४, ओळ क्र. ८-९

प्राणत्राणं आशातन्तुर्न च कथयतात्यन्तमुच्छेदनीयः कथमपि करोत्यायताक्ष्याः स एकः।[६७]

शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने
भर्तुर्विप्रकृतापि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ।
भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भोगेष्वनुत्सेकिनी
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामा कुलस्याधयः ॥
( अभि. शा. ४.१८ )

विवेचन :

कण्व मुनींच्या आश्रमातून शकुंतला जेव्हा सासरी जाण्यास निघते तेव्हा ते तिला उपदेश करतात की, ' बाळे, तुला आता उपदेश करावयास पाहिजे. आम्ही अरण्यात राहणारे असलो तरी जगात कसे वागावे याची आम्हांला चांगली कल्पना आहे '. हे ऐकून शार्ङ्गरव म्हणतो की, ' बुद्धिमान लोकांना अगम्य काहीही नसते. ' त्यानंतर मुनी म्हणतात की, ' वडील माणसांची सेवा कर. प्रेमळ मैत्रिणींप्रमाणे सवतींशी वर्तन ठेव. पतीने अपराध करुनही रागाने त्याच्या मर्जीविरुद्ध वागू नकोस. सेवकांशी फार सौजन्याने वाग आणि वैभव मिळाले असताही गर्विष्ठ बनू नकोस. अशा रीतीने वागणाऱ्या स्त्रियांना गृहिणी ही पदवी प्राप्त होते. आणि याच्या उलट वर्तन असणाऱ्या स्त्रिया कुळाला कलंक असतात.

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या तीन ओळींत विशेषाचे निर्देशन आहे. ते असे की, शकुंतला कशाप्रकारे सासरी वागणार आहे. त्याचा निर्देश केल्यावर तेच योग्य आहे हे दाखविताना त्याचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या (यान्त्येवं गृहिणीपदं युवतयोः वामाः कुलस्याधयः । ' या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. ' म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

टीकाकारांपैकी राघवभट्ट, नवकिशोरकरशास्त्री व शिवप्रसाद द्विवेदी यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.

हा श्लोक साहित्य दर्पणामध्ये उपदिष्टाचे उदाहरण म्हणून दिला आहे.

भानुः सकृद युक्ततुरङ्गएव रात्रिन्दिवं गन्धवहः प्रयाति ।

---

[६७] माल.मा. ९.२६, ओळ क्र. ३९६

शेषः सदैवाहितभूमिभारः षष्ठांशवृत्तेरपि धर्म एषः ॥

( अभि. शा. ५.४ )

विवेचन :

पाचव्या अंकामध्ये दुष्यंत राजा धर्मासनावरून उठल्यावर कण्वमुनींचे शिष्य आल्याची वार्ता राजाच्या कानांवर घालण्याचा कंचुकीला धीर होत नाही. राज्याचा कारभार म्हणजे विश्रांती नाहीच. हे स्पष्ट करताना कंचुकी म्हणतो की,

' सूर्याने आपल्या रथाला जे घोडे जुंपले ते कायमचेच, रात्र नाही की दिवस नाही, वारा वहातच असतो, शेषाने पृथ्वीचा भार नित्यच धारण केला आहे आणि प्रजेकडून त्यांच्या उत्पन्नाचा सहावा भाग करभार घेणाऱ्या राजाचा सुद्धा हाच धर्म आहे. ' थोडक्यात राजाने विश्रांती न घेता कर्तव्यतत्पर असले पाहिजे.

निरीक्षण :

या श्लोकात पहिल्या तीन पादांत तीन भिन्न भिन्न विशेष आले आहेत आणि त्यांचे समर्थन शेवटच्या पादात आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

टीकाकारांपैकी पं. नारायणशास्त्री खिस्ते यांनी फक्त या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[६९]

सतत काम करणे या विषयावर संस्कृत वाङ्मयात काही उदाहरणे आढळतात.

किं शेषस्य भरव्यथा न वपुषि क्ष्मां न क्षिपत्येष यत् ?
किं वा नास्ति परिश्रमो दिनकरस्यास्ते यन्निश्चलः ?
किन्त्वङ्गीकृतमुत्सृजन् कृपणवच्छ्लाघ्यो जनो लज्जते;
निर्वाहः प्रतिपन्नवस्तुषु सतामेतद्धि गोत्रव्रतम् ।[७०]
अवैमि ते सारमतः खलु त्वां कार्ये गुरुण्यात्मसमं नियोक्ष्ये ।
व्यादिश्यते भूधरतामवेक्ष्य कृष्णेन देहोद्वहनाय शेषः ॥[७१]
सदा चरति खे भानुः सदा वहति मारुतः ।
सदा धत्ते भुवं शेषः सदा धीरोऽविकत्थनः ॥ [७२]

स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः
प्रतिदिनमथवा ते वृत्तिरेवंविधैव ।
अनुभवति हि मूर्ध्ना पादपस्तीव्रमुष्णं
शमयति परितापं छायया संश्रितानाम् ॥

---

[६९] लक्ष्मी पृ. ३६४-३६५
[७०] मुद्राराक्षस २.१८, पृ. १३५
[७१] कुमार. 3.13, पृ. ८६

( अभि. शा. ५.७ )

**विवेचन :**

राजाचे स्तवन करताना पड्यामध्ये एक वैतालिक असे म्हणतो की, ' स्वतःच्या सुखाची अभिलाषा न बाळगता लोकांसाठी तू प्रतिदिन क्लेश सहन करतोस. पण ही तुझी वृत्तीच आहे. वृक्ष आपल्या मस्तकाने सूर्याचा प्रखर ताप सहन करतो, पण आपल्या सावलीने वृक्ष विसावा घेणाऱ्या लोकांचा ताप दूर करतो '. याचा आशय असा की राजा स्वतःच्या मस्तकावर राज्यकारभाराची सारी जबाबदारी धारण करतो व अपार क्लेश सहन करतो, पण प्रजेला मात्र सुख देतो.

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकात पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश आहे आणि त्याचे समर्थन शेवटच्या दोन ओळींत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

इथे राजाने स्वतःच्या सुखाची अभिलाषा न करणे व लोकांसाठी सतत क्लेश सहन करणे आणि वृक्षाला सूर्याची प्रखर उष्णता सहन करावयास लागणे व विसावलेल्या लोकांचा ताप नष्ट करणे हे राजा व वृक्ष यांच्यात साधर्म्य आहे.
शंकर नामक टीकाकाराने या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[७३]

प्रस्तुत श्लोक म्हणजे एक चांगले सुभाषित आहे.

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैः
फलाम्बुभिर्दूरविलम्बिनो घनाः ।
अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः
स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥

( अभि. शा. ५.१२ )

**विवेचन :**

राजा दुष्यंताकडे शकुंतलेसह कण्वशिष्य येतात आणि कंचुकी त्यांना राजाकडे नेतो. तेव्हा पुराहित त्यांना राजाची ओळख करून देताना म्हणतो की, ' हे तपस्वीजनहो, वर्ण व आश्रम यांचा प्रतिपाळ करणारे हे आमचे महाराज अगोदरच आसनाचा त्याग करून आपली प्रतीक्षा करीत आहेत '. यावर शार्ङ्गख म्हणतो की,' महाराज अभिवंदनीय असतीलही पण आम्हांस यात विशेष काही वाटत नाही. कारण –

---

[७२] सा.द.पृ. ४१५

[७३] अर्थान्तरन्यासमाह – हि यतः पादपो वृक्षः मूर्ध्ना शिरसा तीव्रतापमत्यसंतापमनुभवति सहते संश्रितानात्मतटावस्थलान । छायया परितापं संतापं शमयति । रस. फृ. २५.3, ओळ क्र. ७-१०

फलांचा बहर आला म्हणजे वृक्ष खाली वाकतात आणि नवीन पाण्याच्या भाराने मेघ खूप खाली येतात. ऐश्वर्याच्या योगाने थोर लोक उद्धट होत नाहीत ( त्यांचा नम्रपणा नष्ट होत नाही ) – परोपकारी लोकांचा हा स्वभावच आहे.

**निरीक्षण :**

या श्लोकात पहिल्या तीन ओळींत तीन भिन्न भिन्न विशेष सांगितले असून त्यांचे समर्थन चौथ्या ओळीत आलेल्या ' परोपकारी लोकांचा हा स्वभावच असतो '. या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. त्यामुळे इथे अर्थान्तरन्यास आहे.

वृक्षाने खाली येणे, मेघाने खाली उतरणे व वैभवाने चढून न जाणे यामध्ये आणि परोपकारी माणसाचा स्वभाव यामध्ये ' दुसऱ्यावर उपकार करणे' हे साधर्म्य आहे.

टीकाकार राघवभट्ट, पं. नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी आणि नारायणशास्त्री खिस्ते यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[७४]

प्रस्तुतचा श्लोक भर्तृहरीच्या नीतिशतकातही आढळतो[७५] म्हणून त्याच्या कर्त्याबद्दल निश्चित सांगता येत नाही.

शार्ङ्गरवः – किं? कृतकार्यद्वेषः ? धर्मं प्रति विमुखता? कृतेऽवज्ञा?
राजा – कुतोऽयमसत्कल्पनाप्रसङ्ग ?
शार्ङ्गरवः – मूर्च्छन्त्यमी विकाराः प्रायेणैश्वर्यमत्तेषु ॥

( अभि. शा. ५.१८ )

**विवेचन :**

पाचव्या अंकात राजा दुष्यंत शकुंतलेला ओळखत नाही एवढेच नव्हे तर तो ' मी या स्त्रीबरोबर पूर्वी विवाह केला होता काय ? ' असा प्रश्न उपस्थित करतो. तेव्हा शार्ङ्गरवास संताप उत्पन्न होऊन तो राजास विचारतो की, ' स्वतः पूर्वी केलेल्या गोष्टीविषयी कसला हा तिरस्कार ? की धर्माविषयी उदासीनता आहे ? की केलेल्या गोष्टींकडे मुद्दाम केलेले दुर्लक्ष आहे ? शार्ङ्गरवाचे हे उद्गार राजाला झोंबतात. म्हणून त्याचे बोलणे पुरे होऊ न देता ' जे घडलेच नाही त्याची कल्पना करुन हा प्रश्न तुम्ही कशासाठी विचारीत आहात ?' राजाच्या या प्रश्नाकडे दुर्लक्ष करुन शार्ङ्गरव त्याचा पुन्हा असा अधिक्षेप करतो की, 'वैभवामुळे धुंद झालेल्या लोकांमध्ये असले विकार प्रबळ होतात. '

---

[७४] स्वभाव इत्यादिस्तु हि शब्दानुपादनेऽप्यर्थान्तरन्यासः । अर्थद्यो. पृ.३०४ ओळ क्र.२० – २१
अत्र स्वभाव इत्यादिस्तु हि शब्दानुपादानेऽपि सामान्येन विशेष समर्थनरुपोऽर्थान्तरन्यासः । किशोर. पृ. ३३४, ओळ क्र. १४-१५. अस्मिच्छ्लोके – अर्थान्तरन्यासः ।साप्रस्तुतयोरङ्गिभावेन सङ्कर । भाव. प्र . पृ. २६५, ओळ क्र. १५. स्वभाव इत्यादिस्तु हि शब्दानुपादानेऽर्थान्तरन्यासः । लक्ष्मी.पृ. ३८४-३८५.
[७५] नी.श ६१ पृ.३५

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकाच्या शार्ङ्गरवाच्या पहिल्या उक्तीत विशेषाचे निर्देशन आहे. त्याचे समर्थन् दुसऱ्या ओळीत आलेल्या शार्ङ्गरवाच्या उक्तिरुप सामान्याद्वारा समर्थन केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

प्रस्तुत श्लोकात कार्यकारणभावाधारित अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो. श्लोकातील पहिल्या ओळीत कार्य असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील कारणद्वारा केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार संभवतो.

राघवभट्ट, नवकिशोरकरशास्त्री. पं. नारायणशास्त्री खिस्ते आणि गौरीनाथ पाठक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे. [७६]

स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु
संदृश्यते किमुत याः प्रतिबोधवत्यः ।
प्रागन्तरिक्षगमनात् स्वमपत्यजात-
मन्यैर् द्विजैः परभृताः खलु पोषयन्ति ॥
( अभि. शा. ५.२२ )

**विवेचन :**

दरबारामध्ये दुष्यंत राजा शकुंतलेला ओळखत नाही. तेव्हा शकुंतला त्यास अंगठी दाखवून त्याची खात्री पटविण्याचे ठरविते. पण तिला तिच्या बोटात अंगठी दिसत नाही. आता शेवटचा उपाय म्हणून आश्रमात एकांतात घडलेल्या नाजूक घटनेची ( दीर्घापाङ्ग नाम हरिणाच्या पाडसाने पाणी पिणे ) आठवण त्याला करुन देते. तेही राजाला मान्य होत नाही. तेव्हा गौतमी राजास असे म्हणते की, ' आश्रमात वाढलेल्या या मुलीला लबाडी म्हणजे काय ते माहीत सुद्धा नाही '. यावर राजाने जी प्रतिक्रिया व्यक्त केली ती प्रस्तुत श्लोकात आहे. राजा म्हणाला,' हे वृद्ध तापसी बाई ! स्त्रियांचा उपजत धूर्तपणा पक्ष्यांमध्येही दिसून येतो; मग ज्यांना बुद्धीची देणगी लाभली आहे अशा स्त्रियांच्या ठिकाणी उपजत धूर्तपणा असला तर त्यात काय नवल ? आपली पिले आकाशात संचार करण्यापूर्वी कोकिळ पक्षी दुसऱ्या पक्ष्यांकडून पोषण करवितात .'

---

[७६] आदिकारकदीपकसंशय हेत्वर्थान्तरन्यासानुप्रासाः । अर्थद्यो. पृ. ३१२, ओळ क्र. १०-११
अत्रार्थान्तरन्यासोऽलङ्कारः। किशोर. पृ. ३४६, ओळ क्र. १७
अत्र अर्थान्तरन्यासः । लक्ष्मी. पृ. ४०६
अत्र अर्थान्तरन्यासालङ्कारः। सुबो. पृ. १४७ ओळ क्र.२७

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकाच्या पहिल्या ओळीत सामान्याचा निर्देश केला असून त्याचे समर्थन तिसऱ्या व चौथ्या ओळींत आलेल्या विशेषाद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

राघवभट्ट, नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, नारायणशास्त्री खिस्ते, गौरीनाथ पाठक व अभिराम यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास दाखविला आहे.[७७]

अतः परीक्ष्य कर्तव्यं विशेषात् संगतं रहः ।
अज्ञातहृदयेष्वेवं वैरीभवति सौहृदम् ॥
( अभि. शा. ५.२४ )

**विवेचन :**

दुर्वासाच्या शापाच्या प्रभावामुळे दुष्यंत राजा शकुंतलेबरोबर लग्न केल्याचे मान्य करीत नाही व तिला ओळखत नाही. तसेच तिचा स्वीकार करण्याचे नाकारतो. तेव्हा शकुंतला रडू लागते. ते पाहून शार्ङ्गरव तिला असे म्हणतो की, ' अशा रीतीने स्वतः केलेली चूक घात करते. म्हणून चोरून प्रेम करावयाचे असेल तर चांगली पारख करूनच केले पाहिजे. ज्याच्या हृदयाची पारख झालेली नाही अशा लोकांच्या बाबतीत प्रेमाचे अशाप्रकारे वैरात रूपांतर होते.'

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोक शकुंतलेला अथवा समग्र महिला वर्गाकरिता चांगला उपदेश आहे पण हा उपदेश फार उशिरा केलेला आहे. त्यामुळे शकुंतलेला याचा फारसा उपयोग झाला नाही.

या श्लोकात सामान्याद्वारा विशेषाचे वैधर्म्याने समर्थन केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

टीकाकारांपैकी राघवभट्ट असे लिहितो की,

---

[७७] अर्थद्यो. पृ. ३२१, ओळ क्र. १२
अत्र विशेषेण सामान्यसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः। किशोर. पृ. २६२, ओळ क्र. ७.
भावप्र. पृ. २८५, ओळ क्र. १४
लक्ष्मी. पृ. ४१४-४१५
सुबो. पृ. १५१, ओळ क्र. ३०-३१
अभि. पृ. २१६, ओळ क्र. ८

अज्ञातहृदयेषु व्यवहारादिनाज्ञातचित्तेषु सौहृदं मैत्री वैरीभवति । अयं वैधर्म्येणार्थान्तरन्यासः ।[७८]

नवकिशोरकर शास्त्री, शिवप्रसाद द्विवेदी, नारायणशास्त्र खिस्ते आणि गौरिनाथ पाठक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[७९]

तदेषा भवतः कान्ता त्यज वैनां गृहाण वा ।
उपपन्ना हि दारेषु प्रभुता सर्वतोमुखी ।।

( अभि. शा. ५.२६ )

**विवेचन :**

शेवटपर्यंत दुष्यंत राजा शकुंतलेचा पत्नी म्हणून स्वीकार करीत नाही. शार्ङ्गरवाने त्याबाबत राजाबरोबर बराच वेळ कलहही केला. शेवटी शारद्वतास असे वाटले की, हा कलह कुठेतरी थांबला पाहिजे. म्हणून शारद्वत शार्ङ्गरवाला अधिक बोलू न देता तो म्हणाला, 'आपण गुरूंचा निरोप सांगितला आहे. तेव्हा आपण आता परत जाऊ या.' त्यानंतर तो राजाला उद्देशून म्हणाला, ' तर तात्पर्य असे की, ही तुझी पत्नी आहे हिला ठेवून घे अथवा सोडून दे. आपल्या पत्नीवर पतीची निरंकुश सत्ता असावी हेच युक्त आहे.'

**निरीक्षण :**

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश आहे आणि त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे.

श्री. नवकिशोरकरशास्त्री, पं. शिवप्रसाद द्विवेदी, गौरीनाथ पाठक यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[८०]

---

[७८] अर्थद्यो. पा २२४, ओळ क्र. ११-१२

[७९] अत्र - शकुंतलादुष्यन्तयोः सङ्गते वक्तव्ये . . . वैधर्म्येण सामान्येन विशेष समर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । किशोर. पृ ३६८ ओळ क्र. १८-१९.
भावप्र. पृ. २९०, ओळ क्र. ९.
अत्र शकुंतलादुष्यन्तयोः सङ्गतस्य कर्तव्यत्वे . . . उत्तरार्धे वैधर्म्येणार्थान्तरन्यासाः । लक्ष्मी पृ. ४२१
अ ज्ञातं व्यवहारेण अविदितं हृदयं येषां तेषु सौहृदं न्यहः एवं वर्तमानप्रकारेण वैरीभवति। अत्र वैधर्म्येण सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासालङ्कारः । सुबो. पृ. १५४. ओळ क्र. २१ - २२

[८०] अत्र सामान्येन विशेष समर्थनरूपोऽन्तरन्यासोऽङ्कारः । किशोर. पृ. ३७२, ओळ क्र. १३-१४,

हे एक सामान्य सुभाषित असून त्यामध्ये स्त्रियांवर पतीचा पूर्णाधिकार प्रतिपादित केला आहे. स्त्रियांच्या स्वातंत्र्याच्या बाबतीत मनूने असे म्हटले आहे की,

पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने।
रक्षन्ति स्थविरे पुत्राः न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ॥[८१]

कुमुदान्येव शशाङ्कसविता बोधयति पङ्कजान्येव ।
वशिनां हि परपरिग्रहसंश्लेषपराङ्मुखी वृत्तिः ॥
( अभि. शा. ५.२८ )

**विवेचन :**

दुर्वासाच्या शापाच्या प्रभावामुळे दुष्यंत राजा शकुंतलेचा स्वीकार करण्याचे नाकारतो. तेव्हा शार्ङ्गरव तिला टाकून बोलतो आणि राजाचीही खूप निर्भर्त्सना करतो. अखेर तिला तेथेच थांबावयास सांगताना तो म्हणतो की, ' राजा म्हणतो त्याप्रमाणे तू दुर्वर्तनी असशील तर कुळाला बट्टा लावणाऱ्या तुझ्यासारख्या मुलीशी पित्याचा काय संबंध? आणि जर तू सद्वर्तनी असशील तर पतीच्या घरी तुला दास्य देखील उचित आहे. तेव्हा तू इथेच थांब .' हे ऐकून दुष्यंत राजा त्यास म्हणतो की, ' हे मुनीकुमार ! या स्त्रीची विनाकारण का वंचना करीत आहेत? चंद्र फक्त कुमुदानांच प्रफुल्लित करतो आणि सूर्य फक्त पंकजांनाच उमलवितो. मनोनिग्रही पुरुषांची वृत्ती परस्त्रीशी संबंध ठेवण्याच्या बाबतीत उदासीन असते.'

**निरीक्षण :**

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकात शिवप्रसाद द्विवेदी, गजेंद्रगडकर व नवकिशोरकर शास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सांगितला आहे.[८२]

---

भावप्र. पृ. २९२, ओळ क्र. २८,
सुबो. पृ. १५५, ओळ क्र. २९
[८१] मनु. ९.3, पृ. ७3८
[८२] भावप्र. पृ. २९६, ओळ क्र. ६,

सहजं किल यद् विनिन्दितं न हि तत् कर्म विवर्जनीयकम् ।
पशुमारणकर्मदारुणोऽप्यनुकम्पामृदुरेव श्रोत्रियः ( याज्ञिकः ) ॥

(अभि. शा. ६.१ )

विवेचन :

दुष्यंताचे नाव कोरलेली रत्नजडित अंगठी सरकारी अधिकाऱ्यांना एका कोळ्याजवळ सापडते. त्या कोळ्याला ते पकडतात आणि तो चोर असला पाहिजे अशा समजुतीने ते त्याला फटके मारतात. ही अंगठी तुला कुठे सापडली असे त्यास विचारताच तो स्वतःच्या व्यवसायाविषयी सांगतो. तो म्हणतो की, ' मी शक्रावतारामध्ये राहणारा कोळी असून मासेमारी करून उपजीविका करतो '. ते ऐकून राजश्यालक त्याच्या धंद्याची हेटाळणी करतो. हे त्यास आवडत नाही. तो म्हणतो की , ' असे म्हणू नका. लोक निंदा करतात म्हणून वाडवडिलांपासून चालत आलेले काम सोडून देणे योग्य नाही. यज्ञक्रियेमध्ये पशूचा वध करण्यामुळे निर्दय भासणारा याज्ञिक दयार्द्रच असतो . '

निरीक्षण :

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळीत सामान्याचा निर्देश असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळीत आलेल्या विशेषद्वारा वैधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.

इथे कालिदासाने ' कितीही वाईट अथवा घृणास्पद असा जातीचा धंदा असला तरी तो सोडू नये.' या नैसर्गिक सत्याकडे लोकांचे मन आकृष्ट केले आहे. भगवान श्री-कृष्णांनी भगवद्गीतेत हे सांगितले आहे. '

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥[८3]

मनुस्मृतीदेखील पुढीलप्रमाणे सांगते –

वरं स्वधर्मो विगुणो न पारक्यः स्वनुष्ठितः ।
परधर्मेण, जीवन् हि सद्यः पतति जातितः ॥ [८४]

---

बाल.पृ. १६०, ओळ क्र. २४
सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः ।
किशोर पृ. ३०५, ओळ क्र. २८

[८3] गीता 3.35 पृ. १०१

[८४] मनु, १०.९७, पृ. ८६६

स्वप्नो नु, माया नु, मतिभ्रमो नु,
क्लृप्तं नु तावत् फलमेव पुण्यम् ।
असंनिवृत्त्यै तदतीतमेव
मनोरथा नाम तटप्रपाता ॥

( अभि. शा. ६.१० )

**विवेचन :**

राजा दुष्यन्ताची पश्चातापदग्ध अवस्था व हताशवृत्ती यांचे सुंदर चित्रण या श्लोकात कालिदासाने केले आहे. कोळ्याकडून मिळालेली व स्वतःचे नाव असलेली अंगठी राजाने पाहताच त्याची पूर्वस्मृती जागृत झाली आणि शकुंतलेची सारी हकिकत आठवली. पूर्वीची सारी रमणीय दृश्ये डोळ्यांसमोर येऊन त्याला पराकाष्ठेचे दुःख झाले. त्याला पश्चाताप वाटून तो शकुंतलेशी त्याचे पुनर्मीलन होईल काय असा विचार करतो. तेव्हा विदूषक त्यास त्याच्यावर विश्वास न बसल्याने त्यास म्हणतो की, ' हे मित्रा ! ते सारे स्वप्न होते की केवळ माया होती? की माझ्या बुद्धीला भ्रम झाला होता? अथवा माझ्या पुण्याचे फळ तेवढेच असल्यामुळे ते क्षीण झाल का? सारे काही संपले आणि ते पुन्हा परत येणार नाही. माझ्या साऱ्या आशा आता नदीच्या काठावरील कोसळून पडणाऱ्या दरडीप्रमाणे झाल्या आहेत.'

**निरीक्षण :**

राजा दुष्यंताची पश्चातापदग्ध अवस्था व हताशवृत्ती यांचे सुंदर चित्रण या श्लोकात कालिदासाने केले आहे. या श्लोकातील तिसऱ्या ओळीत आलेल्या विशेषाचे चौथ्या ओळीतील सामान्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

पं. नारायणशास्त्री खिस्ते व अभिराम यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[८५]

---

[८५] लक्ष्मी.पृ.४८६-४८९ अभि. पृ. २५३, ओळ क्र. १६-१७

कथं नु तं बन्धुरकोमलाङ्गुलिं
करं विहायासि निमग्नमम्भसि?

अथवा

अचेतनं नाम गुणं न लक्षयेन्मयैव
कस्मादवधीरिता प्रिया ॥

( अभि. शा. ६.१३ )

विवेचन :

राजा दुष्यंताने स्वतःचे नाव कोरलेली अंगठी पाहताच त्याची पूर्वस्मृती जागृत झाली. त्याला फार दुःख झाले. तेव्हा तो हे सर्व घडले याचे कारण ही अंगठी आहे म्हणून तिला दूषण दिले पाहिज. असा विचार करुन म्हणतो की,
'हे मुद्रिके, सुंदर व कोमल अंगुली असलेला हात सोडून तू पाण्यात कशी उडी घेतलीस? अथवा ( अंगठीसारख्या ) अचेतन वस्तूला ( सौंदर्य, प्रेम इ. ) गुणांची पारख झाली नाही तर त्यात काही नवल नाही. पण बुद्धिमान असूनही प्रियेचा त्याग केला तो कशासाठी ? '

निरीक्षण :

जडाला गुणांची पारख नसते ही गोष्ट अर्थान्तरन्यास अलंकारातून सांगितली आहे. ती गोष्ट दुष्यंतालाही लागू पडते. कारण दुष्यंताने शकुंतला या गुणी पत्नीचा त्याग केला आहे. या अर्थान्तरन्यासातून स्वतःचे दुर्भाग्य व स्तःची निंदा दुष्यंताने केली असून त्यास शकुंतला – त्यागाबद्दल पश्चाताप झाल्याचे दिसून येते.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या दोन ओळींत ' मुद्रिकेने सुंदर व कोमल अंगुली असलेल्या हाताचा त्याग करणे, हे प्रस्तुत विशेष आहे आणि त्याचे समर्थन ' अचेतनं नाम गुणं न लक्षयेत् ' या तिसऱ्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे. म्हणून इथे अर्थान्तरन्यास आहे.[८६]

---

[८६] अत्र तृतीयचरणे सामान्येन विशेषसमर्थनरुपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । किशोर. पृ. ४४२, ओळ क्र.२२
लक्ष्मी पृ. ४९८.
बाल. पृ. १८८, ओळ क्र. २१-२३

श्री. नवकिशोरकर शास्त्री, पं. नारायण शास्त्री खिस्ते, एस डी. गजेंद्रगडकर यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[८६]

योो हनिष्यति वध्यं त्वां रक्ष्यं रक्षिष्यति द्विजम् ।
हंसो हि क्षीरमादत्ते तन्मिश्रा वर्जयत्यपः ॥
( अभि. शा. ६.२८ )

**विवेचन :**

शकुंतलेच्या वियोगाने राजाच्या मनात औदासिन्य आले होते. ते दूर करुन त्याच्या ठिकाणी असलेला पराक्रम जागृत करुन आपल्या कार्यात मदत व्हावी या हेतूने इंद्र आपला सारथी मातली राजाकडे पाठवितो. त्यावेळी तो विदूषकाला पकडले असता तो ओरडतो व होणाऱ्या त्रासापासून सोडविण्याची विनंती राजास करतो. तेव्हा राजा धनुष्य-बाण घेऊन म्हणतो की, ' तिरस्कारिणी ' विद्येमुळे उन्मत्त झालेल्या तुला शोधून काढीन. हा माझा बाण ठार करण्यास योग्य अशा तुला ठार करील आणि रक्षण करण्यास योग्य अशा ब्राह्मणाचे रक्षण करील, पाणीमिश्रित दुधातील दूध हंस फक्त तेवढे वेगळे काढून घेतो आणि पाणी टाकून देतो.'

**निरीक्षण :**

इंद्रास असुरांचा पराभव करण्यासाठी राजाची मदत घ्यावी वाटली. त्यावेळी त्याचे ठिकाणी असलेले औदासीन्य दूर करुन त्याने मदतीस यावे यासाठी इंद्राने मातलीला त्याच्याकडे पाठविले. तेव्हा त्याने केलेल्या योजनेनुसार राजा विदूषक या ब्राह्मणाचे रक्षण करावे यासाठी तयार होतो. याचे विवेचन प्रस्तुत अर्थान्तरन्यासाने केले आहे. हे करताना कालिदासाने हंस पक्षाचे उदाहरण दिले आहे. हंस पक्षी पाणीमिश्रित दुधातील केवळ दूधच प्राशन करतो त्याप्रमाणे राजा केवळ विदूषकाचे रक्षण करील व विदूषकास त्रास देणाऱ्यास ठार करील.

या श्लोकात पहिल्या ओळीत विशेष आले असून त्याचे समर्थन शेवटच्या ओळीतील 'हंस दूध काढून घेतो आणि त्याच्यात मिसळलेले पाणी तेवढे शिल्लक ठेवतो' या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे.

---

कृताः शरव्य हरिणा तवासुराः
शरासनं तेषु विकृष्यतामिदम्
प्रसादसौम्यानि सतां सुहृज्जने
पतन्ति चक्षूषि, न दारुणाः शराः ॥

( अभि. शा. ६.२९)

विवेचन :

राजाच्या मनातील औदासीन्य दूर व्हावे आणि त्याच्या ठिकाणचा पराक्रम जागृत व्हावा यासाठी इंद्राचा सारथी त्यावेळी विदूषकाला पकडतो. तेव्हा विदूषक जोराने ओरडतो. त्यावेळी राजा विदूषकास राक्षसानेच पकडले आहे असे समजून राक्षसास मारण्यासाठी धनुष्यबाण सज्ज करतो. ते पाहून मातली राजास म्हणतो की, असुरांशी तू लढाई करावीस असे इंद्राने ठरविले आहे. त्या असुरांना उद्देशून हे धनुष्य वाकव. मित्रांवर सज्जनांचे प्रेमळपणामुळे झालेले कटाक्ष पडतात – तीक्ष्ण बाण पडत नसतात.'

निरीक्षण :

शकुंतलेच्या वियोगामुळे राजा दुष्यंताच्या मनात औदासीन्य निर्माण झाले होते. याच वेळी इंद्रास असुरांचे पारिपत्य करण्यासाठी दुष्यंताची मदत हवी होती. त्यासाठी राजाचा पराक्रम जागृत करणे आवश्यक होते. या सर्व गोष्टी कालिदासाने या अर्थान्तरन्यासद्वारा साधल्या आहेत असे दिसते. मातलीने पकडलेल्या विदूषकाची तो ब्राह्मण म्हणून सुटका करणे हे राजाचे कर्तव्य होते, हेही दिसून येते. या कर्तव्यपूर्तीसाठी त्याने प्रयत्न केला आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश केला असून तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने समर्थन केले आहे, म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकात नवकिशोरकर शास्त्री आणि पं. शिवप्रसाद द्विवेदी यांनी अर्थान्तरन्यास अलंकार आहे.[८७]

ज्वलति चलितेन्धनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणी कुरुते ।
प्रायः स्वः महिमानं शोभात् प्रतितपद्यते हि जन : ॥

( अभि. शा. ६.३१ )

विवेचन :

राजा दुष्यंताने सारथी मातली याला त्याने विदूषकास त्रास देण्याचे कारण विचारले असता मातली म्हणाला,

---

[८७] किशोर. पृ. ४९, ओळ क्र. २३

'कोणत्या तरी कारणाने झालेल्या मनस्तापामुळे खिन्न झालेल्या तुम्हाला राग आणण्यासाठी मी त्यास त्रास दिला. कारण, इंधन चाळवले की अग्नी भडकतो, डिवचलेला सर्प फणा उबारतो ; मनाचा क्षोभ झाला असता सामान्यतः लोकांचा प्रभाव दिसून येतो.'

**निरीक्षण :**

प्रस्तुत श्लोकातील पहिल्या ओळीत दोन विशेषांचा निर्देश असून त्या दोहोंचे समर्थन शेवटच्या ओळीत आलेल्या सामान्याद्वारा साधर्म्याने केले आहे म्हणून इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

या श्लोकात गजेंद्रगडकर यांनी अर्थान्तरन्यास अलंकार निर्देशिला आहे.[८८]

> सिध्यन्ति कर्मसु महत्स्वपि यन्नियोज्याः
> संभावनागुणमवेहि तमीश्वराणाम् ।
> किं वाऽभविष्यदरुणस्तमसां विभेत्ता
> तं चेत् सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत् ॥
> ( अभि. शा. ७.४ )

**विवेचन :**

सातव्या अंकाच्या सुरुवातीला इंद्राला मदत करुन राजा दुष्यंत मातलीबरोबर परत येत असता राजा इंद्राची त्याने केलेल्या सत्काराबाबत प्रशंसा करतो तेव्हा मातली असे म्हणतो की, इंद्राने तुझा सत्कार करण्यात गैर काय केले आहे? ' ते ऐकून राजा त्यास म्हणतो की, ' या बाबतीत इंद्राच्या प्रभावाची तारीफ करावयास पाहिजे. फार मोठया (अवघड) कामात सेवकांना जे यश मिळते, हा त्यांच्या स्वामीने केलेल्या त्यांच्या गौरवाचा प्रभाव होय. सूर्याने आपल्या रथावर अरुणाची, रथाच्या धुरेवर योजना केली नसती तर अंधकाराचा नाश करण्यास तो समर्थ झाला असता काय? '

**निरीक्षणः**

प्रस्तुत श्लोकात पहिल्या दोन ओळींत विशेषाचा निर्देश केला असून त्याचे समर्थन शेवटच्या दोन ओळींत आलेल्या सामान्याद्वारा वैधर्म्याने केले असल्याने इथे अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

पं. नवकिशोरकरशास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार सांगितला आहे.[८९]

> मनोरथाय नाशंसे किं बाहो ! स्पन्दसे मुधा ? ।

---

[८८] बाल. पृ. २०८ ओळ क्र. २६
[८९] किशोर. पृ. ५०३, ओळ क्र. १३

पूर्वावधीरितं श्रेयो दुःखं हि परिवर्तते ॥

( अभि. शा. ७.१३ )

**विवेचन :**

इंद्रास मदत करून इंद्रसारथी मातलीबरोबर परत येताना दुष्यंत राजा मारिचाश्रमात पोहोचतो. तेथील आश्रमाचे सौंदर्य पाहून तिथे थोडा वेळ थांबतो. तेव्हा राजाला शुभशकुनाचा संकेत मिळतो. राजा म्हणतो की,

' माझा मनोरथ पूर्ण होईल ( शकुंतला मला पुन्हा भेटेल ) अशी मला आशा नाही. मग हे बाहो ! विनाकारण का बरे स्फुरण पावत आहेस ? भाग्याचा एकदा तिरस्कार केला म्हणजे ते मोठया कष्टाने परत येते.

**निरीक्षण :**

राजा दुष्यंताच्या मनावर शकुंतलेच्या त्यागाचा किती गहन परिणाम झाला हे या अर्थान्तरन्यासद्वारा कालिदासाने दाखविले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या ओळींत विशेषांचा निर्देश केला असून त्याचे समर्थन दुसऱ्या ओळींत आलेल्या सामान्य उक्तिद्वारा साधर्म्याने केले आहे.

राघवभट्ट, नवकिशोरशास्त्री, श्री.. शिवप्रसाद द्विवेदी, पं. नारायणशास्त्री खिस्ते, गौरीनाथ शास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[१०]

सुतनु ! हृदयात् प्रत्यादेशव्यलीकमपैतु ते
किमपि मनसः संमोहो मे तदा बलवानभूत ।
प्रबलतमसामेवंप्रायाः शुभेषु हि वृत्तयः
स्रजमापिशिरस्यन्धः क्षिप्तां धुनोत्यहिशङ्कया ॥

( अभि. शा. ७.२४)

**विवेचन :**

इंद्राचा निरोप घेऊन मातलीसह रथात बसून दुष्यंत राजा पुन्हा पृथ्वीकडे परत येत असता तो मारिचाश्रमात थोडा वेळ थांबतो. तिथे शकुंतला त्याच्या दृष्टीस पडते. तेव्हा तो तिच्या पाया पडून त्याच्याकडून झालेल्या चुकीबद्दल परिहार देतो. तो म्हणतो की, ' हे सुंदरी ! तुझ्या मनातून परित्यागाचे किल्मिष नष्ट होवो. तुझ्या त्यागाच्या वेळी, काय झाले ते सांगता येत नाही. माझ्या मनाला कसली तरी विलक्षण भुरळ पडली होती. ज्याच्या

---

[१०] अत्र सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासोऽलङ्कारः । किशोर. पृ. ५२०, ओळ क्र. १०.
भावप्र. पृ. ५१४.
लक्ष्मी पृ. ५८७-५८८
सुबो. पृ. २०८, ओळ क्र. २३-२४

मनाला भूल पडली आहे अशा लोकांची शुभ गोष्टींच्या बाबतीत अशीच ( विपरीत ) वृत्ती बनते. ( आणि त्यांची ते अवहेलना करतात. ) आंधळ्याच्या डोक्यावर फुलांचा हार टाकला तरी हा सापच आहे असे वाटून भीतीने तो हार फेकून देतो.

## निरीक्षण :

दुष्यंत राजाला शकुंतला ही त्याची धर्मपत्नी असल्याचे मोहामुळे समजले नाही. त्याला या गोष्टीचा पश्चाताप झाल्याचे कवीने अर्थान्तरन्यासद्वारा सांगितले आहे. हे सांगत असताना त्याने मोहामुळे पुष्पमालेला सर्प असल्याचे वाटून फेकून देणाऱ्या अंध व्यक्तीचे उदाहरण दिले आहे.

प्रस्तुत श्लोकात पहिल्या दोन ओळीत प्रस्तुत विषयाच्या द्वारा दोन भिन्न भिन्न वाक्यांनी विशेषाचा निर्देश केला आहे आणि त्याचे तिसऱ्या आणि चौथ्या ओळींत आलेल्या स्रजमपि शिरस्यन्ध. . . . इत्यादी सामान्यवाक्याद्वारा साधर्म्याने समर्थन केले आहे.

या श्लोकात राजाद्वारा शकुंतलेचा त्याग करणे आणि अंधाने मस्तकावर पुष्पमाला ठेवली असता साप म्हणून फेकून देणे हे साधर्म्य आहे.

या श्लोकावर व्याख्या लिहिताना राघवभट्ट असे लिहितात की,

' शुभेषु कार्येषु एवंप्रायाः शुभत्यागरूपाः प्रवृत्तयो भवन्ति । इत्यर्थान्तरन्यास : ।[११]

गौरीनाथशास्त्री पाठक, शिवप्रसाद द्विवेदी, नवकिशोरकरशास्त्री यांनी या श्लोकात अर्थान्तरन्यास सूचित केला आहे.[१२]

---

[११] अर्थद्यो. पृ. ४३२, ओळ क्र, १६-१७

[१२] सामान्येन विशेषसमर्थनरूपोऽर्थान्तरन्यासः । सुबो. पृ. २१८, ओळ क्र. २२-२३ भावप्र. पृ. ४३६, ओळ क्र. २७ तथा तृतीयपादगतसामान्येन पूर्वार्धगतविशेषस्य मर्थनादर्थान्तरन्यासोऽपि पृ. ५४८,ओळ क्र. १२-१३

# -: प्रकरण सहावे : -

# निरीक्षणे व निष्कर्ष

प्रस्तुत प्रबंध प्रास्ताविक खेरीज करून पाच प्रकरणांमध्ये विभागला आहे. प्रास्ताविकात प्रस्तुत प्रबंधाची समस्या, तिचे स्वरूप व त्याप्ती आणि अध्ययनाची गरज स्पष्ट केली आहे. पहिल्या अध्यायात अलंकाराचे स्वरुप, सामान्य लक्षण व प्रकार आणि भामह-दंडीपासून २१ व्या शतकापर्यतच्या यथोपलब्ध आलंकारिकांच्या ग्रंथाचा आधार घेऊन अर्थान्तरन्यासाचे लक्षण व प्रकार यांसंबंधी चर्चा केली आहे. याच प्रसंगी त्या त्या आलंकारिकांचे योगदान नमूद केले आहे. पुढे याच प्रकरणात या अलंकाराचा इतर अलंकारांहून असलेले भेद व त्याचा मूलाधार आदींचे वर्णन केले आहे. अर्थान्तरन्यासाच्या सामान्यस्वरूपाचे विवेचन तसेच कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगांचे सूक्ष्म विवेचन केले असता आपल्यासमोर एकंदरीत अर्थान्तरन्यास व कालिदासाने योजलेले अर्थान्तरन्यास विषयक काही महत्त्वाचे विशेष ध्यानात येतात त्यांची नोंद या प्रकरणात केली आहे.

## १.अर्थान्तरन्यास लक्षण :

अर्थान्तरन्यास अलंकाराच्या लक्षणाबाबत खालील निरीक्षण व निष्कर्ष दिसून येतात.

काही आलंकारिक केवळ लक्षण सांगतात, प्रकार सांगत नाहीत. तर काही आलंकारिक उदाहरणे न देता केवळ लक्षण सांगतात. तसेच काही आलंकारिक एका ओळीत लक्षण सांगून दुसऱ्या ओळीत त्याचे उदाहरण सांगतात. सर्व आलंकारिक अर्थान्तरन्यासाच्या स्वरुपाबाबतीत मात्र एकमताने असे मान्य करतात की, एका अर्थाच्या समर्थनासाठी अन्य अर्थाचे समर्थन करणे म्हणजे अर्थान्तरन्यास अलंकार होय. तसेच या अलंकारातील समर्थन, साधर्म्य वा वैधर्म्यमूलक असते या विषयी सर्व आलंकारिकांचे एकमत आहे. समर्थ्य वाक्य समर्थक वाक्यानंतरही येते हे उद्भटास मान्य आहे. इतरांच्या मतानुसार तसा क्रम अपेक्षित नाही.

रुद्रटाने सामान्याचे विशेषद्वारा अथवा विशेषाचे सामान्याद्वारा साधर्म्याने अगर वैधर्म्याने समर्थन सांगितले आहे. त्याच्या या लक्षणाचा प्रभाव नंतरच्या काळात चांगलाच आढळतो. त्यानेच पहिल्यांदा ' सामान्य-विशेष ' या शब्दांचा लक्षणात वापर केला आहे.

जीनसेनाचार्य यानेच पहिल्यांदा लक्षणात 'कार्यकारण ' हे शब्द वापरले.

रुय्यकाचा टीकाकार जयरथ हा कार्यकारण भावाने होणारा अर्थान्तरन्यास मानत नाही. त्या ठिकाणी तो काव्यलिंग मानतो.

विश्वेश्वर कविचंद्र यांनी दिलेले लक्षण दंडी व भोज यांनी दिलेल्या लक्षणाच्या अर्थाचे आहे.

पं. प्रभाकरशास्त्री गाडगीळ यांच्या विवेचनावर पं. जगन्नाथांची छाप आहे आणि अच्युतराय मोडक यांनी आपले विवेचन अप्पय दीक्षितांना अनुसरून केले आहे.

## २. अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार :

काव्यशास्त्रज्ञांनी समर्थ्य-समर्थक वाक्याची स्थिती, वाचक शब्दांचे प्रयोग-अप्रयोग, साधर्म्य-वैधर्म्यमूलक समर्थन आणि समर्थ्य-समर्थक वाक्याच्या प्रस्तुत-अप्रस्तुत असणे यांच्या आधारे अनेक प्रकार केले आहेत.

' हि ' शब्दाच्या प्रयोगाने अथवा अप्रयोगाने होणाऱ्या प्रकारांमध्ये कोणत्याही प्रकारचे सौंदर्य आढळत नाही.

त्यामुळे त्याच्या आधारे होणारे प्रकार व उपप्रकार रुय्यकास मान्य नाहीत. असे प्रकार भामह, शोभाकर मित्र, पंडितराज जगन्नाथ, प्रभाकर गाडगीळ व पुञ्जराज यांनी मानले आहेत.

काही आलंकारिक केवळ लक्षण सांगतात प्रकार सांगत नाहीत.

वाग्भट ( द्वितीय ) यांनी हेमचंद्राचेच अनुकरण केले आहे. त्यामुळे वाग्भट ( द्वितीय) . यांनी हेमचंद्राने सांगितलेले प्रकार सांगितले आहेत. त्याच्या पूर्ववर्ती असलेल्या मम्मटाने सांगितलेले सामान्याचे विशेषद्वारा समर्थन या अर्थान्तरन्यासाचे (साधर्म्य-वैधर्म्यमूलक ) प्रकार हेमचंद्र व वाग्भट ( द्वितीय ) यांना मान्य नाहीत.

भामह, वामन, जयदेव, विश्वेश्वर कविचंद्र, चिरंजीव, त्रिमलभट्ट, भावदेवसुरी, मङ्खक, अच्युतराय, अप्पय दीक्षित, कुंतक, शिलामेघसेन, सुधीन्द्रतीर्थ श्रीसाद, अग्निपुराण व विष्णुधर्मोत्तरपुराण यांनी अर्थान्तरन्यासाचे कोणतेही प्रकार सांगितले नाहीत.

दंडीने अर्थान्तरन्यास अलंकाराच्या आठ प्रकारांचा निर्देश करुन इतर प्रकारांविषयी असे सांगितले आहे की, इतर प्रकार ' आदी ' या शब्दाने संगृहित होतात. अर्थात दंडीच्या मते अर्थान्तरन्यासाचे केवळ आठच प्रकार नसून अनेक प्रकार संभवतात असे दिसून येते.

डॉ. मथुरेश नन्दन कुलश्रेष्ठ हे आपल्या अर्थान्तरन्यास अलंकारात रुय्यकाने केलेल्या अर्थान्तरन्यास अलंकाराच्या लक्षणाची विशेषता सांगताना असे म्हणतात की ' रुय्यकसे पूर्ववर्ती आलंकारिकोंने केवल सामान्यका विशेष से अथवा विशेष का सामान्य से

समर्थन ही अर्थान्तरन्यास अलंकार के अन्तर्गत रखा है, परंतु रुय्यक के इस लक्षण में कारण का कार्यसे अथवा कार्य का कारण से समर्थन भी अर्थान्तरन्यास अलंकार के अन्तर्गत समाविष्ट किया गया है । पूर्ववर्ती आलंकारिकोंने इस प्रकार के अलंकार को हेतु की संज्ञा दी है, जब कि रुय्यक परवर्ती आलंकारिक इसको काव्यलिंग अलंकार के नामसे अभिहित करते हैं । ( अर्था. अलं. पृ. ३८ ओळ क्र. ११-१६ ) त्यांचे हे म्हणणे भ्रमात्मक आहे. कारण रुय्यकाचा पूर्ववर्ती आलंकारिक जीनसेनाचार्य यांनी आपल्या ' 'अलङ्कार-चिन्तामणी ' या ग्रंथात कार्यकारणभावाधारित प्रकार अर्थान्तरन्यास अलंकारात समाविष्ट केलेला आहे.

## ३. अर्थान्तरन्यास आणि इतर अलंकार :

कार्यद्वारा कार्याचे समर्थन अथवा कारणद्वारा कार्याचे समर्थन जीनसेनाचार्य, रुय्यक, विश्वनाथ यांनी अर्थान्तरन्यासाचे प्रकार मानले आहेत. पण याठिकाणी काव्यलिंग अलंकार आहे. फक्त सामान्यद्वारा विशेषाचे अथवा विशेषद्वारा सामान्याचे समर्थन असेल तरच अर्थान्तरन्यास अलंकार होतो.

काही आलंकारिकांनी कार्यकारणभावावर आधारित समर्थन सापेक्ष असेल तर काव्यलिंग अलंकार होतो. अन्यथा निरपेक्ष असेल तर अर्थान्तरन्यास अलंकार होतो. पण अप्पय दीक्षितांनी दिलेल्या उदाहरणातून याचे विपरीत म्हणजे समर्थन निरपेक्ष असताना देखील काव्यलिंग अलंकार होतो असे दिसते.

काव्यलिंग अलंकार केवळ आर्थ असतो परंतु अर्थान्तरन्यास अलंकार शाब्द आणि आर्थ असा दोन प्रकारचा असतो.

कार्यकारण भावावर आधारित समर्थन अर्थान्तरन्यास अलंकारात समाविष्ट करणे उचित नाही. कार्यकारण भावाच्या समर्थनाचे ठिकाणी काही चमत्कृती असेल तर तिथे हेतू अथवा काव्यलिंग अलंकार स्वीकारला तर काही हरकत नाही असे प्रस्तुत प्रबंधकाराचे मत आहे.

विकस्वर अलंकारात पहिल्यांदा विशेषाचे सामान्याद्वारा समर्थन आणि त्याच सामान्याचे आणखी एका विशेषद्वारा समर्थन केलेले असते. जिथे विकस्वर अलंकार दाखविला आहे तिथे अर्थान्तरन्यास अलंकार आवश्य असतोच कारण पहिल्या वाक्यात विशेष असून त्याचे समर्थन सामान्य वाक्याने केलेले असते, म्हणून अधिकतर शास्त्रकारांनी हा अलंकार स्वतंत्र रुपात स्वीकारला नाही.

पंडितराज जगन्नाथ यांच्या मतानुसार विकस्वर अलंकारात दोन अर्थान्तरन्यास अलंकाराची मिळून संसृष्टी असते. अथवा एक अर्थान्तरन्यास अलंकार आणि एक उपमा अलंकार यांची संसृष्टी असते. म्हणजे अप्पय दीक्षित व जयदेव यांनी दाखविलेल्या विकस्वराच्या उदाहरणात त्याने संसृष्टी अलंकार मानला आहे.

शोभाकारमित्र, पंडितराज जगन्नाथ आणि जयरथाने अर्थान्तरन्यास अलंकाराहून उदाहरण अलंकाराचे स्वतंत्र अस्तित्व मानले आहे आणि इतर अलंकारात त्याचा अन्तर्भाव होऊ शकत नाही असा निर्वाळा ( युक्ती ) दिला आहे.

रसगंगाधराचा टीकाकार नागेशचे मते उदाहरण अलंकार अर्थान्तरन्यास अलंकाराहून भिन्न नाही. जगन्नाथोत्तरकालीन आलंकारिकांनी त्याच्या मतास अनुसरून अर्थान्तरन्यास अलंकाराचे स्वरूप वेगळे मानले आहे.

अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक नाही तर तो साधर्म्यमूलक आहे आणि हे साधर्म्य सगळीकडे ध्वनित होत असते, ते वाच्य नसते.

प्रत्यनिकन्यास अलंकार एक स्वतंत्र अलंकार आहे असे वाटते. भोजद्वारा या अलंकारास अर्थान्तरन्यासाचा प्रकार म्हणून सांगितला आहे. परंतु ते तितकेसे सयुक्तिक वाटत नाही.

## ४. अर्थान्तरन्यासाचा आधार :

अर्थान्तरन्यासाचा आधार समर्थ्य-समर्थक भाव आहे. तरीसुद्धा इतर अलंकारांमध्ये जिथे समर्थ्य-समर्थक भाव आहे त्यांच्यापासून या अलंकाराचे काय वेगळेपण आहे याची चर्चा यापूर्वी करण्यात आली आहे. इथे अर्थान्तरन्यास अलंकाराच्या बाबतीत तो तर्कन्यायमूलक आहे की सादृश्यमूलक आहे या मुद्यावर जी शंका उपस्थित केली आहे. त्याबाबतीत पुढीलप्रमाणे संयुक्तिक मत मांडता येईल.

पी.के. गोडे यांच्या मतानुसार अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक असूनही त्याचा आधार समर्थ्य-समर्थक-भाव आहे. त्यामुळे त्याने अर्थान्तरन्यास अलंकार तर्कन्यायमूलक आहे या विद्यानाथाच्या मताचे खंडन केले आहे.

ए.एस . भांडारकर यांनी पी.के. गोडे यांच्या मताचे संयुक्तिक सोदाहरण खंडन करून अर्थान्तरन्यास अलंकार तर्कन्यायमूलक आहे या मतास पुष्टी दिली आहे.

अर्थान्तरन्यास अलंकार तर्कन्यायमूळक आहे हे सिद्ध करताना भांडारकर यांनी मम्मटांनी दिलेल्या उदाहरणांचा आधार घेतला आहे की कोणत्याही प्रकारचे सादृश्य नसताना देखील मम्मटाने अर्थान्तरन्यास अलंकार मानला आहे.

अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्यमूलक मानला तर हे मत कोणासही मान्य होणार नाही, कारण ते मम्मटाच्या मताविरूद्ध आहे असा भांडारकर यांचा अभिप्राय आहे. अर्थान्तरन्यास अलंकार तर्कन्यायमूलक असला तरी अनुमान व काव्यलिंग यांच्यापासून भिन्न असल्याचे भांडारकर यांनी युक्तिपूर्वक सांगितले आहे.

अर्थान्तरन्यास अलंकार हा सादृश्यमूलक की तर्कन्यायमूलक या मुद्यावर कोणत्याही आलंकारिकांनी विवेचन केलेले आढळत नाही. दुसरी गोष्ट अशी की अर्थान्तरन्यासाच्या उदाहरणात काही ठिकाणी सादृश्य स्पष्टपणे दिसून येते. काही ठिकाणी ते स्पष्ट दिसत नाही. तसेच समर्थ्य-समर्थक भाव हा तर्काचाच भाग असल्याने तर्कास पूर्णतः टाळता

येणार नाही. म्हणून अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्य मूलकही असतो व तर्कन्यायमूलकही असू शकतो. यात विशेष मुद्दा असा की, समर्थ्य–समर्थक–भाव हाच अर्थान्तरन्यासाचा आधार आहे.

## ५. कालिदास वाङ्मयातील अर्थान्तरन्यासचे प्रकार :

अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार प्रामुख्याने समर्थ्य–समर्थक वाक्याच्या स्थितीच्या आधारे आलंकारिकांनी पाडले. त्यामध्ये रुद्रटाने सामान्य–विशेषभाव व साधर्म्य–वैधर्म्य यांचे आधारे चार प्रकार मांडले, रुय्यकाने कार्यकारण–भावाने साधर्म्य–वैधर्म्याचे आधारे होणाऱ्या चार प्रकारांचा अन्तर्भाव केला. कालिदासाच्या वाङ्मयामध्ये बहुतेक सर्व प्रकार स्पष्टपणे आढळतात. त्यांचे संख्यात्मक निर्देश पुढील प्रमाणे –

### १.सामान्याद्वारा विशेषाचे साधर्म्याने समर्थन :

| मेघ. | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि.शा. | सामान्य | विशेष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १३ | ३९ | ४७ | ०४ | ०३ | १९ | ०१ | ०१ |
| - | - | १ | - | ०१ | ०३ | ०१ | ०२ |
| - | ०१ | - | - | - | ०२ | ०१ | ०३ |

### २.सामान्याद्वारा विशेषाचे वैधर्म्याने समर्थन :

| मेघ. | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि. शा | सामान्य | विशेष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ०४ | २३ | ६ | ०२ | ०१ | १० | ०१ | ०१ |
| - | ०१ | - | ०१ | - | - | २ | १ |

### 3.विशेषद्वारा सामान्याचे साधर्म्याने समर्थन :

| मेघ. | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि.शा. | सामान्य | विशेष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| - | ०१ | - | ०२ | ०२ | ०२ | ०१ | ०१ |
| - | - | - | - | ०१ | - | ०१ | ०२ |

### ४. विशेषद्वारा सामान्याचे वैधर्म्याने समर्थन :

| मेघ. | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि.शा. | सामान्य | विशेष |
|---|---|---|---|---|---|---|---|

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | |
| - | - | २ | - | - | ०१ | ०१ | ०१ |
| - | - | - | - | ०१ | - | २ | १ |

कालिदासाच्या वाङ्मयात ज्या ज्या ठिकाणी सामान्य-विशेष भावावर आधारित समर्थन आहे त्यांतील काही ठिकाणी कार्य-कारण-भावावर आधारित समर्थन या प्रकारचा अर्थान्तरन्यास होऊ शकतो. परंतु कार्यकारणभावावर आधारित असलेला अर्थान्तरन्यास सर्वमान्य नसल्याने ज्याठिकाणी कार्यकारणभाव आहे, त्यांचा समावेश सामान्य-विशेष भावावर आधारित प्रकारात होत असल्याने त्यांचे भिन्न निर्देश केले नाहीत. तरीही काही विशेष उदाहरणाच्या ठिकाणी कार्यकारणभावावर आधारित असल्याचे सांगितले आहे. अशी उदाहरणे फारच कमी आहेत. उदा.

( अ ) कारणद्वारा कार्याचे साधर्म्याने समर्थन :

| मेघ | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि.शा. |
|---|---|---|---|---|---|
| ०७ | ०१ | - | - | - | ०४ |

( ब ) कारणद्वारा कार्याचे वैधर्म्याने समर्थन :

| मेघ | कुमार | रघु. | माल. | विक्रमो. | अभि.शा. |
|---|---|---|---|---|---|
| ०१ | - | - | - | - | - |

## ६. टीका व टीकाकार :

प्रस्तुत प्रबंधात विवेचन करताना टीकाकारांचे मत विचारात घेतले आहे. मेघदूताच्या चौदा, कुमारसंभवाच्या सात, रघुवंशाच्या पाच, मालविकाग्निमित्राच्या सहा, विक्रमोर्वशीयच्या सहा आणि अभिज्ञान शाकुंतलाच्या तेरा टीकांचे निरीक्षण केले आहे. त्यांची थोडक्यात माहिती पुढीलप्रमाणे -

कालिदासाच्या वाङ्मयात आलेल्या अलंकारांविषयी विशेष करून अर्थान्तरन्यासाविषयी टीकाकार थोडे उदासीन आहेत. अनेक ठिकाणी त्यांनी कोणत्याही अलंकाराचा निर्देशही केला नाही.

[illegible] ला [illegible]

मल्लिनाथ, स्थिरदेव, राघव भट्ट, अरुणगिरीनाथ, नवकिशोरकर शर्मा यांनी प्रायशः इतस्ततः या अलंकाराचा निर्देश केला आहे.

कधी कधी एकाच ठिकाणी अधिक अलंकारांची शंका दाखवून त्याचे समाधान केले आहे. उदा. रघुवंशातील श्लोक क्र. १.१० मध्ये अर्थान्तरन्यास, दृष्टांत की प्रतिवस्तूपमा या संबंधी विचार अरुणगिरीनाथांनी विस्तारपूर्वक केला आहे. या श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार नाही.

" प्रतिवस्तूपमा चालङ्कारः । ' प्रतिवस्तूपमा तु सा । सामान्यस्य द्विरेकस्य यत्र वाक्यद्वये स्थितिः'। गुणदोषविभागहेतुत्वं साधारणो धर्मः शब्दभेदेन वाक्यद्वयेऽप्युपात्तः । अत एव न दृष्टान्तः । तत्र सामान्यस्यापि बिम्ब-प्रतिबिम्बभावेनावस्थानात् । नाप्यर्थान्तरन्यासः। सामान्यस्य विशेष विषयतया तत्र वाक्यद्वयस्यावस्थानात् । ११ ( रघु. प्रका. पृ. १३, ओळ क्र. ७ - ११ )

नारायण पंडित यांनी कुमारसंभवातील श्लोक १.४ मध्ये अर्थान्तरन्यास आहे की नाही यासंबंधी चर्चा करताना ते म्हणतात, " अत्र स्वभावसुकुमारं दृष्टान्तमुपन्यस्यति - इन्दोः किरणेषु अङ्क इव । इन्दोश्चद्रस्य किरणेषु रश्मिषु अङ्कः कलङ्कः इव । ' कलङ्काङ्कौ लाञ्छनं च चिह्नं लक्ष्म च लक्षणमि' त्यमरः । न चात्रार्थान्तरन्यासस्य तर्क समय इव दृष्टान्तेन समर्थनं, न शृङ्गाराङ्गमिति शङ्कनीयम् । अत्र दृष्टान्तस्य विशेषतश्चारुत्वाधानमात्रपरत्वादिति।

यथाह कुन्तकाचार्य :

'अलङ्कारस्य कवयो यत्रालङ्करणान्तरम् ।
असन्तुष्टा निबध्नन्ति हारादेर्मणिबन्धवत् ॥ '

इति । अनेन श्लोकेनाभिगम्यत्वगुणयोगित्वं हिमवतः समर्थितम् । अत्र एको हि दोष इत्यत्र विशेषस्य सामान्येन समर्थनादर्थान्तरन्यासः । " ( कुमार. विव. पृ. ११, ओळ क्र. २-११)

प्रायशः कुमारसंभव, मेघदूत इत्यादी टीकांचे अध्ययन करताना असे दिसून येते की, टीकाकार बहुतेक वेळा अर्थान्तरन्यास अलंकाराचा निर्देश करतात. पण रघुवंशात तसेच कुमारसंभव सर्ग ८ - १७ मध्ये पण तशी स्थिती नाही.

कालिदासाच्या साहित्यात अर्थान्तरन्यासाचे सारगर्भ तसेच लालित्यपूर्ण भरपूर प्रयोग आढळतात याची पुष्टी प्रस्तुत प्रबंधात केली आहे आणि त्यासाठी इथे वेगळा पुरावा देणे आवश्यक वाटत नाही. प्रस्तुत प्रबंधात प्रारंभी असे सांगितले आहे की, कालिदासाची प्रसिद्धी उपमा अलंकाराबाबत असली तरी प्रस्तुत प्रबंधात असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, कालिदास अर्थान्तरन्यासाच्या वापरामध्ये अत्यंत कुशल असून त्यात सफल झाला आहे. त्याच्या अर्थान्तरन्यासाचा वापर पाहून असे वाटू लागले की उपमा अलंकाराप्रमाणेच अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगात कालिदासाचे नैपुण्य तितकेच आहे. असे जरी असले तरी कालिदासाने अर्थान्तरन्यासच्या प्रयोगांनी एक आगळे प्रयोजन साधले आहे की जे उपमा अलंकाराने साधले जात नाही. याचे कारण अर्थान्तरन्यासाच्या विशेषस्वभावात आहे जो पूर्वीच अभ्यास करताना नोंदविला आहे - तो म्हणजे सामान्य अनुभव आणि विशेष अनुभवाची जोड देऊन सामान्य मनुष्याला आचारविचारांच्या आदर्शाचे धडे घालून देण्याचे कार्य अर्थान्तरन्यासाचे ! कालिदासाने अर्थान्तरन्यासाचा त्या मर्माला नेमके जाणले. उदाहरण मागे आपण पाहिलेच आहे. त्याचे केवळ स्मरण-

जातं वंशं भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।

तेनार्थित्वं त्वयि विधिवशाद् दूरबन्धुर्गतोऽहं

याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या ह्या उपयोग विशेषाचे नेमके स्वरुप एका अनामिक कवीने लक्षात घेतले. तो म्हणतो,

अर्थान्तरस्य विन्यासे कालिदासो विशिष्यते ॥

म्हणून कालिदास उपमाकुशल असला तरी त्याने अर्थान्तरन्याच्या प्रयोगाने जे उपदेशामृत रसिकाला पाजले आहे, त्यामुळे त्याचे अर्थान्तरन्यास प्रयोगांनाही कालिदासाच्या वाङ्मय - अभ्यासामध्ये असाधारण महत्त्व आहे.

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या वापराविषयी पुनरुक्ती असली तर फलरुपगौरवस्य अदोषत्वात् या न्यायाने असे निर्देश करणे योग्य वाटते की, कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचे विषय निरनिराळे, तसेच सर्वव्यापी आणि मर्मस्पर्शी आहेत. निसर्गापासून मानवी जीवन, नैसर्गिक सत्य, सन्मित्र लक्षण इत्यादी गोष्टींचा आधार घेऊन त्याने अर्थान्तरन्यासाचा वापर केला आहे. आणखी एक गोष्ट कालिदासाच्या बाबतीत महत्त्वपूर्ण आहे की, हा अलंकार अर्थालंकार असल्याने अर्थगौरवपूर्ण असतानाही सर्व प्रकारचे शब्दसौंदर्य अथवा पदलालित्याचा अभाव कुठेही दिसत नाही. म्हणजे अर्थालंकाराबरोबर शब्दांची अचूक निवड असल्यामुळे पदलालित्य व अर्थगौरव दिसून येतो.

## कालिदासीय अभ्यासाची भावी दिशा :

असा विश्वास आहे की, 'कालिदासाची उपमा' याचे अध्ययन केले जाते आणि कालिदासाच्या अर्थान्तरन्यास अलंकार प्रयोगांच्या अध्ययनाप्रमाणेच कालिदासाने वापरलेल्या इतर अलंकारांचे सुद्धा अध्ययन होणे तितकेच आवश्यक आहे. प्रस्तुत प्रबंधही त्या दृष्टीने केलेला एक प्रयत्न आहे.

# -: संदर्भ - ग्रंथ सूची : -

## अ : संस्कृत ग्रंथ :


अभिराम : कालिदासकृत अभिज्ञान शाकुंतलम् , दिङ् मात्र दर्शन व्याख्येसह, श्रीवाणीविलास प्रेस, श्रीरंगम् ।

अवतरे शंकरदेव : अभिनव काव्यशास्त्र, साहित्य सहकार, दिल्ली, प्रथम संस्करण, २०००

आचार्य नारायण राम ( संपा. ) : रघुवंशम् मल्लिनाथकृत संजीवनी टीकेसह, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, एकादश संस्करण, १९४४.

उण्णी एन . पी. ( संपा. ) मेघसन्देश - दक्षिणावर्तनाथकृत प्रदीप, पूर्णसरस्वती कृत विद्युल्लता व परमेश्वर कृत सुमनोरमणी संस्कृत टीकांसह, भारतीय विद्या प्रकाशन, दिल्ली १९८७.

उपाध्याय गंगाप्रसाद ( संपा. ) - शतपथ ब्राह्मण , रिसर्च इन्स्टिट्यूट ऑफ एन्सीएन्ट साइन्टिफिक स्टडिज , दिल्ली,

भाग १ - १९६७

भाग २ - १९६९

भाग 3 - १९७०

एडवर्ड कॉवेल ( संपा. )- अश्वघोष कृत बुद्धचरित, इंग्रजी अनुवादासह, कॉस्मो पब्लिकेशन्स, न्यू दिल्ली, प्रथमावृत्ती १९७७

एम्बर कृष्णमाचार्य ( संपा. ) अभिनव कालिदास कृत नञ्जराजयशोभूषण, ओरिएन्टल इन्स्टिट्यूट, बडोदा, १९30.

करमरकर र.दा. ( संपा. )- मम्मटाचार्य विरचित काव्यप्रकाशः- वा.रा. झळकीकरकृत बालबोधिनी टीकेसह, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे, सप्तमावृत्ती १९६५.

काणे पी.व्ही. ( संपा. )- भवभूतीविरचित उत्तररामचरितम् , घनश्यामकृत संस्कृत टीका, इंग्रजी अनुवादासह, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, पाचवी आवृत्ती, १९७१

कात्रे स.ल. ( संपा.)- भट्ट देवशंकर पुरोहित कृत अलङ्कारमञ्जूषा ओरिएन्टल मॅन्यु. स्कीप्ट्स लायब्ररी, उज्जैन, १९४०.

काळे गणेश काशिनाथ ( संपा. )- कालिदास कृत अभिज्ञानशाकुन्तलम्, श्रीनिवासाचार्यप्रणीत शाकुंतल व्याख्या आणि राघवभट्ट कृत अर्थद्योतनिका टीकांसह, लक्ष्मी वेंकटेश्वर मुद्रणालय, मुंबई, १९१६.

काळे एम . आर . ( संपा. )- कालिदासकृत मालविकाग्निमित्रम् काट्यवेम टीका, इंग्रजी - मराठी अनुवादासह, ए.आर . शेठ आणि कं. मुंबई, १९६०.

काळे एम . आर . ( संपा. )- कालिदासकृत विक्रमोर्वशीयम् , अर्थप्रकाशिका संस्कृत टीका, इंग्रजी अनुवादासह, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, अकरावी आवृत्ती, पुनर्मुद्रण, १९९१.

पं. केदारनाथ दुर्गाप्रसाद ( संपा )-श्रीकृष्णकवी कृत मन्दारमरन्दचम्पू, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९२४.

कोसंबी डी.डी. ( संपा. )- भर्तृहरीकृत शतकत्रयम्, भारतीय विद्या भवन, मुंबई १९४६.

खिस्ते श्रीनारायण शास्त्री - मेघदूत, मल्लिनाथकृत संजीविनी, चारित्रवर्धनाचार्यकृत चारित्रवर्धिनी व भावप्रबोधिनी टीकेसह चौखम्बा संस्कृत सीरिज ऑफिस, वाराणसी १९३१.

खिस्ते श्रीनारायण शास्त्री - अभिज्ञान शाकुन्तलम्, लक्ष्मी संस्कृत टीका व हिन्दी अनुवादासह, खिलाडीलाल ॲन्ड सन्स , वाराणसी.

गजेन्द्रगडकर एस . डी. ( संपा. ) - अभिज्ञान शाकुन्तलम्, बालबोधिनी संस्कृत टीका व इंग्रजी अनुवाद, स्टँडर्ड पब्लिशिंग कंपनी, मुंबई १९२०.

गांधी लालचंद्र भगवानदास ( संपा. ) नरेन्द्र प्रभसुरीकृत अलंकारमहोदधी, ओरिएन्टल इन्स्टिट्यूट, बडोदा, १९४२.

गुप्ता रमा ( संपा. )- हरिप्रसादकृत काव्यालोक हिंदी व्याख्येसह, पब्लिकेशन्स स्कीम्स, जयपूर, १९८९.

आ. चरणतीर्थ महाराज - मेघदूत कात्यायनी संस्कृत टीकेसह, चोखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी, प्रथमावृत्ती, १९७६

चौधरी जे.बी. ( संपा.) - मेघदूतावरील सनातन गोस्वामींची तात्पर्यदीपिका आणि शाश्वतची कविप्रिया टीका. जर्नल ऑफ प्राच्यवाणी ( इन्स्टिट्यूट ऑफ ओरिएन्टल लर्निंग, खंड १०, भाग २ जुलै-डिसें.१९५३.

जोशी रेखा ( संपा. ) - वाग्भटालंकार ( विद्यासगरीया टीका ) पब्लिकेशन स्कीम, जयपूर, प्रथमावृत्ती, १९९२

जोशी सखाराम नेमीचंद ( संपा.)- जीनसेनाचार्य कृत अलङ्कार - चिन्तामणी, जैनेंद्र मुद्रणालय, कोल्हापूर १९०७.

झा रामनाथ ( संपा. ) - अभिज्ञानशाकुंतलम् नाटकम् . शंकर - नरहरिकृत व्याख्येसह, मिथिला विद्यापीठ, दरभंगा, १९५७.

तेलंग महेश रामकृष्ण ( संपा. ) - वाग्भटकृत काव्यालंकारसंग्रह ( प्रतिहारेन्द्रराज टीकेसह ) निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९२८.

दलाल सी.डी. (संपा. ) – राजशेरकृत काव्यमीमांसा, ओरिएन्टल [illegible] बडोदा, तृतीय आवृत्ती, १९३४

देवधर चिं.रा. (संपा. )– अलंकाररत्नाकर, ओरिएन्टल बुक एजन्सी, पुणे, १९४२.

देवधर चिं.रा. (संपा. )– भासनाटकचक्र , ओरिएन्टल बुक एजन्सी, पुणे, १९४२

देवी का. गायत्री ( संपा. )– कृष्णसुधियाकृत काव्यकलानिधी, वाल्टेयर, प्रथम आवृत्ती, १९९२

देशमुख लक्ष्मण सदाशिव ( संपा. ) –अभिज्ञान शाकुंतलम् , गौरीनाथ पाठककृत सुबोधिनी टीकेसह, सरस्वती भवन, काशी, प्रथम आवृत्ती.

द्विवेदी चंद्रमौली ( संपा ) – जयदेव कृत चन्द्रालोक, भारतीय विद्या संस्थान, वाराणसी, द्वितीय आवृत्ती१९९६.

द्विवेदी दुर्गाप्रसाद ( संपा )– विश्वनाथ कविराजकृत साहित्यदर्पण, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, पञ्चम आवृत्ती १९३१.

द्विवेदी पारसनाथ ( संपा ) –पंडितराज जगन्नाथ कृत रसगङ्गाधरः, नागेशभट्ट कृत, ' गुरुमर्म–प्रकाश ' व्याख्या सहिता, भाग १ – २, संस्कृत विश्वविद्यालय, वाराणसी, द्वितीय संस्करण १९९६.

द्विवेदी रामचंद्र ( संपा. ) – अलङ्कारसर्वस्व – संजीविनी, रुय्यकाचे अलंकारसर्वस्व श्रीविद्या चक्रवर्तीकृत संजीविनी टीकेसह, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, प्रथम आवृत्ती, १९६५.

द्विवेदी रेवाप्रसाद ( संपा. ) – कालिदास ग्रंथावली, काशी हिन्दू विश्वविद्यालय, वाराणसी, सुधारित दुसरी आवृत्ती १९८६.

नन्दी तपस्वी ( संपा. ) – रघुवंश – जीनसमुद्रच्या टीकेसह, गुजरात साहित्य अकादमी, गांधीनगर, प्रथमावृत्ती, १९८९.

नागर रविशंकर ( संपा. )– कविकर्णपूर कृत अलङ्कारकौस्तुभ, परिमल पब्लिकेशन्स, दिल्ली, १९९३.

पणशीकर वा.ल. ( संपा. ) – अच्युतराय कृत साहित्यसार, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, १८९१.

परब काशिनाथ पांडुरंग ( संपा ) – वामनकृत काव्यालङ्काराणि वृत्तिसमेतानि । निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई १८८९

परब काशिनाथ पांडुरंग ( संपा ) – भट्टनारायणकृत वेणीसंहार, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई १९०५.

परब काशिनाथ पांडुरंग ( संपा ) – विद्याभूषण कृत साहित्यकौमुदी। निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई १८९७

परांजपे व्ही.जी. ( संपा. )– कालिदासकृत मेघदूतम् , स्थिरदेवकृत व्याख्येसह, पुणे १९३५.

पाण्डेय रमाशंकर ( संपा. )- कालिदासकृत मालविकाग्निमित्रम् संस्कृत टीकेसह, चौखम्बा सुरभारती प्रकाशन, वाराणसी.

पारीख रसिकलाल ( संपा ) - हेमचंद्र प्रणीत काव्यानुशासन भाग -१ -२, श्री महावीर जैन विद्यालय, मुंबई, प्रथमावृत्ती, १९३८

पोचंचर्ल श्रीराममूर्ती ( संपा ) - विश्वेश्वर कविचंद्रकृत चमत्कार-चंद्रिका, आन्ध्र विश्वकला परिषद, वाल्टेर, एप्रिल १९६९

पोडुवाल के. अच्युत ( संपा ) - रघुवंशम् , अरुणगिरीनाथ कृत प्रकाशिका आणि नारायण पण्डितकृत पदार्थदीपिका टीकेसह, दि संस्कृत कॉलेज कमिटी, त्रिपुनीथरा,

भाग - १ - सर्ग - १ - ६, १९६४

भाग - २ - सर्ग - ७ - १२ -

भाग - 3 - सर्ग - १3 - १९, १९५९

पंडित शिवदत्त ( संपा )- वाग्भटकृत काव्यानुशासनम् निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई ,१९८४.

बरुह अनुन्दोराम ( संपा ) - भोजकृत सरस्वतीकण्ठाभरण. प्रकाशन मंडळ, आसाम, गौहती. १९६९.

भंडारी विष्णुप्रसाद ( संपा )- पंडित विश्वेश्वर पाण्डेय कृत अलंकार-मुक्तावली, चौखम्बा संस्कृत सीरीज ऑफिस, बनारस सीटी. १९२७.

भंडारी विष्णुप्रसाद ( संपा ) -पंडित विश्वेश्वर पाण्डेय कृत अलंकार-प्रदीप : चौखम्बा संस्कृत सीरीज ऑफिस, बनारस सीटी. १९२3.

भांडारकर रा.गो. ( संपा. )- भवभूतीप्रणीत मालती-माधव, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे, तृतीय आवृत्ती ,१९७०.

मिश्र श्री राधेश्याम ( संपा ) : राजानक कुन्तक प्रणीत वक्रोक्ति जीवित, चौखम्बा संस्कृत सीरीज ऑफिस, वाराणसी, प्रथमावृत्ती १९६७

मिश्र श्री रामचंद्र ( संपा. ) - मालविकाग्निमित्रम् , प्रकाश टीकेसह, चौखम्बा संस्कृत पुस्तकालय, बनारस, १९५१.

मिश्र श्री रामचंद्र ( संपा. ) - विक्रमोर्वशीयम् , प्रकाश टीकेसह, चौखम्बा संस्कृत सीरिज, ऑफीस, वाराणसी, १९५3.

मिश्र विन्ध्येश्वरी प्रसाद ( संपा. ) -विक्रमोर्वशीयम् ,
विनोद संस्कृत - हिंदी टीकेसह, कृष्णदास अकादमी, वाराणसी, प्रथम संस्करण, १९८४

मीमांसक युधिष्ठिर ( संपा. ) - पतञ्जलीकृत महाभाष्यम् , तृतीय खण्ड, श्रीप्यारेलाल द्राक्षादेवी न्यास, दिल्ली, प्रथमावृत्ती १९५3

मूर्ती बालकृष्ण ( संपा ) -अमृतानंद योगी कृत अलङ्कारसंग्रह , तिरुमल तिरुपती देवस्थान मुद्रणालय, तिरुपती, १९५०.

मौरेर - वॉल्टेर हार्डिग ( संपा ) - मेघदूत - सुगमान्वयावृत्ती टीका सुमतिविजयकृत, भाग - १-२, डेक्कन कॉलेज, पुणे, प्रथमावृत्ती १९६५

राघवाये वे, ( संपा, ) – विद्यानाथकृत प्रतापरूद्रीयम् , मद्रपुरी संस्कृत विद्यासमिती, मद्रास, १९७०
रामचन्द्रुडू पी : विद्याधरकृत एकावली, मल्लिनाथकृत तरला टीकेसह, संस्कृत विभाग, उस्मानिया विश्वविद्यालम,हैद्राबाद १९८१.
राम प्रताप : विश्वनात देव कृत साहित्यसुधासिन्धू (हिंदी अनुवादासह ), भारतीय विद्याभवन दिल्ली, प्रथम संस्करण, १९७८.
राशीवडेकर अप्पाशास्त्री : मालविकाग्निमित्रम् , बालबोधिनी संस्कृत टीकेसह, लक्ष्मी वेंकटेश्वर मुद्रणालय, मुंबई, १९०२.
रेग्मी शेषराज शास्त्री ( संपा. ) कुमारसंभवं – महाकाव्यम – संजीविनी व शिशुहितैषिणी टीकेसह, चौखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी, द्वितीयावृत्ती, १९८७.
विद्यासागर जीवानंद ( संपा.) – विक्रमोर्वशीयम् , संस्कृत टीकेसह, कलकत्ता, १८७८.
वैद्य परशुराम ल. ( संपा. ) – श्रीवत्सलाञ्छन भट्टाचार्य कृत काव्यरीक्षा – मिथिला विद्यापीठ, दरभंगा, १९५६
शतावधान श्रीनिवासाचार्य ( संपा. ) अभिज्ञान शाकुन्तलम् सहृदयतिलक व्याख्येसह, व्ही. रामस्वामी शास्त्रुलू ॲण्ड सन्स, मद्रास, १९३०
शर्मा रमण कुमार ( संपा. ) – आचार्य भामह कृत काव्यालङ्कार, विद्यानिधी, दिल्ली, प्रथम संस्करण, १९६५.
शर्मा केदारनाथ दुर्गाप्रसाद ( संपा ) श्रीकृष्ण कविविरचिता मन्दारमरन्दचम्पूः । निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९२४.
शर्मा श्रीरंग ( संदा. ) – मालविकाग्निमित्रम , सरला संस्कृत टीकेसह, पुणे, १९१८.
शानभोगे बी.एल . ( संपा.) – पुञ्जराजकृत शिशुप्रबोध काव्यालंकार, ओरिएण्टल इन्स्टिट्यूट, बडोदा, १९६५.
शास्त्री गौरीनाथ ( संपा. ) – महाकवी मङ्खकप्रणीत साहित्यमीमांसा, संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय, वाराणसी, प्रथमावृत्ती, १९८४.
शास्त्री त. गणपती ( संपा. ) – कुमार–संभव–महाकाव्य, अरूणागिरीनाथकृत प्रकाशिका व नारायण पंडित कृत विवरण टीकेसह, त्रावणखोर शासकीय मुद्रणालय, त्रिवेंद्रम.

प्रथम भाग – सर्ग :– १ – २ १९१३,
द्वितीय भाग – सर्ग :– ३ – ५ १९१३,
तृतीय भाग – सर्ग :– ६ – ८ १९१४ ,

शास्त्री नवकिशोरकर ( संपा. ) अभिज्ञान शाकुंतलम , किशोरकेली संस्कृत टीकेसह, चौखम्बा संस्कृत सीरीज ऑफिस, वाराणसी, नवमावृत्ती, १९७८.
शास्त्री आर. शामा ( संपा. ) – श्रीकृष्ण – ब्रह्मतंत्र – परकालस्वामी कृत, अलंङ्कारमणिहार, तृतीय भाग, युनिव्हर्सिटी ऑफ म्हैसूर, म्हैसूर, १९२३.

शास्त्री आर् . हालस्यनाथ ( संपा. ) अप्पय दीक्षितकृत कुवलयानंद, गंगाधर वाजपेयी, रसिकरंजनी संस्कृत टीकेसह, कुम्भकोण, १८९२.
शास्त्री राजन्न के. ( संपा. ) – धर्मसुरीकृत साहित्य –रत्नाकर – संस्कृत परिषद, उस्मानिया विद्यापीठ, हैद्राबाद.
भाग १ : प्रथमावृत्ती १९७२
भाग २ : प्रथमावृत्ती १९७४
शास्त्री राजवीर ( संपा. ) – मनुस्मृतिः, आर्य साहित्य प्रचार ट्रस्ट, दिल्ली, द्वितीय संस्करण, १९८५.
शास्त्री शिरोमणी रामास्वामी के. एस . ( संपा.) – उद्भट कृत काव्यालङ्कार–सारस -
वृत्तीसह, ओरिएन्टल इन्स्टिट्यूट, बडोदा, १९३१.
शास्त्री सी. शंकरराम ( संपा. ) – मालविकाग्निमित्रम्, सहृदयतिलक राम पिशरोदीकृत सारार्थदीपिका टीकेसह, बालमनोरमा प्रेस, मद्रास, १९२९.
शास्त्री सुरेंद्रनाथ ( संपा. ) – विक्रमोर्वशीयम , कल्पलता टीकेसह, निर्णयसागर मुद्रणालय, मुंबई, प्रथमावृत्ती, १९४२.
शुक्ल बृजेश कुमार ( संपा. ) – त्रिमलभट्ट कृत अलङ्कारमञ्जरी, अखिल भारतीय संस्कृत परिषद, लखनऊ, प्रथम संस्करण, १९९५.

## आ : मराठी ग्रंथ संदर्भ सूची :

किंजवडेकर रा.द. ( संपा. ) – मेघदूत –मल्लिनाथ टीका, मराठी अनुवाद इ. चित्रशाळा प्रेस, पुणे, द्वि य आवृत्ती १९५८.
किंजवडेकर रा.द. ( संपा. ) रघुवंश – मल्लिनाथ टीका, मराठी अनुवाद इ. चित्रशाळा प्रेस, पुणे,

| | | |
|---|---|---|
| भाग १ ला | द्वितीयावृत्ती | १९५६ |
| भाग २ रा | द्वितीयावृत्ती | १९५६ |
| भाग 3 रा | द्वितीयावृत्ती | १९५६ |
| भाग ४ था | द्वितीयावृत्ती | १९3४ |

खरे बाळूताई अनंत – अलंकार मंजूषा, इचलकरंजी ग्रंथमाला, पुणे, १९3१.
मंगरुळकर अरविंद ( संपा. ) – मेघदूत, मराठी आवृत्ती, देशमुख आणि कंपनी, पुणे, पहिली आवृत्ती १९१७.
मंगरुळकर अरविंद ( संपा. )– मालाविकाग्निमित्रम , मराठी आवृत्ती, देशमुख प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती १९९२.

वाळिंबे रा.शं. ( संपा. ) – अभिज्ञानशाकुन्तलम्, मराठी आवृत्ती, जोशी आणि लोखंडे प्रकाशन, पुणे, दुसरी आवृत्ती, १९६८.

## इ : हिंदी संदर्भ ग्रंथ :

अवस्थी ब्रह्ममित्र – अलंकार कोश, इंद्र प्रकाशन, दिल्ली, प्रथमावृत्ती, १९८९

अवस्थी विजय बहादुर : काव्याङ्गदर्पण – दिल्ली पुस्तकसदन, दिल्ली, प्रथम संस्करण, १९७२.

ओमप्रकाश : अलंकारों का स्वरूप – विकास, नेशनल पब्लिशिंग हाऊस, दिल्ली, प्रथम संस्करण १९७३.

कुलश्रेष्ठ मथुरेशनंदन : अर्थान्तरन्यास अलंकार – ब्रजकिशोर कुलश्रेष्ठ प्रकाशन, जयपूर, प्रथम संस्करण, १९६५.

जिन्दल कुमकुम – मेघदूत की प्रमुख टीकाओं का तुलनात्मक अध्ययन, नाग प्रकाशक, दिल्ली, १९९४.

रस्तोगी उमेश प्रसाद : भारवी काव्य में अर्थान्तरन्यास, चौखम्बा विद्याभवन, वाराणसी, प्रथम आवृत्ती, १९६५.

सहाय राजवंश – ' हिरा ' : अलंकारनुशीलन, दि चौखम्बा संस्कृत सीरीज ऑफीस, वाराणसी, प्रथम संस्करण, १९७०.

## ई.: इंग्रजी संदर्भ ग्रंथ :

**Chandorkar D.N. ( Ed.) :** The Kāvyaprakāśa of Mammata Ullāsa X , Poona, 1896.

**Narang Satya Pal, ( Ed.) : Pāda Index of Classical Sanskrit Poems,** Vol. I, Nag Publishers, Delhi, First Edn. 1998.

**Narang Satya Pal ( Ed.) : Meghadūta studies** ( Commentary of Krishnapati ), Nag Publishers, Delhi, First Edn. 1979.

**Narang Satya Pal ( Ed.) : Kālidāsa Bibliography**, Heritage, Publishers, New Delhi, First Edn. 1976.

**Ramchandraudu P.** : The Contriution of Panditarāja Jagannātha to Sanskrit Poetics, Niranjan Publishers, Delhi, First Edn. 1983

**Rao G. Partha Saradhi : Alaṅkār - ratnākara of Śobhākaramitra** (A study ), Mittal Publications, New Delhi, First Edn. 1992.

**Schuyler Montgomery : A bibliography of Sanskrit Drama** with an Intraductory sketch of the Dramatic Literature of India, Asian Eductional Services, New Delhi, 1977.

**Sagrera Antonia Binimelis : A study of Alakaṁkāras in Sanskrit Mahākavyās and Khaṇḍakāvyās,** Bharahya Vidya Prakashan, Delhi, First Edn. 1977.

**Subbanna N.R.** : Kālidāsa Citations, Meharchand Lachhman das, Delhi, 1973.

# - : परिशिष्ट : -

## अर्थान्तरन्यासाचे संख्यात्मक निर्देश :

प्रस्तुत प्रबंधात आलेल्या ग्रंथवार अर्थान्तरन्यासाचा संख्यात्मक निर्देश करीत आहोत.

१) मेघदूत :

| मेघदूत श्लोक | : अर्थान्तरन्यास |
|---|---|
| १११ | : २३ |
| १९ प्रक्षिप्त | : ०१ |
| एकूण | : २४ |

२) कुमारसंभव :

| सर्ग क्रमांक | श्लोक संख्या | अर्थान्तरन्यास |
|---|---|---|
| १. | ६० | ६ |
| २. | ६४ | २ |
| ३. | ७६ | ४ |
| ४. | ४६ | ७ |
| ५. | ८६ | १७ |
| ६. | ९५ | ०६ |
| ७. | ९५ | ०२ |
| ८. | ९१ | ०६ |
| ९. | ५२ | ०१ |
| १०. | ६० | ०६ |
| ११. | ५० | ०३ |
| १२. | ६० | ०७ |
| १३. | ५१ | - |

| | | |
|---|---|---|
| १४. | ५१ | - |
| १५. | ५३ | ०२ |
| १६. | ५१ | - |
| १७. | ५५ | - |
| एकूण | १०९६ | ६९ |

3) रघुवंश :

| सर्ग क्रमांक | श्लोक संख्या | अर्थान्तरन्यास |
|---|---|---|
| १ | ९५ | २ |
| २ | ७५ | ९ |
| 3 | ७० | ५ |
| ४ | ८८ | २ |
| ५ | ७६ | १ |
| ६ | ८६ | २ |
| ७ | ७१ | २ |
| ८ | ९५ | ५ |
| ९ | ८२ | 3 |
| १० | ८६ | २ |
| ११ | ९२ | ५ |
| १२ | १०४ | २ |
| १3 | ७९ | - |
| १४ | ८७ | 3 |
| १५ | १०3 | 3 |
| १६ | ८८ | 3 |
| १७ | ८१ | ४ |
| १८ | ५3 | २ |
| १९ | ५७ | १ |
| एकूण | १५६८ | ५६ |

४ मालविकाग्निमित्र :

| अंक क्रमांक | श्लोक संख्या | अर्थान्तरन्यास |
|---|---|---|
| १ | २२ | ३ |
| २ | १४ | १ |
| ३ | २३ | १ |
| ४ | १७ | - |
| ५ | २० | २ |
| एकूण | ९६ | ७ |

५ विक्रमोर्वशीय :

| अंक क्रमांक | श्लोक संख्या | अर्थान्तरन्यास |
|---|---|---|
| १ | २० | - |
| २ | २२ | - |
| ३ | २२ | २ |
| ४ | ४३ | ३ |
| ५ | २५ | २ |
| एकूण | १३२ | ७ |

६ अभिज्ञान शाकुंतलम्

| अंक क्रमांक | श्लोक संख्या | अर्थान्तरन्यास |
|---|---|---|
| १ | ३१ | ८ |
| २ | १९ | ४ |
| ३ | २६ | २ + १ |
| ४ | २२ | ३ + १ |
| ५ | ३१ | ८ |
| ६ | ३२ | ६ |
| ७ | ३५ | ३ |
| एकूण | १८६ | ३६ |

-: प्रबंध सारांश :-

कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार : चिकित्सक अभ्यास

पुणे विद्यापीठाला संस्कृत विषयातील पीएच्. डी. पदवीसाठी सादर करावयाचा शोधप्रबंध


: संशोधक :

जाधव शिवदास कुंडलिक

: मार्गदर्शिका :

डॉ. ( कु.) शैलजा बापट,

प्रपाठक,

संस्कृत प्राकृत भाषा विभाग,

पुणे विद्यापीठ,

पुणे - ४११ ००७.

# प्रास्ताविक

## : समस्या, समस्येचे स्वरूप व तिचे महत्त्व :

### १. कालिदासाच्या वाङ्मय–अध्ययनाचे स्वरूप :

महाकवी कालिदासाच्या बाबतीत व त्यांच्या ग्रंथावर आजपर्यंत विपुल संशोधन झाले आहे. त्यामध्ये अनेक विद्वानांनी त्या ग्रंथांचा अभ्यास काव्य, शैली, रीती, छंद, अलंकार, संगीत इत्यादी विषयी केला आहे. काहींनी सामाजिक दृष्टिकोनातून तर काहींनी धर्म व तत्त्वज्ञान या मुद्दयांनाही स्पर्श करणारे संशोधन करून कालिदासाध्ययनामध्ये मोलाची भर घातली आहे. काहींनी भाषा–वैज्ञानिक दृष्टीने तर काहींनी ग्रंथांच्या चिकित्सक आवृत्तीसाठी मूलभूत संशोधनकार्य केले आहे. चिकित्सक आवृत्त्यांमध्ये पुढील संशोधने उल्लेखनीय आहेत. साहित्य अकादमीने प्रकाशित केलेले Susil Kumar De संपादित The Meghadūta of Kālidāsa, S.K. Belvalkar संपादित **The Abhijñānaśākuntal of Kālidāsa** आणि H.D. Velankar संपादित **The Vikramorvaśiya of Kālidās**१ हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. त्याच बरोबर काशी विश्व विद्यालयाने प्रकाशित व रेवा प्रसाद द्विवेदी संपादित **' कालिदास ग्रंथावली '** ( **The works of Kālidāsa** ) हा ग्रंथ महत्त्वाचा आहे. या नित्यानंद कृत **' कालिदासकाव्ये शब्द–परिपाकः '** डॉ. उषा सिंहल यांचा **' कालिदास के अपाणिनीय प्रयोग '**, Dr. S.N. Gosal यांचा **The Apabhramsa verses of the Vikramorvaśiya from the Linguestic stand point** आणि Sures Chandra Banerji यांचा 'कालिदास कोश ' हे ग्रंथ मोलाचे आहेत.

टीका वाङ्मयाच्या दृष्टीने राधावल्लभ त्रिपाठी यांचा 'कालिदास की समीक्षा–परंपरा,' डॉ. कुमकुम जिन्दल यांचा 'मेघदूत टीकाओं का तुलनात्मक अध्ययन', डॉ. प्रभुनाथ द्विवेदी यांचा 'कालिदास की कृतियों पर मल्लिनाथ की टीकाओं का विमर्श' इत्यादी ग्रंथ महत्त्वाचे आहेत. शैलीच्या दृष्टीने S.A. Sabnis यांचा **Kālidāsa _ His Style and His Art** , रसदृष्टीने Dr. R.R. Ambardekar यांचा ' **Rasa structure of the Meghadūta** ' रीती दृष्टीने शिवगोविंद पाण्डेय कृत 'कुमारसम्भव का रीति-वैज्ञानिक अध्ययन' हे ग्रंथ उपलब्ध आहेत.

भौगोलिक अध्ययनाच्या दृष्टीने H.C. Chakradhar यांचा **The Geography of Kālidāsa** आणि कैलासनाथ द्विवेदी यांचा 'कालिदास की कृतियोंमें भौगोलिक स्थलोंका प्रत्यभिज्ञान' हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. सामाजिक जीवन या विषयावर डॉ. नरेश मिश्र यांचा 'कालिदास नाटकेषु सामाजिक–जीवनम्' हा ग्रंथ मोलाचा आहे. सर्वसाधारण अभ्यासासाठी T.G. Mainkar यांचा '**Kālidāsa - His Art and Thought**', Amaldhari Singh यांचा '**Kālidāsa - A Critical Study**,' Madhusudan Mishra यांचा '**Metres of Kālidāsa,**' रमाशंकर तिवारी यांचा 'महाकवि कालिदास', डॉ. वि. वा. मिराशी यांचा 'कालिदास' इत्यादी अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. B.S. Upadhyaya यांनी '**India in Kālidāsa**' या आपल्या ग्रंथात भौगोलिक, राजकीय, सामाजिक, ललित–कला–साहित्य, आर्थिक जीवन, शिक्षण, धर्म व तत्त्वज्ञान अशा विविध विषयांवर विशद विवेचन केले आहे.

Satypal Narang यांचा **Kālidāsa Bibiography** व डॉ. आद्याप्रसाद मिश्र यांचा 'कालिदास साहित्यम्' या सारखे ग्रंथ कालिदासाच्या वाङ्मयावर

विपुल अध्ययन झाल्याची साक्ष पटवितात. प्रस्तुत प्रबंधाचा विषय अलंकार शास्त्रावर आधारित आहे. तरीही वाचकांना थोडेसे दिग्दर्शन व्हावे म्हणून उपरोक्त काही संशोधन-प्रकारांचे इथे उल्लेख केले आहेत. हे उल्लेख म्हणजे कालिदासविषयक ग्रंथावरील सर्व संशोधनाचा आढावा किंवा त्याचे समीक्षण करण्याचा उद्देश अर्थातच नाही.

२. कालिदास वाङ्मयातील-अलंकाराच्या अध्ययनाचे स्वरूप :

कालिदासाच्या वाङ्मयावरील संशोधन-कार्याचे स्वरूप लक्षात घेता कालिदासाच्या काव्याचे शरीरभूत घटक छंद, शैली किंवा अलंकार की जे काव्यात्म्याचे सौंदर्यवर्धक आहेत. त्यांचाही अभ्यास होणे जरूरीचे आहे. त्यांचे अध्ययन केल्याशिवाय कालिदासाच्या कृतींचा समग्र अभ्यास होऊ शकणार नाही. हे लक्षात घेऊन कालिदासाच्या काव्यशरीराचा सौंदर्यवर्धक घटक जो अलंकार - त्यांचा अभ्यास काही अभ्यासकांनी सुरु केला. त्यांनी कालिदासाने योजलेल्या अलंकारांपैकी कालिदासाच्या उपमा अलंकाराच्या प्रयोगावर विशेष भर दिला आहे. जसे - Pillai K. C Chellappanm यांचा **Similies of Kālidāsa** ( उपमा कालिदासस्य ) हा ग्रंथ तसेच या संदर्भातील विविध नियतकालिकांतून झालेले लिखाण - उदा. ' त्रिवेणी ' च्या जून १९४४ च्या अंकात Balkrishnan Parasu यांचा Kālidāsa's Similies हा लेख, ' भारतीय विद्या ' च्या नोव्हेंबर १९५३ च्या अंकात Jhala G.G. यांचा ' उपमा कालिदासस्य ' हा लेख, ' वीणा ' च्या १९५९ मधील कालिदास विशेषांकात आलेला V. S. Musalgaonkar यांचा ' उपमा कालिदासस्य ' हा लेख याची साक्ष देतात. कालिदासाच्या उपमा अलंकाराच्या अभ्यासातून पुढे ' उपमा कालिदासस्य ' ही उक्ती प्रचलित झाली.

उपमा अलंकाराशिवाय इतर अलंकाराकडे अभ्यासकांनी पुरेसे लक्ष दिलेले दिसत नाही.

असे जरी असले तरी ' अर्थान्तरन्यास ' अलंकाराकडे काही अभ्यासकांचे लक्ष गेले. अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेच्या ( AIOC ) अधिवेशनामध्ये पुढील शोध निबंध सादर झाले आहेत.

Dvivedi, Ramchandra - **Arthantarnyasa; Theorty and Practice and its uses in the Meghaduta** – Gauhati – 1965

कालिदासाच्या वाङ्मयांवरील संशोधन-कार्याचे स्वरूप लक्षात घेता कालिदासाच्या काव्याचे शरीरभूत घटक, छंद, शैली किंवा अलंकार की जे काव्यात्म्याचे सौंदर्यवर्धक आहेत. त्यांचाही अभ्यास होणे जरूरीचे आहे. हे लक्षात घेऊन कालिदासाच्या काव्यशरीराचा सौंदर्यवर्धक घटक जो अलंकार – त्यांचा अभ्यास काही अभ्यासकांनी सुरू केला. परंतु ' उपमा ' अलंकाराशिवाय इतर अलंकाराकडे अभ्यासकांनी लक्ष दिलेले दिसत नाही. त्यामुळे कालिदासाचे वाङ्मय-संशोधन-अध्ययन अपूर्ण राहते.

3. कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थातरन्यास अलंकार अध्ययनाची गरज :

' उपमा कालिदासस्य ' ही उक्ती कालिदासाच्या वाङ्मयातील त्याच्या अलंकारांच्या प्रयोगाची पूर्णता नव्हे. त्यामुळे कालिदासाने प्रयुक्त केलेल्या इतरही अलंकारांचा अभ्यास प्रकथित झाला असे म्हणणे इष्ट होईल. त्या दृष्टीने एका अनामिक कवीने त्याने केलेल्या निरिक्षणाचा उल्लेख श्लोकात आढळतो.

उपमा कालिदासस्य नोत्कृष्टेति मे मतम् ।
अर्थान्तरस्य द्विन्यासे कालिदासो विशिष्यते ।।

ही सूक्ती कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यासाच्या चिकित्सक अभ्यासास प्रेरित करते आणि कालिदासाचे उपमा अलंकारामधील कुशल

उपयोगाचे पार्श्वभूमीवर अर्थान्तरन्यास अलंकारसुद्धा कालिदासाने तेवढया कुशलतेने अर्थाविष्कारासाठी वापरला असला पाहिजे. त्या दृष्टीने कालिदासाने त्याच्या विविध वाङ्मातून योजलेल्या अर्थान्तरन्यास अलंकाराची गरज निर्माण होते. म्हणूनच 'कालिदासाच्या साहित्यातील अर्थान्तरन्यास अलंकार – चिकित्सक अभ्यास ' संशोधनासाठी निवडण्यात आला आहे.

## ४. अभ्यासाची पध्दती :

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचा अभ्यास करण्यापूर्वी आपणास अर्थान्तरन्यास अलंकाराचा सामान्य अभ्यास करणे आवश्यक ठरते. त्या दृष्टीने पहिल्या प्रकरणाची मांडणी केली आहे. अर्थान्तरन्यासाचे सामान्य स्वरूप जाणून घेतल्यावर कालिदासाने आपल्या ग्रंथांत वापरलेल्या अर्थान्तरन्यासाचे अध्ययन क्रमप्राप्त होते. अर्थान्तरन्यासाचे सामान्य स्वरूप आणि कालिदासाचे टीकांसह समग्र वाङ्मय हे हा या अभ्यासाचा मुख्य आधार आहे. या दोन आधारांवरच अध्ययनाची पुढील प्रकरणात विभागणी केली आहे.

## प्रकरण पहिले :

### अर्थान्तरन्यास –अलंकार – सामान्य स्वरूप

प्रस्तुत प्रकरणामध्ये अलंकार-शास्त्रातील काही महत्त्वाच्या ग्रंथांचे आढावे, अर्थान्तरन्यास अलंकाराचे शास्त्रीय स्वरूप लक्षात येण्यासाठी घेतले आहेत. त्यामुळे कालिदासाच्या वाङ्मयामध्ये योजलेल्या अर्थान्तरन्यासाचे वेगळे आणि नेमके स्वरूप काय आहे हे समजून घेणे सोपे जाईल.

### अलंकार शब्दाचा सामान्य अर्थ :

बहुधा अलंकार या शब्दाचा प्रयोग साहित्यशास्त्र ग्रंथामध्ये अलंकरण ( आभूषण ) या अर्थाने प्रसिद्ध आहे. संस्कृत वाङ्मयात अनेक वेळा अलंकार हा शब्द ' आभूषण ' या शब्दाचा पर्यायवाची शब्द म्हणून आला आहे. ते आभूषण दोन प्रकारांनी वर्णिलेले दिसते. १) बाह्य आणि २) आन्तर. उदा. १) बाह्य आभूषण – कवच, कुण्डले इ. २) आन्तर आभूषण – विद्या, विजय, शौर्य इत्यादी. ही आन्तर आभूषणे गुणांमध्ये अन्तर्भूत होतात, अलंकारात नाही. बाह्य अलंकाराचा अलंकार या अर्थाने व्यवहार होतो. उदा. अनुप्रास, यमक, उपमा, उत्प्रेक्षा, स्वभावोक्ती इत्यादी अलंकार शब्दाच्या व्युत्पत्तीतून हाच अर्थ दिसून येतो.

### अलंकार शब्दाची व्युत्पत्ती आणि अर्थ :

अलंकार हा शब्द अलं + कृ या धातूपासून बनला आहे. ' अलम् ' हे अव्यय भूषण-वाचक आहे. अलंकृ म्हणजे भूषण धारण करणे आणि अलंकार म्हणजे भूषविण्याची साधने जसे – पुष्प. पुष्पहार, आभरण इत्यादी.

### अलंकाराचे स्वरूप व स्थान :

साहित्यशास्त्रातील अलंकाराचे स्वरूप वामन व दंडी यांच्या आधारे मांडले आहे

साहित्यामध्ये अलंकाराचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. साहित्यशास्त्राचे दुसरे रूढ झालेले नाव म्हणजे अलंकारशास्त्र. त्याचाच प्रभाव म्हणून साहित्यशास्त्र म्हणजे अलंकारशास्त्र असे एक समीकरणच झाले आहे. अलंकारांचे महत्त्व प्रतिपादन करताना अलंकारिक राजशेखराने अलंकाराला वेदाचे सातवे अंग मानले आहे. त्याच्या मते अलंकार हे वेदाचा अर्थ प्रकट करण्याचस उपकारक ठरतात आणि आलंकारांशिवाय वेदाच्या अर्थाचे ज्ञान सम्यक् रूपाने ज्ञात होत नाही.

नोंद घेतली आहे. त्यातून कालिदासाची शैली दिसून येते. त्या उदाहरणातील एक सुंदर उदाहरण पुढीलप्रमाणे –

जातं वंशे भुवनविदिते पुष्करावर्तकानां
जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः ।
तेनार्थित्वं त्वयि विधिवशात् दूरबन्धुर्गतोऽहं
याञ्चा मोघा वरमधिगुणे नाधमे लब्धकामा ॥( मेघ. ६ )

## प्रकरण तिसरे : -

### कुमारसंभवातील अर्थान्तरन्यास अलंकार –

कुमारसंभवातील १७ सर्गात एकूण ६९ श्लोकात अर्थान्तरन्यास असून त्या सर्वांची चर्चा या प्रकरणात केली आहे. विवेचन करताना नारायण पडित अरूणागिरीनाथ, वल्लभदेव आणि मल्लिनाथ या टीकाकारांच्या मतांची नोंद घेतली आहे.

शशिना सह याति कौमुदी सह मेघेन तडित् प्रलीयते ।
प्रमदाः पतिवर्त्मगा इति प्रतिपन्नं हि विचेतनैरपि ॥
(कुमार. ४.३३ )

यासारख्या सुंदर अर्थान्तरन्यासाची योजना कवीने केलेली इथे आढळते.

## प्रकरण चौथे : -

### रघुवंशातील अर्थान्तरन्यास –

रघुवंशात १९ सर्ग असून ५६ श्लोकात अर्थान्तरन्यास आहे. निसर्गातील घटनांचा, जीवनातील नश्वरतेचा, बंधुप्रेमाचा आणि इंद्रीयाचा स्वभाव याचा आधार घेऊन कवीने अर्थान्तरन्यासाची योजना केली. या प्रकरणात

यशोधनानां हि यशो गरीयः । ( रघु. १४–३५ )

यासारख्या अनेक सुभाषितांची योजना आढळते.

## प्रकरण पाचवे :-

## कालिदासाच्या नाटकातील अर्थान्तरन्यास अलंकार

कालिदसाच्या मालविकाग्निमित्र नाटकात ७, विक्रमोर्वशीयमध्ये ७ आणि अभिज्ञान शाकुंतलामध्ये ३६ श्लोकात अर्थान्तरन्यास अलंकार आहे. श्लोकाचे विवेचन आणि निरीक्षण अशा रूपात या प्रकरणात केली आहे. कालिदासाच्या नाटकात अर्थान्तरन्यासाची सुंदर सुंदर उदाहरणे आढळतात. उदा.

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमै
र्नवाम्बुभिर्दूरविलम्बिनो घनाः ।
अनुध्दताः सत्पुरूष समृध्दिभिः
स्वभाव एवैष परोपकारिणाम् ( अभि. शा. ५.१२ )

## प्रकरण सहावे :-

## निरीक्षणे व निष्कर्ष

प्रस्तुत प्रबंध प्रास्ताविक खेरीज करून पाच प्रकरणांमध्ये विभागला आहे. प्रास्ताविकात प्रस्तुत प्रबंधाची समस्या, तिचे स्वरूप व व्याप्ती आणि अध्ययनाची गरज स्पष्ट केली आहे. पहिल्या अध्यायात अलंकाराचे स्वरूप, सामान्य लक्षण व प्रकार आणि भामह–दंडीपासून २१ व्या शतकापर्यंतच्या यथोपलब्ध आलंकारिकांच्या ग्रंथाचा आधार घेऊन अर्थान्तरन्यासाचे लक्षण व प्रकार यासंबंधी चर्चा केली आहे. याच प्रसंगी त्या त्या आलंकारिकाचे योगदान नमूद केले आहे. पुढे याच प्रकरणात या आलंकाराचा इतर अलंकारांहून असलेले भेद व त्याचा मूलाधार आदींचे वर्णन केले आहे. अर्थान्तरन्यासाच्या सामान्य स्वरूपाचे विवेचन तसेच कालिदासाच्या वाङ्मयातील अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगांचे सूक्ष्म विवेचन केले असता आपल्यासमोर एकंदरीत अर्थान्तरन्यास व कालिदासाने योजलेले अर्थान्तरन्यास विषयक काही

महत्त्वाचे विशेष ध्यानात येतात ज्याची नोंद या प्रकरणात केली आहे.

अर्थान्तरन्यास अलंकाराचे प्रकार :

काव्यशास्त्रज्ञांनी समर्थ्य-समर्थक वाक्याची स्थिती, वाचक शब्दांचे प्रयोग-अप्रयोग, साधर्म्य-वैधर्म्यमूलक समर्थन आणि समर्थ्य-समर्थक वाक्याच्या प्रस्तुत-अप्रस्तुत असणे यांच्या आधारे अनेक प्रकार केले आहेत.

' हि ' शब्दाच्या प्रयोगाने अथवा अप्रयोगाने होणाऱ्या प्रकारांमध्ये कोणत्याही प्रकारचे सौंदर्य आढळत नाही.

त्यामुळे त्याच्या आधारे होणारे प्रकार व उपप्रकार रुय्यकास मान्य नाहीत. पुढील काळात कोणत्याही आलंकारिकांनी ते स्वीकारले नाहीत. असे प्रकार भामह, शोभाकर मित्र, पंडितराज जगन्नाथ, प्रभाकर गाडगीळ व पुञ्जराज यांनी मानले आहेत.

काही अलंकारीक केवळ लक्षण सांगतात प्रकार सांगत नाहीत.

वाग्भट ( द्वितीय ) यांनी हेमचंद्राचेच अनुकरण केले आहे. त्यामुळे वाग्भट ( द्वितीय ) यांनी हेमचंद्राने सांगितलेले प्रकार सांगितले आहेत. त्याच्या पूर्ववर्ती असलेल्या मम्मटाने सांगितलेले सामान्याचे विशेषद्वारा समर्थन या अर्थान्तरन्यासाचे ( साधर्म्य-वैधर्म्यमूलक ) प्रकार हेमचंद्र व वाग्भट ( द्वितीय ) यांना मान्य नाहीत.

भामह, वामन, जयदेव, विश्वेश्वर कविचंद्र, चिरंजीव, त्रिमलभट्ट, भावदेवसुरी, मङ्खक, अच्युतराय, अप्पय दीक्षित, कुंतक, शिलामेघसेन, सुधीन्द्रतीर्थ- श्रीपाद अग्निपुराण व विष्णुधर्मोत्तर-पुराण यांनी अर्थान्तरन्यासाचे कोणतेही प्रकार सांगितले नाहीत.

दंडीने अर्थान्तरन्यास अलंकाराच्या आठ प्रकारांचा निर्देश करून इतर प्रकारांविषयी असे सांगितले आहे की, इतर प्रकार ' आदी ' या शब्दाने संगृहीत होतात. अर्थात

दंडीच्या मते अर्थान्तरन्यासाचे केवळ आठच प्रकार नसून अनेक प्रकार संभवतात असे दिसून येते.

**निष्कर्ष** : अर्थान्तरन्यास अलंकार हा सादृश्य मूलक की तर्कन्यायमूलक या मुद्यावर कोणत्याही आलंकारिकांनी विवेचन केलेले आढळत नाही. दुसरी गोष्ट अशी की अर्थान्तरन्यासाच्या उदाहरणात काही ठिकाणी सादृश्य स्पष्टपणे दिसून येते. काही ठिकाणी ते स्पष्ट दिसत नाही. तसेच समर्थ्य-समर्थक भाव हा तर्काचाच भाग असल्याने तर्कास पूर्णतः टाळता येणार नाही. म्हणून अर्थान्तरन्यास अलंकार सादृश्य मूलकही असतो व तर्कन्यायमूलकही असू शकतो. यात विशेष मुद्दा असा की, समर्थ्य-समर्थक-भाव हाच अर्थान्तरन्यासाचा आधार आहे.

कालिदासाच्या साहित्यात अर्थान्तरन्यासाचे सारगर्भ तसेच लालित्यपूर्ण भरपूर प्रयोग आढळतात याची पुष्टी प्रस्तुत प्रबंधात केली आहे आणि त्यासाठी इथे वेगळा पुरावा देणे आवश्यक वाटत नाही. प्रस्तुत प्रबंधात प्रारंभी असे सांगितले आहे की, कालिदासाची प्रसिद्धी उपमा अलंकाराबाबत असली तरी प्रस्तुत प्रबंधात असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, कालिदास अर्थान्तरन्यासाच्या वापरामध्ये अत्यंत कुशल असून त्यात सफल झाला आहे. त्याच्या अर्थान्तरन्यासाचा वापर पाहून असे वाटू लागले की उपमा अलंकारप्रमाणेच अर्थान्तरन्यासाच्या प्रयोगात कालिदासाचे नैपुण्य तितकेच आहे. असे जरी असले तरी कालिदासाने अर्थान्तरन्यासच्या प्रयोगानी एक आगळे प्रयोजन साधले आहे जे उपमा अलंकाराने साधले जात नाही. याचे कारण अर्थान्तरन्यासाच्या विशेषस्वभावात आहे जो पूर्वीच अभ्यास करताना नोंदविला आहे - तो म्हणजे सामान्य अनुभव आणि विशेष अनुभवाची जोड देऊन सामान्य मनुष्याला आचारविचारांच्या आदर्शाचे धडे घालून देण्याचे कार्य अर्थान्तरन्यासाचे ! कालिदासाने अर्थान्तरन्यासाचा त्या मर्माला नेमके जाणले. उदाहरणे मागे अपण पाहिलीच आहे. त्याचे केवळ स्मरण-

" गात वंशं भवनविदिते पुष्करावर्तकाना "

कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या त्या उपयोग विशेषाचे नेमके स्वरूप एका अनामिक कवीने लक्षात घेतले तो म्हणतो,

अर्थान्तरस्य विन्यासे कालिदासो विशिष्यते ।।

म्हणून कालिदास उपमाकुशल असला तरी त्याने अर्थान्तरन्याच्या प्रयोगाने जे उपदेशामृत रसिकाला पाजले आहे, त्यामुळे त्याचे अर्थान्तरन्यास प्रयोगानाही कालिदासाच्या वाङ्मय - अभ्यासामध्ये असाधारण महत्त्व आहे

• कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाच्या वापराविषयी पुनरुक्ती असली तर फलरूपगौरवस्य अदोषत्वात् या न्यायाने असे निर्देश करणे योग्य वाटते की, कालिदासाच्या अर्थान्तरन्यासाचे विषय निरनिराळे, तसेच सर्वव्यापी आणि मर्मस्पर्शी आहेत. निसर्गापासून मानवी जीवन, नैसर्गिक सत्य, सन्मित्र लक्षण इत्यादी गोष्टींचा आधार घेऊन त्याने अर्थान्तरन्यासाचा वापर केला आहे आणखी एक गोष्ट कालिदासाच्या बाबतीत महत्त्वपूर्ण आहे की, हा अलकार अर्थालंकार असल्याने अर्थगौरवपूर्ण असतानाही सर्व प्रकारचे शब्दसौदर्य अथवा पदलालित्याचा अभाव कुठेही दिसत नाही. म्हणजे अर्थालकाराबरोबर शब्दांची अचूक निवड असल्यामुळे पदलालित्य व अर्थगौरव दिसून येतो

## कालिदासीय अभ्यासाची भावी दिशा :

असा विश्वास आहे की, कालिदासाची उपमा याचे अध्ययन केले जाते त्याप्रमाणे कादिसाच्या अर्थान्तरन्यास अलकार प्रयोगांच्या अध्ययनाप्रमाणेच कालिदासाने वापरलेल्या इतर अलंकारांचे अध्ययन करता येईल तसेच कालिदासाप्रमाणे ग्रथकारांनी वापरलेल्या अलंकाराचे सुद्धा अध्ययन होणे तितकेच आवश्यक आहे प्रस्तुत प्रबंधही त्या दृष्टीने केलेला एक प्रयत्न आहे.



---